# धडपडणारीं मुलें

## [ खंड पहिला ]

ह्या त्रिखंडात्मक कादंबरींत देश, देव व कुटुंब ह्यांसंबंधींचीं जीं ध्येयें, त्यांची चर्चा, तसेंच तीं ध्येयें पुरविण्यासाठीं भारतीय तरुण कसे धडपडत आहेत वगैरेचें फारच हृदयंगम व स्फूर्तिप्रद वर्णन आलें आहे. मराठींतील ही एक अभिनव कादंबरी आहे.

लेखक

साने गुरुजी, एम्. ए.

कर्नाटक प्रकाशन संस्था, मुंबई २

मूल्य पावणेदोन रुपये

# प्रकरण सूचि



---

पहिली आवृत्ति : १९३७
दुसरी आवृत्ति : १९४४
तिसरी आवृत्ति : १९४६
चौथी आवृत्ति : १९५४

Printed by B. G. DHAWALE, at the KARNATAK PRINTING PRESS
and published by him for the KARNATAK PUBLISHING HOUSE,
Karnatak House, Chira Bazar, Bombay 2.

# दोन शब्द

१९३२–३३ सालीं नाशिकच्या तुरुंगांत असतांना मीं 'श्यामची आई' हें पुस्तक लिहिलें. तें लिहिल्यानंतर 'धडपडणारीं मुलें' हें पुस्तक लिहिलें. माझ्या मनांत ज्या शेंकडों कल्पना येत असत, ज्या विचारांची गर्दी उसळे, जीं स्वप्नें दिसत, ज्या स्मृति येत, जीं दृश्यें आठवत, ज्या व्यक्ति उभ्या राहात, त्या सर्वांतून हें पुस्तक निर्माण झालें आहे. माझ्या मनाच्या समाधानासाठीं हें सारें मी लिहीत असें. प्रत्यक्ष सृष्टींत अतृप्त राहिलेल्या शेंकडों हृदयांच्या भुका शांत करण्याचा हा एक मार्ग होता. ज्या व्यक्तींना कृतिवीर होतां येत नाहीं, ते वाग्विवीर होतात. माझ्यासारख्या दुबळ्या कृतीच्या माणसाच्या मनांत खूप खळबळ असते, मनांत मनोहर स्वप्नें असतात, मनांत आशाआकांक्षा, उच्च ध्येयें असतात, परंतु त्या सर्वांना कृतींत आणण्याचें धैर्य नसतें. मग दौत, लेखणी, कागद घेऊन कल्पनांचे घोडे कागदावर नाचवणें एवढाच पुरुषार्थ वाटतो व तोच मी तुरुंगांत करीत बसें.

आज चार साडेचार वर्षें ह्या वह्या मजजवळ पडलेल्या आहेत. प्रकाशमाला हें लिहिलेलें प्रसिद्ध करीत आहे. हें लिहिलेलें प्रसिद्ध करण्यांत मालेच्या चालकांना आनंद वाटत आहे. तें वाचणाऱ्यांना उद्यां आनंद होईल कीं नाहीं हें मला सांगतां येत नाहीं.

एके दिवशीं तुरुंगांत मी सहज कांहीं लिहूं लागलों व त्या सहज लिहिण्याचा सहज विस्तार होत गेला. माझ्या मनांत आधीं कांहींही ठरलेलें नसे. उद्यां कोणतें प्रकरण लिहीन, कोणतें वर्णन घालीन, कोणतें नवीन पात्र निर्मीन, कांहींही ठरलेलें नसे. आपोआप डोळ्यांसमोर जसजसें येत गेलें तसतसें मी लिहीत गेलों. सात–आठशें पानें मीं भराभरा लिहून काढलीं. नदीच्या प्रवाहाला जसें पुढचें पाऊल माहीत नसतें, कडा आहे का दरी आहे, का कांटे आहेत, कांहीं माहीत नसतें, तसेंच माझें होतें. माझ्या लेखनाची नदी पुढें जात होती. लिहून झाल्यावर ह्याला नांव काय द्यावें असें मनांत आलें! पुस्तकांत शेंकडों ठिकाणीं आलेला "धडपडणारीं मुलें" हा शब्द माझ्या डोळ्यांसमोर आला व तेंच नांव ह्या भारुडाला द्यावें असें मीं ठरविलें.

ह्या प्रथम खंडापेक्षां पुढचे दोन खंडच अधिक सुंदर आहेत. हा खंड म्हणजे आरंभ आहे. पुढच्या खंडांतून तरुणांची धडपड अधिक उत्कटपणें दिसूं लागेल व त्यांचीं निरनिराळ्या ध्येयांच्या रसरशीत निखाऱ्यांतून जाणारीं जीवनें दिसतील. परंतु आधीं पुढचे खंड कसे प्रसिद्ध करतां येतील? सध्यां ह्या प्रथम खंडानेंच समाधान मानून घ्या व तो हातांत घेऊन पुढच्या खंडांची भेट घेण्यास उत्सुक राहा.

साने गुरुजी

अमळनेर, २७-१०-३७

१

# स्वामी

ध्येयाला जो कवटाळील,
प्रेमा निर्मळ मिठी मारील
दुःखी भारत जो हसवील
निज बळिदानें। त्या अनंत माझीं नमनें ॥

अमळनेर गांवांत आज विश्वधर्ममंडळाच्या वतीनें थोर पैगंबर महंमद ह्यांची पुण्यतिथि साजरी होणार होती. विश्वधर्ममंडळ तेथें नवीनच स्थापन झालें होतें. नवीन जीवनाचा तो एक लहानसा अंकुर होता. हजारों वर्षें जो विशाल भारत बनत आहे, त्याच्याच सिद्धीसाठीं तें लहानसें मंडळ होतें. जें महाभारताचें महान् वस्त्र परमेश्वर अनंत काळापासून विणीत आहे, त्या वस्त्रांतील एक लहानसा भाग म्हणजे तें मंडळ होतें.

हिंदुस्थानभर हिंदुमुसलमानांचे दंगे सुरू असतांना असें मंडळ स्थापण्याचा बावळटपणा कोणीं केला? ही स्वाभिमानशून्यता कोणाची? ह्या दंग्यांच्या आगींत तेल ओतण्याचें सोडून हे नसते उपद्याप कोण करीत होतें?

काय सर्व हिंदुस्थानभर दंगे आहेत? नाहींत. ती एक भ्रांत कल्पना आहे. हिंदुस्थानांतील दहावीस शहरांत मारामारी झाली असेल. परंतु हीं दहावीस शहरें म्हणजे कांहीं हिंदुस्थान नव्हे. लाखों खेड्यापाड्यांतून हिंदुमुसलमान गुण्यागोविंदानें नांदत आहेत. त्यांचे संबंध प्रेमाचे व जिव्हाळ्याचे आहेत. शेंकडों प्रामाणिक मुसलमान नोकर हिंदूंचीं मुलें खेळवीत आहेत. एकमेकांच्या ओटीवर हिंदुमुसलमान पानसुपारी खात आहेत. हिंदुमुसलमानांत सलोखा आहे.

परंतु वर्तमानपत्रांना हें खपत नसतें. ऐक्याचे व प्रेमाचे वारे पसरविण्या-ऐवजीं वर्तमानपत्रें द्वेषमत्सराचे विषारी वारेच सोडत असतात. हिंदुमुसलमानांच्या दंग्यांची तिखटमीठ लावून विषारी केलेली वार्ता वर्तमानपत्रें जगभर नेतात, आणि कोट्यवधि हिंदुमुसलमानांचीं मनें अशान्त केलीं जातात! आग नसेल तेथें आग उत्पन्न होते. प्लेग नसेल तेथें प्लेगाचे जंतु जातात. हिंदुस्थानची

देना झाली आहे तेवढी पुरे, असें ह्या वर्तमानपत्रांना वाटत नाहीं. भडक कांहींतरी प्रसिद्ध करावें, पैसे मिळावे, अंक खपावे हें त्यांचें ध्येय! मग भारत मरो का तरो. समाजाला आग लागो कीं समाजाची राखरांगोळी होवो.

मुंबईला एका इमारतीस आग लागते! परंतु आपण त्याच गोष्टीस महत्त्व देतों. मुंबईतील लाखों इमारती देवानें सुरक्षित ठेविल्या होत्या हें आपण विसरतों. त्याप्रमाणें एके ठिकाणीं दंगा झाला तर त्यालाच आपण महत्त्व देतों. इतर लाखों ठिकाणीं प्रेमळ शांतता आहे, ही गोष्ट आपण डोळ्यांआड करून उगीच आदळआपट करूं लागतों. प्रत्येक धर्मातील संकुचित वृत्तीचे लोक अशा प्रकारें आपल्या श्वासोच्छ्वासाबरोबर अश्रद्धा घेऊन जात असतात. जगाची होळी पेटत ठेवतात.

परंतु ईश्वरी सूत्रें हळूहळू हलविलीं जात असतात. हा विश्वाचा विणकरी कसे कोठून घोटे फेकील तें कोणाला कळणार? अमळनेरसारखें लहानसें शहर आणि तेथें हिंदुमुसलमानांनीं अन्योन्य संस्कृति समजून घेण्यासाठीं संस्था स्थापन करावी हें आश्चर्य नव्हे का? अमळनेर हें संतांचें स्थान! संसाराला निर्मळ करणारी संस्था तेथें स्थापन न व्हावी, तर कोठें व्हावी?

ती संस्था म्हणजे एक सुचिन्ह होतें. तो लहान बिंदु—जीवनदायी बिंदु—होता. त्या बिंदूची उपेक्षा नका करूं. त्या बिंदूचाच उद्यां सिंधु होईल. आपण नदीचा उगम पवित्र मानतों. गोदावरीच्या मोठ्या प्रवाहापेक्षां त्र्यंबकेश्वराजवळील दगडाधोंड्यांतील गुंतवळासारखा तिचा लहान प्रवाह—ती करांगुळीएवढी धार—तिलाच आपण पवित्र मानतों. मंगलकर्माचे सारे आरंभ पवित्र आहेत. मग ते किती का लहान असेनात.

त्या लहान संस्थेला शिष्ट लोक हसत होते. आपापल्या क्षुद्र डबक्यांचा अभिमान धरणारे लोक हसत होते. ध्येयाची जगांत टरच होत असते. परंतु ध्येयवादी पुरुष आशेनें व श्रद्धेनें श्रमत असतो. प्रयत्न यशस्वी होवो वा अपयशी होवो, त्यांत भिण्यासारखें काय आहे? परंतु ह्या जगांत कांहींही फुकट जात नाहीं. मनांतील विचार, उच्चारलेला शब्द, प्रत्यक्ष कर्म, सर्वांचा परिणाम जगावर घडतच असतो. ते परिणाम दिसोत वा न दिसोत. कोठेंतरी कोपऱ्यांत फुललेल्या फुलाचा सुगंध वाऱ्याबरोबर दशदिशांत जातच असतो. त्या सुगंधानें

वातावरण स्वच्छ व पवित्र राखण्यास मदत केलेलीच असते. त्या गोष्टींचें ज्ञान जगांतील वर्तमानपत्रांस असो वा नसो; जगांतील अर्हंपूज्यांस असो वा नसो.

स्वामी शहरांत हिंडत होते. दहा वाजतां आगगाडींतून उतरल्यापासून ते भटकतच होते. त्यांना भूक लागली होती. परंतु कोणाकडे जाणार, कोठें उतरणार ! त्या शहरांत कोणाशींही त्यांची ओळख नव्हती. रस्त्यांतून हिंडतां हिंडतां त्यांच्या हातांत ती जाहिरात पडली. स्वामी जाहिरात वाचूं लागले.

'आज सायंकाळीं सहा वाजतां नगरभवनांत विश्वधर्ममंडळाच्या वतीनें महंमद पैगंबर ह्यांची पुण्यतिथि साजरी केली जाणार आहे. तरी सर्वांनीं यावें अशी प्रार्थना आहे.'

ती पवित्र पत्रिका वाचतांच त्यांचें तोंड फुललें. त्यांची भुकेनें काळवंडलेली मुद्रा टवटवीत दिसूं लागली. आत्म्याची भूक शांत झाली. प्रेमाच्या यात्रेकरूला प्रेमाचा प्रसाद मिळाला. ती पत्रिका स्वामींनीं हृदयाशीं धरली. ती पत्रिका म्हणजे नवीन आशा होती, नवीन प्रभा होती, नवभारताची दिव्य पताका होती. ती पत्रिका घेऊन ते पुढें चालले. भटकत भटकत ते नदीतीरावर आले. गांव आतां दूर राहिला होता. तेथें एक लहानशी टेकडी होती. त्या टेकडीवर महादेवाचें लहानसेंच पण सुंदर असें देवालय होतें. देवालयाभोवतीं झाडें लाविलेलीं होतीं. दाट छाया पडली होती. टेकडीच्या पायथ्याशीं नदी होती. जणुं भगवान् शंकराचें महिम्नस्तोत्रच ती रात्रंदिवस गात होती. गांवापासून दूर राहून त्या टेकडीवरून भगवान् शंकर गांवाला आशीर्वाद पाठवीत होते. तें स्थळ पवित्र होतें, रमणीय होतें. एक प्रकारचा शांत व गंभीर एकान्त तेथें होता.

स्वामींनीं नदीमध्यें स्नान केलें. उन्हानें तप्त झालेला आपला देह त्या शीतल जलानें त्यांनीं शांत केला. कितीतरी वेळ ते पाण्यांत होते. आईच्या प्रेमतरंगांशीं खेळत होते, आईच्या कृपासमुद्रांत डुंबत होते. मधूनमधून पाणी पीत होते. शेवटीं ते बाहेर आले. त्यांनीं वस्त्रें धुतलीं. धुवून उन्हांत वाळत टाकलीं. देवाच्या अंगणांत शीतल छायेखालीं घोंगडीवर ते बसले. त्यांना थकवा आला होता. त्या घोंगडीवर शेवटीं ते पडले. त्यांचा डोळा लागला. झाडांवरचीं पांखरें त्या श्रान्त पांथाकडे पाहात होतीं. एक पांखरूं येऊन त्यांच्या अंगावरही बसलें. हळूच बसलें व अलगत उडून गेलें.

परंतु स्वामींना झोप कोठून येणार ? भारतवर्ष झोपलें असतांना, हा प्रिय महाराष्ट्र झोपला असतांना, त्यांना झोप कोठून येणार ? ज्यांच्यावर सारी आशा ते राष्ट्राचे तरुण झोपलेले असतांना, त्यांना कोठून सुखनिद्रा, कोठची मनाची विश्रांति ? ते उठले. तेथेंच येरझारा घालूं लागले. अनेक विचार त्यांच्या हृदयांत उसळत होते. एकदम ते थबकत व दूर कोठेंतरी बघत. भारताच्या भव्य भविष्याचें दर्शन का त्यांना त्या वेळेस होई !

ते पाहा स्वामी खालीं बसले. त्यांनीं आपल्या पिशवींतून वही काढली. पेन्सिलीनें कांहींतरी ते लिहूं लागले. काय बरें लिहीत आहेत ? तो निबंध आहे का ती गोष्ट आहे ? तो हिशेब आहे कीं कांहीं टांचणें, टिपणें आहेत ? त्यांचे डोळे पाहा; भावनांनीं पेटल्याप्रमाणें ते दिसत आहेत. हृदयांतील ज्वालामुखी डोळ्यांत येऊन उभा राहिला आहे. त्यांचे ओंठ थरथरत आहेत व लिहितांना बोटें कांपत आहेत. भावनांचा वेग शरीराला व हृदयाला सहन होत नाहीं वाटतें ? भावनांच्या बरोबर शब्दांना टिकाव धरवत नाहीं, म्हणून तर नाहीं ना तो वेग ओंठांच्या कंपांतून, बोटांच्या कंपांतून प्रकट होत ?

एक दिव्य गान तेथें जन्माला आलें होतें. त्या कागदावर तेजस्वी व उदार भावनांचें एक गाणें लिहिण्यांत आलें होतें. स्वामीजींनीं तें गाणें म्हटलें. लिहून झाल्यावर त्यांना समाधान झालें. त्या गाण्यांतील चरण गुणगुणत ते शिवालया-भोंवतीं प्रदक्षिणा घालूं लागले.

वेळ केव्हां संपला तें त्यांना कळलें नाहीं. संध्याकाळ होत आली. सूर्यास्ताचे कोमल किरण नदीच्या पाण्यावर पडले होते. निघून जाणारे किरण झाडांच्या पानांशीं शेवटची खेळीमेळी करीत होते. स्वामीजींना एकदम आठवण झाली. गांवांत सभा आहे. नगरभवनांत सभा आहे. ते एकदम उठले. त्यांनीं आपली पिशवी भरली. अंगावर घोंगडी टाकली. झपझप् पावलें टाकीत ते गांवाकडे निघाले. 'नगरभवन' कोठें आहे त्याची ते विचारपूस करूं लागले.

शेवटीं एकदांचें नगरभवन आलें. नगरभवनाभोंवतीं बाग होती. अद्याप सभेस सुरुवात झाली नव्हती. मुसलमानांच्या झुंडी येत होत्या. तरुणांचे मेळावे ठायीं ठायीं उभे होते. बागेंत मुलें फिरत होतीं. बागेंतील एका बाकावर स्वामी बसले. त्यांच्या तेजस्वी मूर्तीकडे सारे कुतूहलानें पाहात होते. पहाडासारखी धिप्पाड

ती मूर्ति होती. परंतु पुन्हा किती शांत व गंभीर! पाहाणाऱ्याच्या मनांत त्या मूर्तीबद्दल एकदम आदर व भक्ति उत्पन्न होई.

सभेचे अध्यक्ष आले. मंडळी सभागृहांत जाऊं लागली. स्वामीजीही सभागृहांत शिरले. तरुणांच्या घोळक्यांतच ते बसले. सभेस आरंभ झाला. नियुक्त वक्ते उभे राहिले व त्यांनीं पैगंबराविषयींची माहिती सांगितली. आपल्या धर्मस्थापकाबद्दलची माहिती एका हिंदूनें गोळा करून, आस्थापूर्वक मिळवून ती आपणांस सांगावी ह्याचें मुसलमानबंधूंस आश्चर्य वाटलें. मुख्य वक्त्याचें भाषण संपल्यावर अध्यक्षांनीं दुसऱ्या कोणास बोलावयाचें असल्यास परवानगी आहे असें सांगितलें.

कोणी उठतो का—श्रोते चौफेर पाहूं लागले. ते पाहा स्वामी उठले. सिंहाप्रमाणें खुर्चीजवळ गेले. त्या नवपुरुषाकडे सर्वांचें लक्ष वेधलें. हा मनुष्य कोण, कुठला, काय सांगणार? स्वामींची धीर गंभीर वाणी सुरू झाली. अत्यंत शांतता होती. लोक शब्दनूशब्द पिऊं लागले, हृदयांत सांठवूं लागले.

"मुसलमान बंधूंनो! आज मला किती आनंद होत आहे, ह्याची कल्पना तुम्हांला होणार नाहीं. आपलें ध्येय परार्धांशानें कां होईना कोठेंतरी प्रगट होत आहे हें पाहाण्यांत धन्यता असते. आज हिंदुस्थानभर हिंदुमुसलमानांचे तंटे होत आहेत. अशा अविश्वासाच्या काळांत आजच्यासारखा प्रसंग पाहावयास मिळणें म्हणजे सहारा वाळवंटांत झुळझुळ वाहणारा झरा भेटण्यासारखें आहे. बंधूंनो! ह्या भारतवर्षाचें एक महान् ध्येय आहे. तें ध्येय कधींही डोळ्यांआड करूं नका. परमेश्वराला भिन्न भिन्न संस्कृतींचे लोक ह्या भारतांत आणून, त्या सर्वांची एक महान् संस्कृति निर्माण करावयाची आहे. सर्व धर्मांचे व जातींचे लोक येथें आणून त्यांना गुण्यागोविंदानें नांदविण्याचा एक महान् प्रयोग भारतभाग्यविधाता करूं पाहात आहे. समुद्रांत हजारों प्रवाह येतात, म्हणून समुद्र पवित्र; त्याप्रमाणें भारतवर्ष हें पवित्र तीर्थ आहे. मानवी जीवनाचें विविधतेंतील ऐक्य पाहावयास जगांतील यात्रेकरू ह्या भारतभूमींत येतील. भारतीय इतिहासांतील हें सोनेरी सूत्र विसरूं नका.

"भारताला ऐक्याचा संदेश जगाला द्यावयाचा आहे. भेदभावांत अभेद पाहावयास शिका, हें भारत सांगत आहे. भारतांतच अद्वैत तत्त्वज्ञान कां निर्माण झालें? तत्त्वज्ञानें परिस्थितींतून जन्मास येत असतात. जरूरीमुळें ज्याप्रमाणें

परंतु स्वामींना झोप कोठून येणार ? भारतवर्ष झोपलें असतांना, हा प्रिय महाराष्ट्र झोपला असतांना, त्यांना झोप कोठून येणार ? ज्यांच्यावर सारी आशा ते राष्ट्राचे तरुण झोपलेले असतांना, त्यांना कोठून सुखनिद्रा, कोठची मनाची विश्रांति ? ते उठले. तेथेंच येरझारा घालूं लागले. अनेक विचार त्यांच्या हृदयांत उसळत होते. एकदम ते थबकत व दूर कोठेंतरी बघत. भारताच्या भव्य भविष्याचें दर्शन का त्यांना त्या वेळेस होई !

ते पाहा स्वामी खालीं बसले. त्यांनीं आपल्या पिशवींतून वही काढली. पेन्सिलीनें कांहींतरी ते लिहूं लागले. काय बरें लिहीत आहेत ? तो निबंध आहे का ती गोष्ट आहे ? तो हिशेब आहे कीं कांहीं टांचणें, टिपणें आहेत ? त्यांचे डोळे पाहा ; भावनांनीं पेटल्याप्रमाणें ते दिसत आहेत. हृदयांतील ज्वालामुखी डोळ्यांत येऊन उभा राहिला आहे. त्यांचे ओंठ थरथरत आहेत व लिहितांना बोटें कांपत आहेत. भावनांचा वेग शरीराला व हृदयाला सहन होत नाहीं वाटतें ! भावनांच्या बरोबर शब्दांना टिकाव धरवत नाहीं, म्हणून तर नाहीं ना तो वेग ओंठांच्या कंपांतून, बोटांच्या कंपांतून प्रकट होत !

एक दिव्य गान तेथें जन्माला आलें होतें. त्या कागदावर तेजस्वी व उदार भावनांचें एक गाणें लिहिण्यांत आलें होतें. स्वामीजींनीं तें गाणें म्हटलें. लिहून झाल्यावर त्यांना समाधान झालें. त्या गाण्यांतील चरण गुणगुणत ते शिवालया-भोवतीं प्रदक्षिणा घालूं लागले.

वेळ केव्हां संपला तें त्यांना कळलें नाहीं. संध्याकाळ होत आली. सूर्यास्ताचे कोमल किरण नदीच्या पाण्यावर पडले होते. निघून जाणारे किरण झाडांच्या पानांशीं शेवटची खेळीमेळी करीत होते. स्वामीजींना एकदम आठवण झाली. गांवांत सभा आहे. नगरभवनांत सभा आहे. ते एकदम उठले. त्यांनीं आपली पिशवी भरली. अंगावर घोंगडी टाकली. झप्झप् पावलें टाकीत ते गांवाकडे निघाले. ' नगरभवन ' कोठें आहे त्याची ते विचारपूस करूं लागले.

शेवटीं एकदांचें नगरभवन आलें. नगरभवनाभोवतीं बाग होती. अद्याप सभेस सुरवात झाली नव्हती. मुसलमानांच्या झुंडी येत होत्या. तरुणांचे मेळावे ठायीं ठायीं उभे होते. बागेंत मुलें फिरत होतीं. बागेंतील एका बाकावर स्वामी बसले. त्यांच्या तेजस्वी मूर्तीकडे सारे कुतूहलानें पाहात होते. पहाडासारखी धिप्पाड

ती मूर्ति होती. परंतु पुन्हा किती शांत व गंभीर! पाहाणाऱ्याच्या मनांत त्या मूर्तीबद्दल एकदम आदर व भक्ति उत्पन्न होई.

सभेचे अध्यक्ष आले. मंडळी सभागृहांत जाऊं लागली. स्वामीजीही सभागृहांत शिरले. तरुणांच्या घोळक्यांतच ते बसले. सभेस आरंभ झाला. नियुक्त वक्ते उभे राहिले व त्यांनीं पैगंबराविषयींची माहिती सांगितली. आपल्या धर्मस्थापकाबद्दलची माहिती एका हिंदूनें गोळा करून, आस्थापूर्वक मिळवून ती आपणांस सांगावी ह्याचें मुसलमानबंधूंस आश्चर्य वाटलें. मुख्य वक्त्याचें भाषण संपल्यावर अध्यक्षांनीं दुसऱ्या कोणास बोलावयाचें असल्यास परवानगी आहे असें सांगितलें.

कोणी उठतो का—श्रोते चौफेर पाहूं लागले. ते पाहा स्वामी उठले. सिंहाप्रमाणें खुर्चीजवळ गेले. त्या नवपुरुषाकडे सर्वांचें लक्ष वेधलें. हा मनुष्य कोण, कुठला, काय सांगणार? स्वामींची धीर गंभीर वाणी सुरू झाली. अत्यंत शांतता होती. लोक शब्दनूशब्द पिऊं लागले, हृदयांत सांठवूं लागले.

"मुसलमान बंधूंनो! आज मला किती आनंद होत आहे, ह्याची कल्पना तुम्हांला होणार नाहीं. आपलें ध्येय परार्धांशानें कां होईना कोठेंतरी प्रगट होत आहे हें पाहाण्यांत धन्यता असते. आज हिंदुस्थानभर हिंदुमुसलमानांचे तंटे होत आहेत. अशा अविश्वासाच्या काळांत आजच्यासारखा प्रसंग पाहावयास मिळणें म्हणजे सहारा वाळवंटांत झुळझुळ वाहणारा झरा भेटण्यासारखें आहे. बंधूंनो! ह्या भारतवर्षाचें एक महान् ध्येय आहे. तें ध्येय कधींही डोळ्यांआड करूं नका. परमेश्वराला भिन्न भिन्न संस्कृतींचे लोक ह्या भारतांत आणून, त्या सर्वांची एक महान् संस्कृति निर्माण करावयाची आहे. सर्व धर्मांचे व जातींचे लोक येथें आणून त्यांना गुण्यागोविंदानें नांदविण्याचा एक महान् प्रयोग भारतभाग्यविधाता करूं पाहात आहे. समुद्रांत हजारों प्रवाह येतात, म्हणून समुद्र पवित्र; त्याप्रमाणें भारतवर्ष हें पवित्र तीर्थ आहे. मानवी जीवनाचें विविधतेंतील ऐक्य पाहावयास जगांतील यात्रेकरू ह्या भारतभूमींत येतील. भारतीय इतिहासांतील हें सोनेरी सूत्र विसरूं नका.

"भारताला ऐक्याचा संदेश जगाला द्यावयाचा आहे. भेदभावांत अभेद पाहावयास शिका, हें भारत सांगत आहे. भारतांतच अद्वैत तत्त्वज्ञान कां निर्माण झालें? तत्त्वज्ञानें परिस्थितींतून जन्मास येत असतात. जरूरीमुळें ज्याप्रमाणें

भौतिक शास्त्रांत नवीन शोध लागतात त्याप्रमाणें सामाजिक जरूरीमुळेंच अध्यात्मिक शास्त्रांतही शोध लागत असतात. ह्या भारतवर्षाच्या भाग्यानें हजारों मानवप्रवाह येथें येतील. त्यांच्यांत संगीत निर्माण व्हावयास अद्वैताची जरूर होती. म्हणूनच तो महान् विचार येथें निर्माण झाला.

"बंधूंनो! हृदयें हृदयांत मिळावयास पाहिजे असतील तर परस्परांच्या संस्कृतींतील जें जें सत्य, शिव व सुंदर असेल त्याचा अभ्यास करावयास हवा. आपण पाश्चिमात्य ग्रंथ वाचतों. त्याच्या काव्यांतील वचनें पाठ म्हणतों. परंतु हिंदु कुराणांतील वचन व्याख्यानांत सांगणार नाहीं, किंवा मुसलमान गीतेंतील श्लोक म्हणणार नाहीं. परस्परांच्या संस्कृतींतील ही देवाण-घेवाण आपण अकबराच्या कारकीर्दीत करावयास लागलों होतों. परंतु ती गोष्ट आपण विसरलों. प्रत्यक्ष व्यवहारही सुंदर व मधुर करावयास आपण शिकत होतों. ईदच्या प्रार्थनेच्या वेळेस 'हिंदुमुसलमान ह्यांना सांभाळ,' असें मुसलमान म्हणतो. आधीं हिंदूचें नांव तो घेतो. मुसलमानी राजांनीं हिंदु देवस्थानांना व हिंदु राजांनीं मुसलमानी पीरांना व दर्ग्यांना देणग्या दिलेल्या आहेत. आपण ह्या विशाल भारताची पूजा करावयास शिकत होतों. तें भव्य, दिव्य कर्म पुन्हा नव्यानें सुरू करू या.

"सूर्यफुलाची अशी गंमत सांगतात कीं जिकडे जिकडे सूर्य वळेल, तिकडे तिकडे तें तोंड करतें. आपलीं मनें अशींच झालीं पाहिजेत. जेथून जेथून प्रकाश मिळेल, तेथून तेथून तो घेऊन आपण आपला विकास करून घेतला पाहिजे. एकमेकांचें वाईट पाहाणें हें मानवांना शोभत नाहीं. गिधाडाची दृष्टि सडलेल्या मांसखंडावर असते, त्याप्रमाणें आपण होतां कामा नये. सुफी कवींनीं म्हटलें आहे, 'अरे, तुझ्या मशिदीचा दगड भंगला तरी चालेल, परंतु दुसऱ्याच्या दिलाची मशीद नको फोडूं.' आमच्या संतांनींही सांगितलें आहे कीं,

**"कोणाहि जीवाचा न घडो मत्सर। वर्म सर्वेश्वर पूजनाचें॥"**

"दोन्ही धर्मांतील संतांनीं एकच प्रेमाचा व शांतीचा संदेश दिला आहे. इस्लाम ह्या शब्दाचा अर्थ काय? इस्लाम म्हणजे शांति! आणि हिंदूंच्या प्रत्येक मंत्राच्या शेवटीं 'ॐ शांतिः शांतिः शांतिः' असेंच म्हटलेलें असतें. ज्या धर्मांचा अवतार शांतीसाठीं आहे, त्या धर्मांनीं आग लावीत सुटणें हें योग्य नाहीं.

" ह्या हिंदुस्थानचा इतिहास हिंदुमुसलमानांनीं बनविला आहे. अशोक व अकबर, प्रताप व शीरशहा, अहल्याबाई व चांदबिबी, कबीर व चैतन्य सर्वांनीं ही इमारत रचीत आणली आहे. आग्र्याचा ताजमहाल व अजिंठ्याचीं लेणीं ह्यांनीं ह्या संस्कृतींत भर घातली आहे. इस्लामी गुलाब व आर्यांचें पवित्र कमळ, दोन्ही एके ठिकाणीं आलीं आहेत. एकमेकांस नांवें न ठेवतां पुढें जाऊं या. एकमेकांवर बहिष्कार न घालतां सहकार्य करा, सख्य जोडा. मुसलमानांचीं आतां येथेंच घरेंदारें, येथेंच शेतीवाडी; येथेंच पूर्वजांचीं कबरस्थानें. हा भारतवर्ष त्यांना आपलासा वाटला पाहिजे. भारतीय भवितव्यतेशीं त्यांनीं लग्न लाविलें पाहिजे. हिंदूंनींही त्यांना जवळ करावें. मुसलमान सारे वाईट असा मंत्र जपत बसूं नये. आपलें तत्त्वज्ञान निराळा मार्ग सांगत आहे. 'अहं ब्रह्माऽस्मि व तत्त्वमसि' हा आपला मार्ग आहे. मी ब्रह्म आहें व तूंही ब्रह्म आहेस. मी चांगला आहें व तूंही चांगला आहेस. राम, राम. मी राम व तूं राम. आपण सारीं देवाचीं लेंकरें. आपण दैवी आहोंत, दानवी नाहीं. हा मंत्र आपणांस जपावयाचा आहे. शिक्षणशास्त्रज्ञ म्हणतात, 'मुलाला दगड म्हटलेंत तर तो खरोखरच दगड होईल.' त्याप्रमाणेंच आपण मुसलमानांस ते वाईट आहेत, वाईट आहेत, असें सारखें म्हटलें, तर ते वाईट नसले तरी वाईट होतील. जो वाईट असेल त्याचेंही लक्ष त्याच्यामधील दिव्यतेवर, त्याच्यामधील संदेशावर आपण खिळविलें पाहिजे. ह्या उपनिषत्प्रणीत शास्त्रशुद्ध सनातन मार्गानेंच एकमेकांस श्रद्धेनें सुंदर करीत आपण पुढें गेलें पाहिजे.

" आज महंमदाची पुण्यतिथि ! त्या महापुरुषाबद्दल मी काय सांगूं ? त्यांची केवढी श्रद्धा. किती तळमळ, किती नम्रता ! भटक्या अरबांना त्यांनीं एकत्र आणिलें. त्यांनीं स्त्रियांचा महिमा वाढविला. ऐक्याचा संदेश दिला. तुझ्या शेजारीं तुझा भाऊ उपाशी असेल तर त्याला अर्धी भाकर नेऊन दे असें सांगितलें. व्याज घेऊं नको असें बजाविलें. स्वावलंबी व्हावयास त्यांनीं शिकविलें. एका भीक मागणाऱ्याला त्यांनीं लाकडें तोडण्याचा धंदा करावयास लाविलें. 'मला महंमदाला ईश्वरी ज्ञान झालें आहे, असें जगांत इतरही महात्म्यांना झालें असेल, त्यांनाही तुम्ही मान द्या.' असें कुराणांत स्वच्छ सांगितलें आहे. महापुरुषाच्या शिकवणींतील दोषता ही कालोद्भव असते. महापुरुषाला परिस्थिति

पाहून उपदेश करावा लागतो. तो उपदेश म्हणजे त्याचें हृदयसर्वस्व नसतें. त्या उपदेशाचा आपण विकास करावयास हवा.

" महंमदाच्या मरणाच्या वेळचा केवढा उदात्त प्रसंग! त्या वेळचे शब्द कधीं विसरूं नका. महंमद म्हणाले, 'मी कोणाचें देणें नाहीं ना? कोणाचें ऋण फेडल्याशिवाय नाहीं ना मी राहिलों? बोला, माझी मान येथें खालीं झाली तरी चालेल, परंतु तेथें देवासमोर ती खालीं न होवो.'

" थोर शब्द! ज्यायोगें देवासमोर मान लाजेनें खालीं घालावी लागेल असें कांहींही करूं नका. पैगंबराची ही शेवटची आज्ञा आहे. ह्यांत सर्व धर्मांचें सार आहे. मरणकाळच्या क्षणांत आपलें सारें जीवन पुंजीभूत होऊन येऊन बसतें. साऱ्या जीवनाचा अर्थ मरणकाळच्या उद्गारांत प्रकट होत असतो. महंमदाच्या सर्व जीवनाचा काय अर्थ? देवासमोर मान खालीं करावयास लावणारें कोणतेंही कर्म करूं नको, हा तो अर्थ होय. मी तुम्हांस जास्त काय सांगूं? मी वाऱ्याप्रमाणें हिंडणारा एक प्रवासी आहें. तुमचा माझा परिचय नाहीं. उणें अधिक बोलल्याबद्दल क्षमा करा."

असें बोलून स्वामीजी जाऊं लागले. अध्यक्षांनीं उठून त्यांना आपल्या जवळच्या खुर्चीवर बसविलें. स्वामीजींचें व्याख्यान सारा श्रोतृसमाज स्तब्धतेनें ऐकत होता. सर्वांचीं हृदयें व मनें दिव्य वातावरणांत गेलीं होतीं. स्वामींच्या शब्दांत जिव्हाळा होता, तळमळ होती, कळकळ होती. तळमळ कोणाला जिंकून घेणार नाहीं? कळकळ कोणाच्या हृदयाला समभाव करणार नाहीं?

अध्यक्षांनीं फार न बोलतां समारोप केला. स्वामींच्याभोवतीं लोक गोळा झाले. तेथून जावें असें कोणास वाटेना. फुलांपासून दूर जावें असें कोणास वाटेल? दिव्य संगीत सोडून जावें असें कोणास वाटेल? कोणी स्वामींना प्रश्नही विचारूं लागले. स्वामीजी शांतपणें त्यांना उत्तरें देत होते. एक मुसलमान म्हणाला, " तुम्ही हिंदु तर मूर्तिपूजक आहांत, तुमचें आमचें कसें पटावें?"

स्वामी म्हणाले, " आपण सारेच मूर्तिपूजक आहोंत. मूर्ति म्हणजे का केवळ दगडी आकृति? ज्याच्यावर आपण प्रेम करतों ती मूर्तिच असते. कुराण ही तुमची मूर्ति आहे, महंमद ही तुमची मूर्ति आहे. मग महंमदाचे दगडी पुतळे किंवा रंगीत चित्रें असोत वा नसोत. महंमद म्हणतांच तुमच्या मनांत कांहीं भाव उत्पन्न होतात कीं नाहीं? खरें पाहिलें तर हिंदुच मूर्तिपूजक असूनही

मूर्तिपूजक नाहींत व बाकी इतर धर्म मूर्तिपूजक नसूनही मूर्तिपूजक बनले आहेत. हिंदु स्वतःचें तेवढें खरें असें मानीत नाहीं. तो मूर्तिपूजक असूनही मूर्तींच्या पलीकडे जातो. जगांतील सारे संत, सारे धर्म, सारे थोर पुरुष ह्यांना तो तुच्छ मानीत नाहीं. ह्याच्या उलट तुम्ही महंमद व कुराण ह्या पलीकडे पाहाणार नाहीं. ख्रिस्ती मनुष्य बायबलच्या पलीकडे जाणार नाहीं. म्हणजे तुम्ही आपल्या मूर्ति कायमच्या करून ठेवल्या आहेत. तुम्ही मूर्तींच्या पलीकडे जात नाहीं. त्याच दोन गोष्टींना फक्त सत्य मानाल. आतां ह्यावरूनच कोण अधिक मूर्तिपूजक तें तुमच्या ध्यानांत येईल. आपण मूर्तिपूजक व मूर्तिभंजक दोन्ही प्रकारचे असूं तरच विकास होईल. लहानपणीं मी कुटुंबाची मूर्ति पूजीत होतों. पुढें ती मूर्ति फोडली. मी समाजाची मूर्ति पुजूं लागलों. पुढें तीही फुटली व मी सर्व देशाची मूर्ति पुजूं लागलों. एक दिवस तीही फुटेल व सर्व मानवजात माझी मूर्ति बनेल. तीही मूर्ति मला अपुरी पडेल व भगवान् बुद्धांप्रमाणें सर्व सचेतन सृष्टीची मी पूजा करीन. ह्याप्रमाणें लहान ध्येयांच्या मूर्ति फोडीत, उत्तरोत्तर विशाल ध्येयांच्या मूर्ति पूजीत आपणांस पुढें जावयाचें आहे व एक दिवस ह्या सर्व चराचर सृष्टीलाच आपण वंदन करूं व 'आनंदें सागर हेलावती' अशी आपली स्थिति होईल. म्हणून आम्ही हिंदु मूर्ति करतों व मूर्ति बुडवितों. टर उडविण्यासारख्या ह्या गोष्टी नाहींत."

एक मुसलमान म्हणाला, "कुराण आम्हांला मान्य आहे. तें एक आम्ही ओळखतों."

स्वामींनीं त्याला विचारलें, "कुराण ह्या शब्दाचा अर्थ तुम्हांला माहीत आहे?"

तो म्हणाला, "नाहीं."

स्वामी म्हणाले, "कुराण म्हणजे हृदय पिळवटून निघालेला उद्गार! जो जो हृदय पिळवटून उद्गार निघाला असेल, त्याला वंद्य मानिलें पाहिजे. असें करणें म्हणजेच कुराण मानणें होय. रामकृष्ण परमहंस, 'देवा, केव्हां रे भेटशील,' असें रडत म्हणत. तुकाराममहाराज, 'भूक लागली नयना,' असें म्हणत. ते उद्गार म्हणजे कुराणच आहे. हें विशाल कुराण पाहा."

एक हिंदु गृहस्थ म्हणाले, "आमची महाराष्ट्राची परंपरा निराळी आहे. श्रीशिवछत्रपति व समर्थ ह्यांची शिकवण म्हणजे आमचा वेद."

स्वामी म्हणाले, " त्यांची शिकवण व माझी शिकवण ह्यांत फरक नाहीं. शिवाजीमहाराज मुसलमान तेवढा कापावा असें नव्हते म्हणत. त्यांच्या आरमारावर मुसलमान अधिकारी होते. मुसलमान भगिनींस त्यांनीं किती थोरपणानें वागविलें. ते अन्यायाचे शत्रु होते. धर्माचे नव्हते. त्यांनीं चंद्रराव मोरेही मारले व अफजुलखानही मारला. अन्याय करणारा स्वकीय वा परकीय ही भाषा त्यांच्याजवळ नव्हती. समर्थांच्या शिकवणीचीही आपण वाढ केली पाहिजे. ' मराठा तितुका मेळवावा ' हा समर्थांचा संदेश. मराठा म्हणजे का मराठा ? मराठा म्हणजे महाराष्ट्रांतील ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र सारे. पेशव्यांच्या काळांत ' मराठा तितुका मेळवावा ' हा संदेश अपुरा पडला. त्या वेळेस जाट, रजपूत वगैरे लोकांशीं मराठ्यांचा संबंध आला. ' हिंदु तितुका मेळवावा ' असा संदेश देणारा समर्थ त्या वेळेस पाहिजे होता. परंतु तो न मिळाल्यामुळें मराठे घसरले व सर्वांचे शत्रु झाले. आजच्या काळांत ' हिंदु तितुका मेळवावा ' हा मंत्रही अपुरा ठरेल. ' आज हिंदी तितुका मेळवावा ' असा मंत्र सांगणारा पाहिजे आहे. नामदार गोखले, महात्मा गांधी हा युगमंत्र देत आहेत. मंत्रांतील अर्थ वाढत जात असतो. समर्थांनीं सांगितलें आहे,

**' घालून अकलेचा पवाड । व्हावें ब्रह्मांडाहुनी जाड ।**
**तेथें कैचें आणिलें द्वाड । करंटेपण ॥ '**

आपापली बुद्धि विशाल करून सर्व ब्रह्मांडाला मिठी मारावी असें करण्याऐवजीं आपापलीं क्षुद्र घरें बांधून अभागी कां होतां ? लहान लहान जथे निर्माण करून तेवढ्यांतच भिकाऱ्यासारखे कां राहातां ? विश्वाचा वारसदार तूं आहेस. संकुचित कुंपणें घालीत नको बसूं. हें ध्येय कधींही दृष्टीआड आपण करतां कामा नये. हा भारताचा तर मोठेपणा आहे. तोच जर आपण गमावून बसलों तर काय शिल्लक राहिलें ? "

हळूहळू लोक जाऊं लागले. स्वामीही निघाले. कोठें जाणार ते ? त्यांची कोणीं चौकशीही केली नाहीं. ते कुठें उतरले, कुठें जेवले — कोणीं विचारलें नाहीं. स्वामींना त्याची चिंता नव्हतीच. ते गांवांतून हिंडत बोरी नदीच्या तीरावर पुन्हा आले. जेथें संत सखाराममहाराजांची समाधि आहे, तेथें ते आले. बोरीचा प्रवाह शांतपणें वाहात होता. ही समाधि कोणाची वगैरे चौकशी स्वामींनीं आसपासच्या मुलांजवळ केली. देवदर्शनास लोक येत जात होते.

स्वामीजी समाधीजवळ बसून राहिले. त्यांना वाईट वाटत होतें. संशयाचीं पिशाचें सर्वांच्या मानगुटीस बसलेलीं पाहून त्यांना खेद झाला. महाराष्ट्रांतून विशाल दृष्टि विलुप्तच झाली का ? उंच उंच गगनचुंबी पर्वत ज्या महाराष्ट्रांत ठायीं ठायीं उभे आहेत, त्या महाराष्ट्रांतील जनतेचीं मनें उंच कां नसावींत ? युगधर्म नाहीं का कोणी ओळखणार ? भारतवर्षाचें महान् ध्येय—त्या ध्येयाभोवतीं यावें, त्या ध्येयार्थ झिजावें, मरावें असें कां बरें कोणास वाटत नाहीं ?

ते एकदम उठले. त्यांनीं समाधीवर मस्तक ठेवलें. ते म्हणाले, "देवा, तुझे पाय व माझें डोकें ह्यांची तरी ताटातूट होऊं देऊं नको. माझ्या डोक्यांत नेहमीं तुझ्याच पायांचें स्मरण असूं दे आणि तुझे पाय म्हणजे काय !

'पादोऽस्य विश्वा भूतानि ।'

हे सर्व प्राणी म्हणजे तुझे पाय. तुझ्या पायांचें स्मरण करणें म्हणजे सर्व प्राणिमात्रांचें स्मरण करणें. मुसलमान, ख्रिस्ती, पारशी कोणीही मला भेटो ; तुझे पाय मला तेथें दिसूं देत. महार, मांग, चांडाळ भेटो. तुझेच पाय तेथें मला दिसोत.

"जेथें तेथें देखे तुझींच पाउलें
सर्वत्र संचरलें तुझें रूप"

असें मनांत म्हणतां म्हणतां स्वामी गहिंवरून गेले. केवढे उदात्त विचार ! हिमालयांतील शुभ्र, स्वच्छ गौरीशंकर शिखराप्रमाणें हे विचार उच्च आहेत. भारताच्या उशाशीं हिमालय आहे. भारताच्या डोक्यांत हेच थोर विचार सदैव घोळत आले आहेत. परंतु हिमालयांतील बर्फ वितळून खालच्या नद्यांना पूर येतात. खालची सारी भूमि समृद्ध होते. त्याप्रमाणें हे डोक्यांतील विचार खालीं संसारांत कधीं येणार ? प्रत्यक्ष व्यवहारांत प्रेमाचे प्रवाह कधीं वाहूं लागणार ? समाज सुखी व समृद्ध कधीं होणार ?

ह्या थोर विचारांचा अनुभव घ्यावयास भारत अजून कां उठत नाहीं ? संतांचीं सारीं संतानें कां उठत नाहींत ? उठतील, उठतील. जेथें हे विचार स्फुरले, तेथें एक दिवस ते मूर्तही होतील. भारतीयांनो, महान् कार्य तुमची वाट पाहात आहे. तुम्ही क्षुद्र गोष्टींत काय लोळत पडलां आहांत ? सर्व जगाला, सर्व विचारांना मिठी मारावयास उठा. सारें बळ तुमचेंच आहे. सारी शक्ति तुमचीच आहे. आपली शक्ति दूर लोटून, तुम्ही पंगु व दुबळे होत आहांत. तुम्ही अस्पृश्यांना दूर करतां व स्वतःचें बळ कमी करतां. ब्राह्मण ब्राह्मणेतर एकमेकांस दूर करतात

व आपलें सामर्थ्य कमी करून घेतात. अरे, आपापले हातपाय तोडतां काय? तुम्ही कोट्यवधि शिरांचे व कोट्यवधि हातांचे आहांत. आपलीं डोकीं व आपले हात तुम्ही आपण होऊन काय छाटीत बसलांत? केवढें तुमचें भाग्य, केवढें तुमचें सामर्थ्य! अरे करंट्यांनो! तें दूर नका फेकूं, दूर नका लोटूं.

चंद्राला पाहून समुद्रावर लाटा उसळतात. त्याप्रमाणें ध्येयचंद्र डोळ्यांसमोर आल्यामुळें स्वामीजींचें हृदय शतविचारांच्या लाटांवर नाचत होतें. ती समाधि, तो सरित्प्रवाह, तेथील वाळवंट, त्या सर्व वस्तु एकच गोष्ट त्यांना सांगत होत्या. अनेक दगड एकत्र आले, संयमपूर्वक एकत्र आले व समाधि उभी राहिली. एकेक जलबिंदु प्रेमानें जवळ आला व नदी वाहूं लागली. एकेक कण जवळ आला व वाळवंट बनलें. स्वामींनीं वर पाहिलें. एकेक तारा जवळ येऊन सारें आकाश फुललें होतें. स्वामींनीं दूर पाहिलें. एकेक मृत्कण जवळ येऊन ती दूर टेकडी उभी होती. सजीव, निर्जीव सृष्टि एकत्वाचा संदेश सांगत होती.

शब्द एकत्र येतात, सारस्वतें बनतात. फुलें एकत्र येतात व हार गुंफिले जातात. सूर एकत्र येतात व दिव्य संगीत निर्माण होतें. शेंकडों हाडें एकत्र येतात व हा देह बनतो. ह्या देहांत केवढें सहकार्य, किती प्रेम! पायाला कांटा बोंचला तर वरच्या डोळ्यांना पाणी येतें! ह्या लहानशा देहांत सारा वेदान्त भरलेला आहे. सारीं शास्त्रें येथें ओतलेलीं आहेत. परंतु कोण पाहातो? आंधळे, सारे आंधळे!

समाधीच्या पायऱ्यांवरून स्वामी खालीं उतरले. नदीच्या पाण्यांत ते शिरले. त्यांच्या डोळ्यांतील भावगंगा खालीं वाहात होती. ते खालीं वाकले व म्हणाले, "हे सरिते! तूं सागराकडे जात आहेस. मानवजात ऐक्यसागराकडे कधीं ग जाईल? सांग, सांग—हे जगन्माते, सांग, सांग."

"बाळ! मानवजात ऐक्यसागराकडेच जात आहे. तूं घाबरूं नकोस. नदी वाकडी गेली, तरी सागराकडेच तिची चाल असते. मानवजातीचीं पावलें कधीं वाकडीं पडतील, परंतु शेवटीं मानवजात प्रेमसागराकडेच जाणार!" नदी न बोलतां बोलली.

स्वामीजी तेथल्या शिलाखंडावर बसले. डोळे मिटून बसले. ते का प्रार्थना करीत होते? का आपल्या अंतःसृष्टींत ते दिव्य ऐक्यसंगीत ऐकत होते?

ते पाहा दोन तरुण येत आहेत. त्यांना कोण पाहिजे आहे? इतक्या रात्रीं ते का देवदर्शन घ्यावयास आले होते?

" अरे, तेथें ते खडकावर बसले आहेत ; तेच ते. " एकजण म्हणाला.

" होय ; चल त्यांच्याजवळ जाऊं. परंतु त्यांच्याजवळ काय बोलावयाचें ? " दुसरा म्हणाला.

" आपण आणलेला फराळ त्यांच्यासमोर ठेवूं व वंदन करूं. न बोलतांच जें बोलतां येईल तें बोलूं. " पहिला म्हणाला.

दोघे स्वामींच्याजवळ येऊन उभे राहिले. जयविजय उभे होते. तरुण भारत स्वामींच्याजवळ उभा राहिला होता. हिंदुमुसलमानांचा संयुक्त महान् भारत त्यांच्या हाकेला ओ देऊन तेथें आला होता.

" येणार, येणार, मानवजात शेवटीं एकत्र येणार, " एकदम स्वामी मोठ्यानें म्हणाले. त्यांनीं डोळे उघडले. त्यांच्यासमोर दोन तरुण उभे होते. वरती आकाशांतील तारे पावित्र्याच्या तेजानें थरथरत होते. ते दोन तरुणही कांपत होते. त्यांच्या तोंडांतून शब्द बाहेर फुटेना. शेवटीं मुजावर म्हणाला, " स्वामीजी. "

" काय पाहिजे तुम्हांला? तुम्ही माझ्याकडे कां आलां आहांत? बसा, " स्वामी प्रेमळ वाणीनें म्हणाले.

ते दोघे युवक खालीं बसले. मधून ते स्वामींच्या तोंडाकडे बघत, मधून खालीं बघत.

" काय हवें तुम्हांला ? " स्वामींनीं विचारलें.

" कांहीं नको, " कृष्णा म्हणाला.

" मग सहज आलेत ? " त्यांनीं पुन्हा विचारलें.

" आम्हीं तुम्हांला फराळाचें आणलें आहे. दूध आणलें आहे, " कृष्णा म्हणाला.

" थोडे शेंगांचे दाणेही आणले आहेत, " मुजावर म्हणाला.

" माझी भूक तुम्हांला कोणीं सांगितली ? " स्वामींनीं विचारलें.

" आमच्या मनानें, " कृष्णा म्हणाला.

" काढा तर फराळाचें. आपण तिघे फराळ करूं या, " स्वामी म्हणाले.

स्वामींनीं हातपाय धुतले. तेथें एक रुमाल पसरण्यांत आला. त्यावर शेंगदाणे ठेवण्यांत आले. स्वामीजी खाऊं लागले. ते त्या तरुणांनाही देत होते.

" तुम्ही संकोच नका करूं. घ्या," ते त्यांना म्हणाले.

" तुम्हीच भुकेले असाल. तुम्हीच खा. आम्ही जेवून आलों आहोंत," कृष्णा म्हणाला.

" तुम्ही खा. आम्ही तुमच्याकडे बघत राहातों," मुजावर म्हणाला.

" तुमचें नांव काय ?" स्वामींनीं प्रश्न विचारला.

" मुजावर."

" आणि तुमचें ?"

" कृष्णा."

" वाः ! माझ्यासमोर माझा ध्येयभूत भारत मी पाहात आहें. खरेंच, केवढा धन्यतेचा क्षण, केवढी पवित्र वेळ ! या, मला भेटा. तुम्हां दोघांना मला हृदयाशीं धरूं दे " असें म्हणून स्वामींनीं त्या दोघांना उराशीं धरिलें.

तिघे दूर झाले. खाणेंपिणें केव्हांच संपलें. शेवटीं स्वामीजी म्हणाले, " ह्या तुमच्या अमळनेरांत आज मला कधीं न मिळालेला मेवा मिळाला. माझ्या आत्मारामाची कधीं न शांत झालेली भूक आज येथें थोडी फार शांत झाली. धन्य आहे हा गांव, धन्य ही संतभूमि. नवभारताचा, नवमहाराष्ट्राचा अभिनव जन्म येथें मी पाहात आहें. मला येथें आशा मिळाली, उत्साह मिळाला, नवचैतन्य मिळालें."

" तुम्ही येथेंच राहाल ?" मुजावरनें प्रश्न विचारला.

" तुम्ही येथें राहाल तर किती सुरेख होईल !" कृष्णा म्हणाला.

" मला कांहींच सांगतां येत नाहीं. मी आज सुखावलों आहें खरा. आज मला थोडी शांत निद्रा येईल," स्वामी म्हणाले.

" चला आमच्याकडेच," कृष्णा म्हणाला.

" नको. मी त्या टेकडीवरच्या शिवालयांत जातों. तेथेंच देवाच्या पायांशीं मला झोपूं दे. देवाच्या विशाल आकाशाखालीं झोपूं दे," स्वामी म्हणाले.

" हें एवढें दूध प्या ना. आमच्याकडच्या गायीचें आहे," मुजावर म्हणाला.

" तुझ्याकडच्या गायीचें ! दे, दे " असें म्हणून अधीर होऊन तें भांडें स्वामींनीं ओढून घेतलें व तें रिकामें केलें.

" आम्ही जातों," कृष्णा म्हणाला.

" मीही जातों," स्वामी म्हणाले.

त्या टेकडीवर येऊन स्वामींनीं घोंगडी घातली. त्या घोंगडीवर मृत्युंजय शिवशंकराच्याजवळ स्वामी झोपीं गेले. भारताच्या दिव्य भाग्यासाठीं तळमळणारा तो आत्मा तेथें झोपीं गेला.



## २

# संन्याशाचा संसार

हृदयांत सेवा
वदनांत सेवा
उतरे न हातांत करूं काय देवा।

पहाटेची वेळ होत आली. थंडगार वारा सुटला होता. स्वामीजींना रात्रीं गाढ झोप लागली होती. ते आज अजून कसे बरें उठले नाहींत ? प्रार्थनेची वेळ तर होत आली. अमळनेरच्या मिलचा तो पाहा भोंगा झाला. स्वामी एकदम जागे झाले. ते उठले. क्षणभर अंथरुणांत ते बसले. नंतर ते नदीवर गेले. शौचमुखमार्जन त्यांनीं केलें. स्नानही त्यांनीं उरकून घेतलें.

आतां चांगलेंच उजाडलें. प्रकाश सर्वत्र पसरला. मिलमध्यें जाणाऱ्या लोकांची रांग लागली होती. मिलच्या चिमणींतून काळ्याकुट्ट धुराचे लोट वर जात होते व सर्वत्र पसरत होते. तिकडून ईश्वराचा पवित्र प्रकाश पसरत होता आणि इकडून मानवाच्या यंत्रांतील काळे धुराचे लोट वर जात होते. देव मानवाला वरून प्रकाश देत आहे; मानव त्याला धुराचे लोट परतभेट म्हणून पाठवीत आहे. त्या मिलमधील हजारों मजुरांचीं निराशेनें व उपासमारीनें काळवंडलेलीं जीवनें म्हणजेच तो धुराचा लोट होय. त्या हजारों स्त्रीपुरुषांचीं दुःखें, त्यांचे अपमान, त्यांच्या यातना, त्यांचे अविश्रान्त श्रम, त्यांचे अश्रु, त्यांचे कढत सुस्कारे ह्या सर्वांचा तो लोट बनला होता. ईश्वराच्या कानांवर सारी दुःखाची कहाणी घालण्यासाठीं हा लोट सारखा जात असतो. परंतु देव ऐकेल तेव्हां ऐकेल !

तो मिलचा धूर पाहून स्वामीजी अशान्त झाले. प्रभातकाळची प्रसन्न वेळ होती. नवीन आशा, नवीन उत्साह हृदयांत सांठविण्याची ती वेळ होती. परंतु उजाडलें नाहीं तों हजारों गरिबांना पिळून काढणारी ती गिरणी पाहून स्वामींचा आनंद मावळला. ' कोण मला विरोध करणार? मी हजारों जिवांचे बळी घेणार! हजारोंना बेकार करून त्यांचे घरचे धंदे मारून, येथें माझ्या पायांशीं त्यांना लोटांगण घालावयास मी लावणार! हजारों जिवांची अब्रू मी धुळींत मिळवीन. मी लहान मुलें पाहाणार नाहीं, स्त्री-पुरुष पाहाणार नाहीं, अशक्त सशक्त पाहाणार नाहीं. थंडी असो, उन्हाळा असो. दहा दहा तास मी सर्वांना येथें उभें करणार! त्यांना घाणेरड्या चाळी राहावयास देणार, पत्रे तापून आंत मुलें उकडून निघतील अशा झोपड्या मी त्यांना बांधून देणार! माझी सत्ता कोण दूर करील? माझ्या मालकांच्या मोटारी कोण अडवील? माझ्या धन्यांचे राजविलासी बंगले कोण धुळींत मिळवील? अशी घोषणा ती गिरणी पहाटेपासून करीत असते. साऱ्या जगाला उजाडलें नाहीं तों अशी धमकी गिरणी देत असते. सायंकाळीं पुन्हा तशीच धमकी देते.

स्वामीजी त्या धुराकडे पाहात राहिले. परंतु किती वेळ पाहाणार! ते आपल्या घोंगडीवर येऊन बसले. ते कांहीं पदें गुणगुणत होते, कांहीं अभंग म्हणत होते. एक पद दुसऱ्या पदास जन्म देई, एक अभंगाचा चरण दुसऱ्या चरणास जन्म देई. जो चरण आवडे, तो स्वामी स्वतःशींच पुन्हा पुन्हा घोळून घोळून म्हणत. मध्येंच डोळे मिटीत व मध्येंच उघडीत. मध्येंच टिचक्या वाजवीत, हातानें ताल धरीत.

**एक वेळ करी या दुःखावेगळें**
**दुरिताचें जाळें उगवावें।**
**आठवीन पाय हा माझा नवस**
**पुरवावी आस पांडुरंगा॥**

हे चरण ते पुन्हा पुन्हा घोळीत होते. ' आठवीन पाय हा माझा नवस, ' हा चरण म्हणतां म्हणतां ते तल्लीन झाले.

शेवटीं ते उठले. गांवांत जावें असें त्यांच्या मनांत आलें. त्यांनीं घोंगडी उचलली, झटकली. इतक्यांत कोणीतरी आपल्याकडे येत आहे असें त्यांना वाटलें.

ते एक चाळिशीच्या वयाचे गृहस्थ होते. अंगावर खादीचीं वस्त्रें होतीं. त्यांचें कपाळ उंच होतें. डोळ्यांत एक प्रकारचें भावनांचें पाणी खेळत होतें. त्यांच्याबरोबर दोन मुलेंही होतीं. तीं तिन्ही माणसें स्वामींकडे आलीं. त्या तिघांनीं स्वामींना प्रणाम केला. स्वामींनीं त्यांना केला. स्वामी घोंगडी पसरूं लागले. इतक्यांत त्या दोन मुलांनीं ती घोंगडी त्यांच्या हातांतून घेतली व नीट खालीं घातली. स्वामी म्हणाले, " बसा. " ते सभ्य गृहस्थ बसले. तीं दोन मुलें विनयानें जरा बाजूला बसलीं. स्वामीही बसले.

" आपण मला भेटावयास आलांत ? " स्वामींनीं आरंभ केला.

" होय, " ते गृहस्थ म्हणाले.

" कांहीं काम आहे, कीं सहज आलांत ? " स्वामींनीं विचारलें.

" आपला परिचय व्हावा म्हणून आलों आहों, " ते गृहस्थ म्हणाले.

थोडा वेळ कोणीच कांहीं बोललें नाहीं. सूर्यचंद्रासारखे, गुरुशुक्रासारखे ते दोघे तेथें शोभत होते. गंगेस यमुना आली होती, कृष्णा गोदावरीस भेटूं पाहात होती.

" आपण कोठून आलांत ? " त्या गृहस्थांनीं विचारलें.

" कोठून असें काय सांगूं ? मी भटकत असतों, हिंडत असतों. कधीं पायीं, कधीं आगगाडीनें मी फिरत असतों. जेथें उतरावेंसें वाटेल तेथें उतरतों. माझें जीवन म्हणजे वाऱ्यावरची वावडी आहे, " स्वामी म्हणाले.

" ह्या वावडीला परमेश्वर उडवीत असला, तर सारें भलेंच होईल. तुम्ही आपल्या जीवनाचा पतंग त्याच्या हातांत दिला आहे ना ? तो तुम्हांला इकडे तिकडे नाचवीत आहे ना ? " ते गृहस्थ म्हणाले.

" शेवटीं तसेंच सर्वांना म्हणावें लागतें, " स्वामीजी म्हणाले.

" आपलें नांव काय ? " त्या गृहस्थांनीं विचारलें.

" मला आतां जग स्वामी ह्या नांवानेंच हाक मारतें. तसें पाहिलें तर मी स्वामी कशाचाच नाहीं. ना जगाचा, ना स्वतःचा. मी नाममात्र स्वामी आहें, " स्वामी हसत म्हणाले.

" तुम्ही कायमचे कोठें नाहीं का राहात ? "

" एके काळीं तसा राहाण्याचा प्रयत्न केला, परंतु मला समाधान होईना. मी मेघासारखा स्वैरसंचार करीत असतों, " स्वामी म्हणाले.

" मेघाप्रमाणें वर्षाव करतां, कोरडीं जीवनें ओलीं करतां, संदेशाची गर्जना करतां. "

" कोरडी गर्जना करणारेही मेघ असतात, " स्वामी म्हणाले.

" परंतु त्यांचें स्वरूप एकदम कळतें. तें लपत नाहीं. तुमचें कालचें भाषण आम्हां सर्वांना आवडलें. "

" छट्. तें आवडणें शक्य नाहीं. उगीच खोटें सांगूं नका, " स्वामी म्हणाले.

" खरोखरच तुमचे विचार मला आवडले. माझ्या हृदयांत तेच विचार आहेत. ते बोलून दाखविण्याचें धैर्य व सामर्थ्य माझ्याजवळ नाहीं. "

" काय, तुमचेही विचार असे आहेत ? हे विचार स्वाभिमानहीनतेचे तुम्हांस नाहीं वाटत ? महाराष्ट्राचा अपमान करणारे आहेत असें नाहीं वाटत ? " स्वामींनीं विचारलें.

" नाहीं. महाराष्ट्र तीन शतकें मागें यावा असें मला वाटत् नाहीं. प्राचीन इतिहासांतील स्फूर्ति व त्याग घेऊन आजच्या नवीन ध्येयांना आपण कवटावळें पाहिजे. "

" तुमचें नांव काय ? " स्वामींनीं विचारलें.

" गोपाळराव, " ते गृहस्थ म्हणाले.

" तुम्ही काय करतां ? " स्वामींनीं विचारलें.

" मीं येथें एक छात्रालय चालविलें आहे, " गोपाळराव म्हणाले.

" शाळेला जोडून आहे कीं स्वतंत्र आहे ? "

" स्वतंत्र आहे. "

" किती आहेत मुलें ? "

" दीडशें मुलें आहेत ! " गोपाळराव जरा अभिमानानें म्हणाले.

" तुमचें छात्रालय विशिष्ट जातीसाठीं आहे कीं काय ? "

" नाहीं. तें सर्वसंग्राहक आहे. सर्व जातींचीं व धर्मांचीं मुलें आहेत. "

" किती आनंदाची गोष्ट ! नाहीं तर आज पाहावें तों प्रत्येक जातीजातींचीं छात्रालयें निघालीं आहेत. गुजर बोर्डिंग, लेवा बोर्डिंग, मराठा बोर्डिंग, शिंपी बोर्डिंग ! काय आहे समजत नाहीं. अशा संकुचित संस्थांतील मुलें आपापल्या जातीपुरतेंच पाहाणारीं होतात. त्यांना व्यापक दृष्टिच येत नाहीं. नवभारत

निर्माण करावयाचा आहे. परंतु एकीकडे पाहावें तों ह्या छकलें छकलें करणाऱ्या वृत्तीस ऊत येत आहे, " स्वामीजी म्हणाले.

" जोडण्यापूर्वीचें हें तोडणें आहे. नवीन माळ गुंफण्यासाठीं प्रत्येक मणी स्वच्छ होत आहे, " गोपाळराव म्हणाले.

" स्वच्छ होत आहे कीं अहंकारानें बुजत आहे, कुणास ठाऊक? भारतीय बंधुत्वाचें पुण्यमय अखंड सूत्र स्वतांत घालून घेण्यास हे मणी तयार होतील का ? " स्वामींनीं शंका प्रकट केली.

" श्रद्धेनें व आशेनेंच काम करावें लागतें. पदोपदीं शंकाच घेत बसलें तर थोर ध्येयांना कोणीच हात घालणार नाहीं, " गोपाळराव निश्चयानें म्हणाले.

" तुमची जगांत निराशा नाहीं होत ? " स्वामींनीं विचारलें.

" मी निराशेच्या रानांतून खूप भटकलों आहें. निराशेची विषण्णता मीं अनुभविली आहे. परंतु पुनः पुनः आशेचे पल्लव मी फोडीत असतों. तुमच्याकडेही मी आशेनें आलों आहें. " गोपाळराव म्हणाले.

" मी तुम्हांला काय देणार ? मजजवळ कांहींही नाहीं, " स्वामी म्हणाले.

" मजजवळ द्यावयास कांहींही नाहीं असें जो म्हणतो, तो देवाचा अपमान करतो असें मला वाटत असतें. त्या श्रीमंत परमेश्वराचीं लेंकरें इतकीं कशीं भिकारी कीं त्यांच्याजवळ देण्यासारखें कांहींही नाहीं ? हा एक प्रकारचा अहंकार आहे. कधीं कधीं नम्रतेंतून अहंकार बाहेर पडत असतो. हा अहंकाराचा नारू कोठून कसा उत्पन्न होईल ह्याचा नेम नसतो. " गोपाळराव स्वस्थपणें बोलत होते.

" गोपाळराव, तुम्हांला कांहींही वाटो; परंतु माझ्या मनांतील तुम्हांला सांगितलें, " स्वामी खिन्नपणें म्हणाले.

" काल सायंकाळचे शब्द ज्या पुरुषाच्या हृदयांतून बाहेर पडले, तें श्रीमंत हृदय आहे. तें सागराप्रमाणें उचंबळणारें हृदय आहे. कालचें तुमचें भाषण ऐकून मुलें वेडीं झालीं, " गोपाळराव भावनेनें बोलत होते.

" खरेंच. आम्हीं कधींही असें भाषण ऐकलें नव्हतें. तुम्ही दोन तास काल बोलले असतेत, तरी कोणी उठलें नसतें, " त्या दोन मुलांतील एक मुलगा म्हणाला.

"तुमचे विचार ऐकावयास तरुण भुकेलेले आहेत. तरुणांच्या मनोभूमि ओसाड आहेत. त्यांच्यावर सहृदय मेघांचा सारखा वर्षाव झाला पाहिजे. स्वामी, तुम्ही तें करूं शकाल. तुम्ही आमच्या संस्थेंत येतां ? हीच गोष्ट विचारावयास मी आलों आहें. तुमचा फार उपयोग होईल," गोपाळराव म्हणाले.

"गोपाळराव, आजपर्यंत आशेनें मी अनेक ठिकाणीं राहिलों. एका वर्तमानपत्राच्या संस्थेंत होतों. परंतु राष्ट्र बनवूं पाहाणारी ती संस्था म्हणजे एक चिखलाचें डबकें होतें. जातिभेद सर्वांच्या रोमरोमांत भिनलेले. कोणी ब्राह्मणाचे अभिमानी, कोणी ब्राह्मणेतरत्वाचे अभिमानी! जिकडे तिकडे स्वार्थाचा बुजबुजाट. विशाल दृष्टि व उदार विचार ह्या लोकांना सहन होत नाहींत. जो तो स्वतःला कोंडून घेत आहे. त्या संपादकमंडळांतील सूत्रधाराशीं माझें जमेना. ध्येयाला सोडण्याऐवजीं मीं संस्थाच सोडली. माझ्या ध्येयाचा मी एक तरी पूजक नको का राहावयाला ? अजून अस्पृश्यता सशास्त्र आहे, हेंच ह्यांचें तुणतुणें ! आज ह्या विसाव्या शतकांत, साम्यवादाच्या काळांत अस्पृश्यतेचा शास्त्रार्थ सांगत बसणाऱ्यांच्या बुद्धीची कींव करावीशी वाटते. त्या जडमूढ संस्थेचा मीं त्याग केला. तेथून दुसऱ्या एका मंडळांत गेलों. ते अस्पृश्यांना जवळ घेऊं पाहात होते. परंतु मुसलमान म्हणजे त्यांना जसें वावडें. आखाडे काढा. कां, तर मुसलमानांस ठोकण्यासाठीं ! मला आखाडे पाहिजे आहेत. परंतु सेवेला शरीर बळकट असावें ह्यासाठीं ते हवे आहेत. वाईट कोणीही करो, त्याला विरोध करण्यासाठीं शक्ति कमवा. मग तो हिंदु असो, मुसलमान असो वा इंग्रज असो.

"गोपाळराव, संकुचितपणाच्या हवेंत माझा जीव गुदमरतो. मी तेथून उडून जातों. निळ्यानिळ्या आकाशांत हिंडणाऱ्या पक्ष्याला तुमचे पिंजरे कसे रुचणार ? आपले विचार जेथें जमेल तेथें पेरीत जावे. कोठेंही आसक्ति ठेवूं नये. आंतडें गुंतवूं नये, असें मला वाटत असतें. अमळनेरला आलों. काळवेळ आली. माझें हृदय मोकळें केलें. उद्यां दुसरीकडे. आज येथें, उद्यां तेथें," स्वामी एक प्रकारच्या गूढ निराशेनें बोलत होते.

"परंतु ह्याचा उपयोग कितीसा होणार ? कोठें तरी तुम्ही मूळ धरून बसलें पाहिजे. बंधनांत घालून घेतल्याशिवाय विकास नाहीं. बीज जर एके ठिकाणीं जमिनींत नीट गाडून घेणार नाहीं, तर वृक्ष कसा होईल ? बीं सारखें हवेंत

उडत राहील, तर त्याला अंकुर फुटणार नाहींत. एका बीजाचें शेंकडों दाण्यांचें कणीस होणार नाहीं. बीं एके ठिकाणीं स्वतःला पुरून घेतें, परंतु शेंकडोंना जन्म देतें आणि असें मध्येंच कोठें तरी जाऊन बोलणें हें एक प्रकारें पाप आहे. जें आपण पेरूं त्याची जर आपण काळजी न घेतली, तर तें मरेल. जो अंकुर लावूं, त्याला जर पुन्हा पुन्हा पाणी न घालूं तर तो अंकुर करपेल. ही भ्रूणहत्या आहे. बालहत्या आहे. ह्या मुलांच्या मनांत कांहीं विचार तुम्हीं काल पेरलेत, हे का तुम्ही मरूं देणार? मग ते पेरलेत तरी कशाला? लावलेल्या झाडाला वाढवावयाचें नसेल तर लावूंच नये. जन्माला येणाऱ्या बाळाची जर नीट काळजी घ्यावयाची नसेल तर बाळाला जन्मच देऊं नये. स्वामीजी! मी स्पष्टपणें बोलतों ह्याची क्षमा करा. मी आहें स्पष्टवक्ता." गोपाळराव म्हणाले.

"मला मोकळेपणा आवडतो. मला तुमचा राग न येतां उलट तुमच्याबद्दल आदर वाटत आहे. मला बंधनें आवडत नाहींत हें खरें," स्वामी म्हणाले.

"म्हणजे तुम्हांला जबाबदारी नको हाच त्याचा अर्थ," गोपाळराव म्हणाले.

"हो. एक प्रकारें तसें म्हटलेंत तरी चालेल," स्वामी म्हणाले.

"स्वामी! आज काल सेवा शब्द पुष्कळांच्या ओंठांवर असतो. परंतु प्रत्यक्ष व्यवहारांत संकटें, विघ्नें, विरोध, निराशा सहन करून सेवा करीत राहाणें, स्थिर वृत्तीनें अखंड करीत राहाणें हें दुर्मिळ आहे. हृदयांत सेवेची भावना असेल, ओंठांना सेवा शब्दाचें वेड असेल; परंतु हातापायांना सेवेचें वेड लागल्या-शिवाय फुकट आहे. स्वामीजी! तुम्हांला तुमचे विचार पसरावयाचे असतील तर तुम्ही माणसें तयार केलीं पाहिजेत. माणसें तयार करण्यासाठीं तुम्हीं संघ स्थापिले पाहिजेत, आश्रम काढले पाहिजेत. एकाचे पांच, पांचाचे पन्नास ह्याप्रमाणें त्या त्या विचारांनीं अंतर्बाह्य पेटलेले तरुण राष्ट्रभर गेले पाहिजेत. म्हणून मी म्हणतों कीं आमच्या संस्थेंत या. तेथें दीडशें तरुण मुलें आहेत. नवविचार व नवभावना ह्यांची त्यांना भूक आहे. द्या त्यांना विचारांची पौष्टिक भाकर. मी त्यांच्या शरीरांना पौष्टिक व जीवनतत्त्वांचा विकास करणारें अन्न देईन. तुम्ही त्यांची मनोबुद्धि पोसा. हृदयें व बुद्धि ह्यांना तुम्हीच पोसूं शकाल. तुम्ही मला नाहीं म्हणूं नका. अशा संस्थेंत राहिल्यानें तुमच्यासारख्यांच्या जीवनाचा फार उपयोग होईल; निदान कांहीं दिवस प्रयोगादाखल तरी राहून पाहा," गोपाळराव उत्कटतेनें बोलत होते.

" ह्या संस्थेशीं आणखी कोणाचा संबंध आहे ? " स्वामींनीं विचारलें.

" कोणाचाही नाहीं. सहानुभूति पुष्कळांची आहे. मीच ह्या संस्थेचा उत्पादक आहें. तुमच्यासारख्यांची जोड मिळाली तर सोन्याहून पिवळें होईल, शाळेंतील शिक्षण कसेंही असो, परंतु आपण आपल्या छात्रालयांतून तरी त्यांना नवीन दृष्टि देऊं, नवीन सृष्टि दावूं, " गोपाळराव म्हणाले.

" गोपाळराव, जगांत माझी विशेष आसक्ति कोठेंच नसल्यामुळें येथें हा प्रयोग करावयास हरकत नाहीं. परंतु मला कोणतेंही मुदतीचें बंधन घालूं नका. ज्या दिवशीं मला जावेंसें वाटेल, त्या दिवशीं मी निघून जाईन. हाच आपला नैतिक करार. जावेंसें वाटलें कीं मीं जावें. तुम्हीही तुम्हांला वाटेल तेव्हां मला घालवूं शकाल, " स्वामी म्हणाले.

" चला तर मग. हे पाहा छात्रालयांतील मुलांचे दोन प्रतिनिधि तुम्हांला नेण्यासाठीं आले आहेत. स्वामीजी ! मला किती आनंद होत आहे. तुम्ही यालच असें मला वाटलें होतें, " गोपाळराव जरा कंपित आवाजानें म्हणाले.

" हृदयाची खरी आशा विफल होत नसते. ह्या अमळनेर स्टेशनवर मी उतरलों व एक प्रकारें अननुभूत भाव माझ्या हृदयांत काल उत्पन्न झाला होता. पूर्वजन्मींचे ऋणानुबंध ह्या जागेशीं आहेत कीं काय ? " स्वामी म्हणाले.

" आंतरःकोऽपि हेतुः । " गोपाळराव म्हणाले.

" आपण सारे पतंग आहोंत. देव उडवून राहिला आहे. कांहीं दिवस मला अमळनेरच्या निर्मळ हवेंत उडवणार वाटतें ! " स्वामी म्हणाले.

" कांहीं दिवस कां ? आम्ही तुम्हांला जाऊंच देणार नाहीं, " एक मुलगा म्हणाला.

" तुझें नांव काय ? " स्वामींनीं विचारलें.

" नामदेव, " तो मुलगा म्हणाला.

" किती गोड नांव, आणि किती गोड तुझे डोळे " असें म्हणून स्वामीजी तुकारामाच्या अभंगांतील चरण म्हणूं लागले,

**" गोड तुझें रूप गोड तुझें नाम । देई मज प्रेम सर्व काळ ॥ "**

" तुम्ही राहिलेत तर ना आम्ही प्रेम देणार ? " नामदेवानें विचारलें.

" अरे राहातीलच ते. ते आतां जाणार नाहींत, " दुसरा मुलगा म्हणाला.

" आणि तुझें रे नांव काय ? " स्वामींनीं विचारलें.

" रघुनाथ, " तो मुलगा म्हणाला.

" रघुनाथ साथे प्रीत बांधो होय तैसें होय रे, " स्वामींनीं चरण म्हटला.

" तुमची तर मुलांशीं इतक्यांतच मैत्री जडली, " गोपाळराव म्हणाले.

" आतां आपण निघायचें ना ? तुमची ही पिशवी मी घेतों, " नामदेव म्हणाला.

" तें तिकडे धोतर वाळत आहे, तें तुमचेंच ना ? मी तें घेऊन येतों, " असें म्हणून रघुनाथ गेला.

निघावयाची तयारी झाली. स्वामीजी जरा सचिंतपणें उभे होते. गोपाळराव त्यांच्याकडे पाहात होते.

" मी पुन्हा बंधनांत पडत आहें. 'बंधन काट मुरारी' अशी मी देवाला नेहमीं प्रार्थना करीत असतों. "

" मुलांचीं अज्ञानाचीं बंधनें छाटून टाकण्यासाठीं चला. स्वतःच्या जीवना-भोवतालचीं असत्कल्पनांचीं जाळीं तोडून टाकलींत. ह्या मुलांचे जीव त्यांत गुरफटूं नयेत म्हणून तीं छाटावयास चला. हें पवित्र काम आहे. मुलांच्या सांनिध्यांत राहाणें म्हणजे देवाच्या सांनिध्यांत राहाणें होय. मुलांचें राज्य म्हणजे देवाचें राज्य. मुलें म्हणजे देवाघरचा बगीचा. देवाच्या बागेंतील कळ्या फुलविण्यास चला, " गोपाळराव म्हणाले.

" ह्या कळ्या फुलविण्यास मी पात्र आहें का ? जो स्वतःचा प्रभु असेल त्यानेंच ह्या देवराज्यांत शिरावें ; परंतु ज्याच्या हृदयांत अजून सापविंचू आहेत त्यानें जावें का ? तो ते सापविंचू मुलांत सोडावयाचा. मुलें फुलावयाऐवजीं मरावयाचीं. मुलांनीं रागवूं नये असें मला वाटत असेल, तर मीं रागावतां कामा नये. मुलांनीं आळशी राहूं नये असें म्हणेन, तर आधीं मीं सतत कर्मांत मग्न असलें पाहिजे. गोपाळराव, कठीण आहे हें काम, " स्वामी म्हणाले.

" कठीण आहे म्हणूनच करण्यासारखें आहे. स्वतःच्या जीवनाचा त्यांत खरा विकास आहे आणि जगांत पूर्ण कोण आहे ? सारे अपूर्णांकच आहेत. पूर्णांक झाला कीं परब्रह्मांत मिळाला. ह्या देहांत पूर्णांक मावणार नाहीं. एखाद्या मडक्यांतील पाण्याचें जर गोठून स्वच्छ बर्फ झालें, तर तें मडकें फुटतें. पूर्ण ज्ञान ह्या जीवनांत मावणार नाहीं, " गोपाळराव म्हणाले.

" मग जीवन्मुक्त म्हणजे कल्पनाच का ? " स्वामींनीं विचारलें.

" असें वाटतें. ज्याप्रमाणें भूमितींतील बिंदु काढतां येणार नाहीं, रेषा काढतां येणार नाहीं, तसेंच हें. म्हणून भूमितींत ' समजा ' हा शब्द आपण योजीत असतों. खरा बिंदु व्याख्येंतच राहातो. त्याप्रमाणें पूर्ण पुरुष ध्येयांतच राहाणार. त्या पूर्णत्वाच्या जवळजवळ गेलेले फार तर कांहीं लोक दृष्टीस पडतील. पूर्णत्व ह्या शरीरांत भरतांच शरीर गळून पडेल, " गोपाळराव म्हणाले.

" तुम्हीं पुष्कळ विचार केलेला आहे. खोल दृष्टीचे आहांत तुम्ही, " स्वामी म्हणाले.

" परंतु तुमच्यांतील भावनेची उत्कटता मजजवळ नाहीं. एक प्रकारची स्वभावांतील मधुरता माझ्याजवळ नाहीं. एका क्षणांत हीं दोन मुलें तुम्ही आपलींशीं केलींत. ती देवाची देणगी असते. काल तुम्हांला पाहिल्यापासून मुलें तुमच्यासाठीं वेडीं झालीं आहेत, " गोपाळराव म्हणाले.

" स्वामीजी, आतां चला. मुलें वाट पाहात असतील, " नामदेव म्हणाला.

" नाहीं तर आम्ही पुढें जातों. साऱ्या मुलांस आनंदाची वार्ता देतों, " रघुनाथ म्हणाला.

" खरेंच, तुम्ही जा. सारीं मुलें जमवून ठेवा, " गोपाळराव म्हणाले.

" आम्ही तुमचं सामान घेऊन जातों, " नामदेव म्हणाला.

" नामदेव ! माझ्याजवळ दे घोंगडी. तूं घे पिशवी. प्रत्येकाजवळ कांहींतरी असूं दे, " रघुनाथ म्हणाला.

" आणि माझ्याजवळ नको का रे कांहीं ? " गोपाळराव म्हणाले.

" तुम्हांला तर मोठी वस्तु आणावयाची आहे, " नामदेव म्हणाला.

" कोणती ? " गोपाळरावांनीं विचारलें.

" स्वामीजींना तुम्ही आणा. " नामदेव हसत म्हणाला.

" अरे, मी किती काटकुळा आहें ? त्यांना मी कसें आणूं ? " गोपाळराव म्हणाले.

" परंतु तुमची इच्छाशक्ति दांडगी आहे, " स्वामी म्हणाले.

" बरं आम्ही जातों. स्वामी ! जातों हां, " दोघे म्हणाले.

गेले. दोन्ही पक्षी पुढें उडून गेले. छात्रालयांतील मुलें एकदम त्यांच्याभोवतीं जमूं लागलीं. त्यांच्याजवळ चौकशी करूं लागलीं.

" ही त्यांची का रे पिशवी ? " एकानें विचारलें.

“ आपण पाहूं तिच्यांत काय आहे तें, ” दुसरा म्हणाला.

“ त्यांच्या परवानगीशिवाय आपण त्यांची पिशवी पाहाणें योग्य होणार नाहीं. तो विश्वासघात होईल, ” नामदेव म्हणाला.

“ अरे, अशा पुरुषांजवळ आंत बाहेर कांहीं नसतें. त्यांचा सारा मोकळा संसार असतो, ” एक प्रौढ मुलगा म्हणाला.

“ आणि ही त्यांची घोंगडी वाटतें ? ” एकानें चौकशी केली.

“ आपण सारीं मुलें दरवाजाजवळ रांगेनें उभीं राहूं या. स्वामीजी व गुरुजी येतील, त्या वेळेस आपण टाळ्यांचा गजर करूं, ” रघुनाथानें सुचविलें.

“ मी लौकर एक फुलांची माळ करतों, ” नामदेव म्हणाला.

“ खरेंच. चला आपण फुलें तोडूं. नामदेव, चल, ” वासुदेव म्हणाला.

“ येथला कचरा झाडून टाकला पाहिजे. आपण हें सारें स्वच्छ करून ठेवूं या, ” रघुनाथ म्हणाला.

मुलें आवार स्वच्छ करूं लागलीं. मुलांनीं आपापल्या खोलींतून स्वच्छता निर्माण केली. सर्वत्र नीटनेटकेपणा दिसूं लागला. एखादा थोर पुरुष येणार ह्या कल्पनेनेंच कामाचीं चक्रें भराभर फिरूं लागतात. सर्वांच्या अंगांत चैतन्य संचरतें. मग तो महापुरुष प्रत्यक्ष चोवीस तास ज्यांच्याजवळ बसत-उठत असेल त्यांचीं जीवनें कशीं निरलस, धगधगीत व संस्फूर्त असतील त्याची कल्पनाच करावी आणि सर्व विश्वाचा चालक जो विश्वंभर, तो रात्रंदिवस आपल्याजवळ आहे, आपल्या हृदयांत आहे, ही ज्याला अखंड जाणीव असते, त्याचें जीवन किती सुंदर व पवित्र असेल ? महात्माजींसारख्यांच्या जीवनांत किती शांत तेज, किती पावनत्व, किती प्रसन्नत्व ! महापुरुषाच्या जीवनाचें दर्शन म्हणजे अनंताचें दर्शन होय !

नामदेव माळ करूं लागला. त्याच्या रमणीय चेहेऱ्यावर भावभक्ति पसरली होती. प्रत्येक फूल तो किती हळुवारपणानें ओवीत होता. सुंदर पुष्पहार तयार झाला. नामदेवानें तो आपल्या हातांत ठेविला. सारीं मुलें अर्धवर्तुळाकार छात्रालयाच्या द्वारापाशीं उभीं राहिलीं. ते पाहा येत आहेत. स्वामी व गोपाळराव येत आहेत. हसत बोलत येत आहेत. आले. द्वाराजवळ आले. मुलांनीं टाळ्यांचा गजर केला. नामदेव पुढें आला. त्यानें स्वामींच्या गळ्यांत ती सुंदर माळ घातली. दुसऱ्या एका मुलानें गोपाळरावांच्याही गळ्यांत घातली.

" अरे मला कशाला ? मी रोजचाच आहें, " गोपाळराव म्हणाले.

" तुम्हीं ह्यांना आणलेंत म्हणून तुम्हांलाही माळ हवी, " एक मुलगा म्हणाला.

" चला, सारे प्रार्थनामंदिरांतच चला, " गोपाळराव म्हणाले.

सारीं मुलें प्रार्थनामंदिरांत जमलीं. प्रार्थनामंदिर स्वच्छ होतें. सुंदर तसबिरी तेथें लाविलेल्या होत्या. तेथें शिरतांच मनांत पवित्र भावना उत्पन्न होत असत. मुलांनीं उदबत्त्याही लावून ठेविल्या. सुगंध पसरून राहिला होता.

गोपाळराव व स्वामीजी आले. सारीं मुलें उभीं राहिलीं.

" बसा, " गोपाळराव म्हणाले.

मुलें बसलीं. स्वामीजी व गोपाळरावही बसले. सर्व शांत झाल्यावर गोपाळराव उभे राहिले. ते कांहींतरी बोलणार होते. मुलें लक्ष लावून ऐकूं लागलीं.

" मुलांनो ! आज फार पवित्र दिवस आहे. एक थोर मनुष्य आपल्या संस्थेस आज लाभत आहेत. ते किती दिवस येथें राहातील ह्याचा नेम नाहीं. परंतु त्यांना इतका मोह पाडा कीं ते तुमच्यांतून कधीं न जावोत. हें आतां तुमच्या हातांत आहे. तुम्ही चांगले व्हाल, चांगले वागाल तर स्वामींना येथें राहाण्यांत आनंद वाटेल. वातावरण निर्मळ राखा. मीं रत्न आणलें आहे. तें न गमावणें हें तुमच्या हातीं आहे. स्वामींना तुम्ही लुटा. त्यांच्याजवळचे विचार पिऊन टाका व पुष्ट व्हा. गायीची भरलेली कास वत्स रिती करतो, त्याप्रमाणें तुम्ही स्वामींना रिकामें करा. स्वामी येणार म्हणून तुम्ही सर्वत्र साफसफाई केलीत, परंतु ते कायमचे आतां येथें राहाणार तर नेहमीं स्वच्छता राखा ; शरीराची, मनाची, सभोवतालच्या वातावरणाची स्वच्छता राखा. तुमच्या ताब्यांत मी स्वामींना देत आहें व तुम्हांला स्वामींच्या ताब्यांत देत आहें. मी आतां फक्त साक्षी राहीन, " असें म्हणून गोपाळराव खालीं बसले.

स्वामीजी उभे राहिले. त्यांचें मन भरून आलें होतें. ते म्हणाले, " मला जगांत एकच बंधन तोडतां येत नाहीं व तें म्हणजे मुलांचें. मी इतर सर्वांच्या इच्छा धुडकावून लावतों, परंतु मुलांची इच्छा मी भंगूं शकत नाहीं. आज गोपाळरावांबरोबर हीं दोन मुलें न येतीं तर मी येथें आलों असतों कीं नाहीं ह्याची मला शंका वाटते. मुलांनीं मला येथें खेंचून आणलें आहे. उंच पर्वत इकडे तिकडे भटकणाऱ्या मेघांना ओढून घेतात, प्रचंड जंगलें मेघांना ओढून घेतात, त्याप्रमाणें इतस्ततः भटकणाऱ्या मला, तुमच्या प्रेमळ व थोर हृदयांनीं

ओढून घेतलें आहे. तुमच्यांत राहावयास मी उत्सुक आहें. आपला हा सहवास एकमेकांस उत्साहप्रद, बलप्रद व स्फूर्तिप्रद होवो. आजपासून मी मुलांचा होत आहें. मुलें म्हणजे माझे देव," असें म्हणून स्वामी खालीं बसले.

गोपाळराव स्वामींना म्हणाले, " एखादी प्रार्थना म्हणा. नवीन संसाराला प्रार्थनेनें आरंभ होऊं दे."

" संन्याशाचा संसार," स्वामी म्हणाले.

मुलें हसलीं.

" एखादा अभंग म्हणा," गोपाळराव म्हणाले.

" कांहींही म्हणा," मुलें म्हणालीं.

" देवांची आज्ञा झाली. आतां म्हणतों," असें म्हणून स्वामी गुणगुणूं लागले. पद सुरू झालें. भावनामय गाणें सुरू झालें. स्वामींचा गोड व मीठा आवाज त्या प्रार्थनामंदिरांत भरून राहिला.

मुलें म्हणजे देव
मुलें म्हणजे देव
मुलें म्हणजे राष्ट्राची मोलाची ही ठेव ॥ मुलें० ॥
त्यांना देई सारें कांहीं
त्यांची चिंता सदा वाही
त्यांना आधीं पोटभर मागून तूं रे जेव ॥ मुलें० ॥
हंसव त्यांना खेळव त्यांना
फुलव त्यांना खुलव त्यांना
आनंदाच्या विकासाच्या वातावरणीं ठेव ॥ मुलें० ॥
भविष्याचे कोमळ मोड
भविष्याच्या कळ्या गोड
भविष्याचे विधाते हे भक्तिभावें सेव ॥ मुलें० ॥

गाणें म्हणून स्वामी एकदम निघून गेले. गोपाळरावही न बोलतां उठले. मुलेंही शांतपणें क्षणभर बसलीं व मग उठलीं. ' मुलें म्हणजे देव, मुलें म्हणजे देव ' हेच चरण वतावरणांत भरून राहिले.



## ३

# तीन मुलें

**मीं फूल तूं फूलविणार कुशाग्र माळी ।**
**मी मूल तूंच जननी कुरवाळ पाळी ॥**

स्वामी आपल्या नवीन संसारांत रमून गेले. मुलांच्या सृष्टींत रंगूं लागले. त्यांना नानाविध अनुभव येऊं लागले. मुलांचीं मनें कळूं लागलीं. त्यांचीं सुखदुःखें, त्यांच्या भुका सारें कळूं लागलें. त्यांचे गुणदोष, त्यांच्या आवडी-नावडी सारें कळूं लागलें. स्वामींनीं एक सिद्धान्त उराशीं बाळगिला होता. मुलांच्याभोवतीं जितकें स्वच्छ, पवित्र, मोकळेपणाचें व आनंदाचें वातावरण, तितकें मुलांचें जीवन सुंदर. मुलें सुधारावयास पाहिजे असतील तर त्यांच्या भोवतालची सृष्टीच बदला. आदळआपट, शिक्षा, दंड ह्यांनीं मुलांचा खरा विकास होत नाहीं. खरा विकास हृदयांत शिरल्यानें होईल, प्रत्यक्ष सेवेनें होईल.

स्वामी मुलांना स्वच्छतेचें महत्त्व पदोपदीं सांगत असत. परंतु केवळ उपदेश करून ते थांबत नसत. मुलें शाळेंत गेलीं म्हणजे स्वामी मुलांच्या खोल्यांतून हिंडत. मुलांचे बिछाने ते उघडीत. मळक्या चादरी, उशांचे घाणेरडे अभ्रे ते काढीत. रोज दोनचार चादरी, दोनचार अभ्रे ते धुवून टाकीत. उन्हांत वाळवून पुन्हा मुलांच्या अंथरुणांत नीट ठेवून देत. मुलें रात्रीं आंथरुण उघडीत तों स्वच्छ चादर व स्वच्छ उशी पाहून त्यांना आश्चर्य वाटे. हें सारें कोण करतो ? स्वामी करतात कीं काय ?

मुलांच्या खोल्यांतील कंदील स्वामी पाहात. कोणाकोणाचे कंदील इतके घाणेरडे झालेले असत कीं ते हातांत धरवत नसत. स्वामी ते कंदील स्वच्छ करून ठेवीत. कंदिलांच्या कांचा आरश्यासारख्या करून ठेवीत. मुलांच्या खोल्यांत केर सांचलेला असला तर तो उचलून टाकीत. त्यांच्या खोलींत आवराआवर करीत, सामान नीट लावून ठेवीत. मुलें शाळेंत जात तेव्हां घाणेरड्या असणाऱ्या खोल्या, मुलें शाळेंतून परत येत त्या वेळेस प्रसन्न मुखानें त्यांचें स्वागत करीत. मुलें खोलीकडे पाहातच राहात. हें सारें कोण करतो ?

मुलांची आपापसांत चर्चा सुरू झाली. हें सारें हमाली काम स्वामी करतात असें त्यांना समजलें. त्यांना वाईट वाटलें. कांहीं मुलें म्हणालीं, "आपण जाऊन त्यांना सांगूं या कीं तुम्ही असें करीत नका जाऊं म्हणून." तीं पाहा कांहीं मुलें निघालीं.

स्वामी आपल्या खोलींत बसले होते. कांहींतरी लिहीत होते. मुलें दार उघडून आंत आलीं. तेथें पसरलेल्या शिंदीच्या चटईवर तीं बसलीं. मुलांना पाहातांच स्वामींची गंभीर मुद्रा हसूं लागली. मुलें दिसतांच स्वामींना नेहमीं हसूं येत असे. झऱ्यांतून बुडबुड पाणी येतें तसें त्यांना गोड हसूं येई. त्यांच्या जीवनाला अमृतस्पर्श करणारीं म्हणजे मुलें होतीं. मुलें म्हणजे चैतन्याची कला, आशेची चंद्रकोर असें ते म्हणत असत.

"काय रे कां आलांत ? कांहीं कट करून आला आहांत वाटतें ?" स्वामींनीं प्रेमळपणानें विचारलें.

कोणी कांहीं बोलेना. मुलें एकमेकांना हळूच चिमटे घेऊन तूं बोल, तूं बोल असें सुचवीत होतीं. परंतु स्वामींचें प्रसन्न व मनोहर हास्य पाहून त्यांना बोलण्याचें धैर्य होईना.

"अरे, बोला ना. मी का वाघ आहें, कीं लांडगा आहें ? माझी भीति वाटत असेल तर मी येथें कशाला राहूं ?" स्वामी म्हणाले.

"तुमची भीति वाटत नाहीं म्हणून तर बोलवत नाहीं; तुम्ही आमच्यावर इतकें प्रेम करतां कीं तुमच्या इच्छेविरुद्ध बोलावयास आम्हांस संकोच होतो. तुमचें हृदय दुखावलें जाईल अशी शंका येते." मुकुंदा म्हणाला.

"ज्या प्रेमाला शंका येते, तें खरें प्रेम नाहीं. खरें प्रेम मोकळें असतें. त्याला ना संशय ना भय. मी थोडें कमी प्रेम करूं असें का तुमचें म्हणणें आहे ? हा का तुमचा अर्ज आहे ?" स्वामींनीं विचारलें.

"हो." मुरलीधर म्हणाला.

"परंतु प्रेम कमी करूं म्हणजे काय करूं ? तुम्ही पानांत वाटेल तेवढें मीठ घेऊन उगीच टाकतां, म्हणून का शिक्षा करूं ? हौदाच्या कठड्यावर राखुंडी ठेवून तशीच ती घाण तेथें ठेवतां, म्हणून का दंड करीत सुटूं ? प्रेम कमी करूं म्हणजे काय करूं ? सांगा ना ?" स्वामी जरा विषण्ण मनानें म्हणाले.

" हौदाचा कट्टा तुम्ही कां धुतां ? आम्ही नाहीं का धुणार ? आम्हांला तुम्ही सांगत जा. तुम्ही आज्ञा करीत जा, " मुकुंदा म्हणाला.

" आज्ञेला सामर्थ्य येण्यासाठीं आधीं सेवा करावी लागते. आई मुलाची लहानपणीं अपरंपार सेवा करिते, तेव्हां तिच्या शब्दाला थोडी किंमत येते. आधीं झिजावें व मग मागावें. आधीं मरावें व मग मिळवावें, " स्वामी म्हणाले.

" परंतु स्वामी ! तुम्ही आमच्या अंथरुणांतील चादरी धुतां हें कांहीं चांगलें नाहीं. आम्हांला का स्वाभिमान नाहीं ? " नरहर जरा रागानें म्हणाला.

" तुम्हांला का स्वाभिमान असता तर तशा गलिच्छ चादरींवर तुम्हीं तुमचा पवित्र देह निजूं दिला नसता. स्वाभिमान शब्द उच्चारणें सोपें आहे, परंतु स्वाभिमानाचें जिणें जगणें फार कठीण आहे, " स्वामी म्हणाले.

" तुम्ही आम्हांला लाजवतां, " एकजण म्हणाला.

" मी लाजवण्यासाठीं कांहीं करीत नाहीं. माझ्या हातांना सेवेची भूक आहे. घाण दूर करावी, अश्रु पुसावे ह्याची ह्या माझ्या हातांना कसोशी आहे. मी घाण शोधीत जातों. दिसली कीं दूर करतों, " स्वामी म्हणाले.

" साऱ्या जगाची घाण तुम्ही दूर करूं शकाल ? " नरहरनें विचारलें.

" नाहीं. मनुष्याची शक्ति मर्यादित आहे. जेवढें करतां येईल तेवढें त्यानें करावें. सर्व विश्वाला कवटाळावें असें आत्म्याला वाटतें. परंतु ह्या देहानें जवळच्या दोनचार जणांनाच हृदयाशीं धरतां येईल. मनांत सर्व जगाची सेवा, परंतु प्रत्यक्ष व्यवहारांत आसपासच्या दोनचार जणांचीच सेवा आपणांस करतां येईल, " स्वामी म्हणाले.

" स्वामीजी, तुम्ही आमचे कंदील पुसून ठेवलेत त्या दिवशीं, " जनार्दन म्हणाला.

" ते कंदील पाहून मला वाईट वाटलें. जणुं ते कंदील रडत आहेत असें मला वाटलें. तुम्हांला ज्ञानाचा प्रकाश मिळावा, अंधारांत वाचतां यावें, अंधारांत दिसावें म्हणून त्या कंदिलाचें तोंड काळें होतें. तें काळें तोंड कृतज्ञतेनें पुसून ठेवणें हें आपलें कर्तव्य आहे. आपल्या घामानें कपडे मळतात ते स्वच्छ ठेवणें हें आपलें कर्तव्य आहे. आपल्यासाठीं झिजणाऱ्या, श्रमणाऱ्या, मलीन होणाऱ्या शेंकडों वस्तु–त्यांना मन आहे अशी कल्पना करा. त्या वस्तूंच्या

अंतरंगांत शिरा. त्या वस्तु तुमच्या नांवानें खडे फोडीत असतील. तुम्हांला शिव्याशाप देत असतील. आपल्या लोकांना डोळे असून दिसत नाहीं, कान असून ऐकूं येत नाहीं, " स्वामीजी म्हणाले.

" ज्या देशांतील लोकांना जवळच्या भावाबहिणींच्या किंकाळ्या ऐकूं येत नाहींत, जवळच्या कोट्यवधि लोकांचीं खग्रास जीवनें दिसत नाहींत, त्यांना ह्या निर्जीव कांचांचीं रडगाणीं कशीं ऐकूं येणार ? " मुकुंदा म्हणाला.

" जीं मुलें स्वतःचे दांतही स्वच्छ ठेवीत नाहींत, तीं कंदील का स्वच्छ ठेवतील ? " मुकुंदानें विचारलें.

" जगांत हें असें चालायचेंच. एकदम सारें जग का सुधारणार आहे ? " नरहर म्हणाला.

" मुलें ओंगळ राहातील परंतु आईला तें पाहावेल का ? " स्वामींनीं प्रश्न केला.

" आई मुलाचें नाक पुशील, त्याला स्वच्छ करील, " जनार्दन म्हणाला.

" आई तसें न करील तर ती आईच नाहीं, " मुरलीधर म्हणाला.

" आईला सारें साजून दिसतें. इतरांना नाहीं, " नरहर म्हणाला.

" परंतु माझीही इच्छा तुमची आई व्हावें अशी आहे, " स्वामी म्हणाले.

" जगांत आई एकच असते. आई ती आई, " नरहर पुन्हा म्हणाला.

" नरहर, ध्येय हें नेहमीं दूरच असणार. मी आई होऊं शकणार नाहीं. आई होऊं शकेन असा अहंकार मी धरीत नाहीं ; परंतु तें माझें ध्येय आहे. ध्येयाच्या जवळ जितकें जातां येईल तितकें जावें, " स्वामी म्हणाले.

" तें कांहीं असो. परंतु तुम्ही हें धुण्यापुसण्याचें काम करूं नका. " मुरलीधर म्हणाला.

" तुम्ही स्वच्छ राहिलांत तर मला करावें लागणार नाहीं. छात्रालय म्हणजे माझें घर. ह्या घरांत घाण दिसली तर ती दूर करणें माझें कर्तव्य आहे. तें मी करीत राहीन. जें मीं करूं नये असें तुम्हांला वाटतें तें मला करावयास लावण्याची वेळच आणूं नका. समजलें ना ? " स्वामींनीं विचारलें.

" चादर धुवून धुवून लौकर फाटली तर ? " एकानें विचारलें.

" कंदिलाची कांच पुसतां पुसतां फुटली तर ? " दुसऱ्यानें विचारलें.

"रोज आंघोळ करून हें शरीर फाटतें का? तसें असेल तर रोज आंघोळही करूं नका. अरे, साऱ्या वस्तु फाटावयाच्याच आहेत व फुटावयाच्याच आहेत. जोंपर्यंत त्या टिकतील तोंपर्यंत त्यांना तेजस्वी व स्वच्छ ठेवा म्हणजे झालें. तुमची कांच पुसतांना माझ्या हातून फुटली तर मी भरून देईन. चादर धुवून फाटली तर शिवून देईन. आणखी मी काय करूं? समजलें ना?" स्वामी खिन्न होऊन म्हणाले.

स्वामींची खिन्न मुद्रा पाहून मुलांनीं माना खालीं घातल्या. त्या थोर पुरुषाचें कोमल, प्रेमळ हृदय आमच्या आर्थिक काटकसरीच्या हिशेबानें दुखावलें गेलें!

"स्वामीजी, आम्हा मुलांना बोलतांना भान राहात नाहीं. शंका विचारत विचारतां कांहीं तरी वेडेंवाकडेंही विचारूं लागतों. तुम्ही रागावूं नका. आम्ही तुमचींच ना मुलें. तुम्ही पुन्हा आमच्याकडे पाहून एकदा हसा. तुमचें गोड हसणें आम्ही कुठेंही गेलों तरी विसरणार नाहीं," मुकुंदा म्हणाला.

स्वामींना हसूं आलें. ढग गेले. सूर्यप्रकाश आला. गंभीर वातावरण जाऊन पुन्हा खेळीमेळी सुरू झाली.

स्वामींनीं मुलांसाठीं एक वाचनालय व ग्रंथालय सुरू केलें. मुलें महिन्याला दोन आणे वर्गणी ह्यासाठीं देत. सुंदर पुस्तकें व सुंदर पत्रें येऊं लागलीं. परंतु मुलांनीं वाचनालयांत यावें म्हणून स्वामींनीं एक नवीनच उपक्रम सुरू केला. त्यांनीं दररोज हस्तलिखित दैनिक काढण्याचें ठरविलें.

एके दिवशीं 'छात्रालय दैनिक' वाचनालयांत झळकलें. मुलांच्या झुंडी तेथें आल्या. रोज सकाळीं छात्रालय दैनिक वाचनालयांत ठेवण्यांत येई. पहाटे चार वाजतां उठून स्वामी तें लिहीत. सहा वाजतां प्रार्थनेची वेळ होईपर्यंत तें लिहून होई. पांच चत्कोर पाठपोठ लिहिलेले असत. हें दैनिक म्हणजे मुलांचें नवजीवन झालें. ह्या दैनिकाच्या द्वारें स्वामी एकमद दीडशें मुलांच्या हृदयांत जात. त्यांच्याजवळ बोलत.

ह्या दैनिकांत मुलांच्या खोल्यांचीं वर्णनें येत. घाण कोठें आहे त्यावर टीका येई. स्वच्छ खोलीची स्तुति येई. मुलांच्यावर टीकात्मक लेख येत. मुलांतील भांडणें, अबोले सारें कांहीं दैनिकांत येई. परंतु दैनिकाचें मुख्य कारण निराळें होतें. भारतीय संस्कृतीची शिकवण ह्या दैनिकद्वारा स्वामी देऊं लागले. विशाल

भारताच्या भूतभविष्याची चर्चा दैनिकांत होऊं लागली. हें दैनिक मुलांना कधीं हसवी, तर कधीं रडवी. कधीं त्यांतील विनोदी कविता वाचून मुलांच्या मुरकुंड्या वळत, तर कधीं देशाच्या स्थितीचे लेख हृदयांत आगडोंब पेटवीत. कधीं इतिहास, कधीं समाज, कधीं शिक्षण, कधीं धर्म. नाना प्रश्न दैनिकांत येत. कधीं चरित्र, कधीं निबंध, कधीं गोष्ट, कधीं संवाद, कधीं चुटके, कधीं स्फुट विचार, कधीं गंमत, कधीं विनोद सारें येथें असे. कधीं रणरागिणी झांशीची राणी लक्ष्मीबाई मुलांसमोर उभी राही, तर कधीं सात्त्विकतेची मूर्ति सीतादेवी हिचें चित्र तेथें रंगविलेलें दिसे. कधीं भीष्म तर कधीं चिमाजीअप्पा, कधीं भगवान् बुद्ध तर कधीं रामकृष्ण परमहंस, कधीं मीराबाई तर कधीं जनाबाई, कधीं देशबंधु दास तर कधीं दीनबंधु ॲण्ड्र्यूज, कधीं लोकमान्य, कधीं महात्मा, सारें तेथें ओतण्यांत येई. कधीं इस्लामी संस्कृतीचा हिंदु संस्कृतीवर झालेला परिणाम तेथें वर्णिलेला असे, तर कधीं भारतीय संस्कृतीचा जगत्संचार तेथें दाखविला जाई. कधीं जपानचा कोरियांतील धिंगाणा येई, तर कधीं स्वदेशांतील अन्यायांची कहाणी येई. कधीं रशियांतील नवप्रयोग, कधीं तुर्कस्थानांतील नवस्वातंत्र्य, कधीं आयर्लेंड तर कधीं इजिप्त, कधीं सन्यत्सेनचें मृत्युपत्र तर कधीं रूसो-जपानी युद्धांतील रोमांचकारक प्रसंग, कधीं टॉलस्टॉयची गोष्ट तर कधीं उपनिषदांतील कथा, कधीं फ्रेंच राज्यक्रांति तर कधीं अमेरिकेंतील वॉशिंग्टन, गार्फील्ड, लिंकन, कधीं रवींद्रनाथ, इकबाल ह्यांच्या कवितांचे अनुवाद तर कधीं व्हिटमन, गटे, बायरन, शेले ह्यांच्या कवितांचीं सुंदर रूपान्तरें; कधीं मिलेटसारख्या चित्रकारांच्या आठवणी तर कधीं अजिंठा वेरूळच्या लेण्यांची हकीकत !

तें दैनिक मुलांना विश्वदर्शन घडवीत होतें. खरा शिक्षक मुलांना भूतकाळची कल्पना देऊन भविष्याच्या दरवाजापर्यंत आणून ठेवतो. आजपर्यंत जगानें काय केलें त्याची कल्पना देऊन उद्यां मानवजातीला काय करावयाचें आहे त्याची सूचना देतो. अशा विशाल दृष्टीचे शिक्षक लहानपणीं मुलांना मिळावयास हवेत. परंतु लहान मुलांच्या दुर्दैवानें अत्यंत संकुचित वृत्तीचे, मनानें व बुद्धीनें जड, जरठ झालेले, प्रतिभाहीन, ध्येयहीन असेच शिक्षक मुलांना लाभत असतात. मुलांच्या प्राथमिक शाळांतून जाऊन पाहा. अत्यंत मागासलेल्या व बुरसलेल्या विचारांना उराशीं धरून बसणारे शिक्षक तेथें दिसून येतील. जे विचार

अर्थशून्य ठरले, आजला निरुपयोगी ठरले तेंच त्या शिक्षकांना प्रिय असतात. भावी पिढी अशानें कशी बरें तयार होणार ? अत्यंत लहान मुलांजवळ अत्यंत प्रगल्भ व अतिविशाल दृष्टीचे शिक्षक पाहिजेत. ज्या वेळेस मनें तयार होतात, बुद्धि, हृदय संस्कारक्षम असतात, त्या वेळेस थोर व व्यापक ध्येयें उराशीं बाळगणारे, प्रेम, समानता, विश्वबंधुत्व ह्यांना पूज्य मानणारे शिक्षकच मिळाले पाहिजेत. परंतु हें कसें व्हावें ?

स्वामींच्या दैनिकानें मुलांच्या जीवनांत क्रांति होऊं लागली. मुलांच्या अंगावर गरिबांनीं विणलेली खादी येऊं लागली. खोलींत स्वदेशी वस्तु येऊं लागल्या. देशांतील विराट् दुःख त्यांना दिसूं लागलें. मुलांची दृष्टि पाहूं लागली, कान ऐकूं लागले. देशाचीं गाणीं, देशभक्तांचीं नांवें त्यांच्या ओठांवर खेळूं लागलीं. मुलांचीं जीवनें पेटूं लागलीं, सहृदय होऊं लागलीं.

छात्रालयांत सर्व कांहीं होतें. परंतु एक गोष्ट तेथें नव्हती. तेथें बाग नव्हती. मुलें आणि फुलें ह्या गोष्टी नेहमीं बरोबर पाहिजेत. मुलांच्यासमोर नेहमीं फुलांची पवित्र सृष्टि हवी. फुलें कशीं सुगंधी, स्वच्छ व रसमय असतात, अशीं आपलीं जीवनें व्हावींत ही भावना फुलांच्या दर्शनानें मुलांच्या मनांत न कळत बिंबण्याचा संभव असतो.

एके दिवशीं सायंकाळीं स्वामी खणती घेऊन खणूं लागले. स्वामी खणीत आहेत हें पाहून तो पाहा नामदेव आला, दयाराम आला, रघुनाथ आला.

" काय करायचें येथें ? " नामदेवानें विचारलें.

" आपण येथें बाग करूं या. ओसाड जागेला हसवूं, " स्वामी म्हणाले.

" परंतु पाणी कोण घालील ? " दयारामनें विचारलें.

" ज्याला फुलांची आवड असेल तो, " स्वामी म्हणाले.

" स्टोअरमधून मी आणखी दोन कुदळी घेऊन येतों, " रघुनाथ म्हणाला.

" जा, घेऊन ये, " नामदेव म्हणाला.

ती जागा साफसूफ झाली. तेथले दगड, खडे बाजूला करण्यांत आले. कांहीं मुलें तेथें रोज काम करूं लागलीं. स्वामीही त्यांच्याबरोबर असत. विटांचे तुकडे लावून सुंदर रचना करण्यांत आली. फुलझाडांचीं कलमें लावण्यांत आलीं. कांहीं लौकर उगवणाऱ्या फुलझाडांचें बीं पेरण्यांत आलें. गुलाब, निशिगंध, शेवंती, मोगरे तेथें लावण्यांत आले. गुलबक्षी लावण्यांत आल्या.

कर्दळी लावण्यांत आल्या. पुन्नाग व अशोक ह्यांचीं दोन झाडें नामदेवानें आपल्या हातानें लाविलीं. रघुनाथनें खूप तुळशी लाविल्या. कमानीवर चित्रांगेची वेल सोडण्यांत आली. रातराणी दयारामानें आणून लाविली. नाना फुलझाडें तेथें लावण्यांत आलीं. सकाळसायंकाळ मुलें पाणी घालीत. तेरडे लौकर फुलूं लागले. इतरही कांहीं फुलझाडांना भराभरा फुलें आलीं. ती ओसाड जमीन रमणीय दिसूं लागली.

स्वामी उजाडलें म्हणजे बागेंत जात. रघुनाथ, नामदेव हेही बागेंत येत. नवी कळी कोठें येत आहे, ती कधीं फुलेल ह्याचें निरीक्षण करण्यांत येई.

"गुलाबाला अजून कां बरें कळी येत नाहीं?" रघुनाथनें विचारलें.

"येईल. त्याला पानें बघ कशीं फुटलीं आहेत," स्वामी म्हणाले.

"गुलाबाचें पहिलें फूल फुललें म्हणजे आपण बागेंत समारंभ करूं," नामदेव म्हणाला.

"समारंभ करावयाचा म्हणजे काय करावयाचें?" रघुनाथनें विचारलें.

"सारीं मुलें येथें जमूं. स्वामीजी कांहीं सांगतील. मी बांसरी वाजवीन," नामदेव म्हणाला.

"करूं, समारंभ करूं," स्वामी म्हणाले.

गुलाबाला कळी आली कीं नाहीं तें रघुनाथ रोज पाहावयाचा. 'अजून नाहीं कळी येत; केव्हां येईल?' असें मनांत म्हणावयाचा. परंतु एक दिवस हिरवा परकर नेसलेली लहानशी कळी आली! रघुनाथनें हर्षाची टाळी पिटली.

"नामदेव नामदेव," त्यानें हाक मारली.

"काय रे रघुनाथ?" नामदेवानें विचारलें.

"अरे कळी आली. चिमुकली कळी ही बघ." रघुनाथचा आनंद गगनांत मावेना. नामदेव आला. खालीं वाकून त्यानें ती पाहिली. त्याच्या नाकाला ती कळी लागली. त्या कळीला रघुनाथनें कुरवाळलें, दोन्ही हातांत धरून ठेविलें.

"रघुनाथ, असें नको करूं. ती कळी अशानें हाताळेल, चुरगळेल; तिच्याकडे दुरूनच बघ," नामदेव म्हणाला.

रघुनाथ वेळ मिळतांच त्या कळीचें दर्शन घेण्यासाठीं येत असे. तिला कीड नाहीं ना लागली, मुंग्या नाहीं ना खात—नीट लक्ष देऊन पाही. मुंगी दिसली तर ती हाकली. जणूं तो स्वतःच्या पवित्र कळीलाच फुलवीत होता. कळी वाढूं

लागली. तिचें अंतस्तेज प्रकट होऊं लागलें. आंतील गंध व रंग हळूहळू बाहेर येत होतीं. कशी टपोरी फुगीर दिसत होती ! अनंत आनंदानें जणुं ती भरली होती.

एके दिवशीं सकाळीं ती कळी फुलली! भीत भीत तें फूल सृष्टीकडे बघत होतें. सूर्याकडे बघत होतें. विनयानें अर्धस्मित करीत होतें. थोडी मान वर, थोडी खालीं ; थोडें मिटलेलें, थोडें उघडलेलें ! किती गोड, गोड फूल !

रघुनाथ पाहातच राहिला. स्वामी पाहातच राहिले. नामदेव पाहातच राहिला.

" आज रात्रीं येथें आपण समारंभ करूं, " नामदेव म्हणाला.

" करा, " स्वामी म्हणाले.

रात्रींचीं जेवणें झालीं. एकदम बिगूल वाजलें. सारीं मुलें खोल्यांतून बाहेर पडलीं. आपापले कंदील घेऊन मुलें बागेंत आलीं. वरतीं आकाशांत तारे होते. फुलें फुललीं होतीं. मुलें बसलीं. स्वामी बसले. त्यांनीं प्रथम आश्रमभजनावलींतील एक प्रार्थनागीत म्हटलें.

' अंतर मम विकसित करो अंतरतर हे । '

हें उद्बोधक पद त्यांनीं म्हटलें. पद म्हणून झाल्यावर त्यांनीं चार शब्द सांगितले. ते म्हणाले, " मुलांनो, ज्या जागेवर आपण आतां बसलेले आहोंत, ती एक पडकी ओसाड भूमि होती. आवारांतील सारी घाण येथें टाकीत. पहिली घाण पाहून आणखी घाण येथें येई. परंतु ह्या भूमीची रघुनाथ, नामदेव, यशवंत, दयाराम यांना दया आली. ह्या भूमीचें रडगाणें त्यांनीं ऐकलें. ' माझी जर कोणी काळजी घेईल, मला जर कोणी पाणी घालील, माझ्यांतील दगडधोंडे काढील, माझ्यांत चांगलें पेरील, तर मीही हसेन. मी वाईट नाहीं, तुच्छ नाहीं ; गंधवती पृथ्वीचाच मी अंश आहें. ' ह्या भूमीमध्यें फुलबाग होण्याचें सामर्थ्य होतें. आपण तें प्रकट केलें आहे.

" मित्रांनो, आपल्या देशांत किती पडीत जमिनी आहेत. बाहेरच्या पडीत जमिनींचे मळे करावयाचे आहेत. परंतु त्यांशिवाय दुसऱ्या देवाघराच्या पडीत जमिनी आहेत. भिल्ल, गोंड, कातकरी, अस्पृश्य—शेंकडों तिरस्कृत केलेल्या, उपेक्षित केलेल्या जाती आहेत. सेवेचे पाट घेऊन त्यांच्याकडे आपण गेलें पाहिजे. त्यांच्या ओसाड मनोभूमि लागवडीस आणल्या पाहिजेत. त्यांना संस्कृति दिली पाहिजे. विचारवेलींची, सत्कल्पनांच्या लतांची लावणी त्यांच्या हृदयभूमींत केली

पाहिजे. आपल्या वरच्या वर्णांचीं मनें आतां निःसत्त्व झालीं आहेत. पीक पुष्कळ घेतलें म्हणजे जमीन नापीक होते. आतां पडीत जमिनी मशागतीस आणूं या, म्हणजे अपरंपार पीक येईल. हिंदुस्थानांत कला व विद्या ह्यांचा नवविकास व्हावयास पाहिजे असेल, तर अस्पृश्यांच्या, भिल्लकातकऱ्यांच्या मनोभूमींत काम करावयास चला. तेथें मनगटासारखीं विचारांचीं कणसें येतील. तुम्हांला पुढें हें काम करावयाचें आहे. आपला रडका भारत हसवायचा आहे. नंदनवनाप्रमाणें भारत होता. आज त्याचा मसणवटा झाला आहे. परकीय व स्वकीय दास्यामुळें भारत रडत आहे. त्याला तुम्ही नाहीं का फुलवणार?

"ही बाग तयार करण्यासाठीं सर्वांनीं सहकार्य केलें. नामदेव, रघुनाथ, यशवंत, सारे पाणी घालीत, घडे भरून आणीत. रघुनाथाच्या हातांतील घागर नामदेव घेई, नामदेवाच्या हातांतील दयाराम घेई. भावी जीवनांत असेंच सहकार्य तुम्ही नाहीं का करणार? संघ स्थापून, मंडळें स्थापून, आश्रम स्थापून देशाला नाहीं का नवजीवन देणार?

"रघुनाथ, एक गुलाबाची कळी फुलावी म्हणून तूं किती झटत होतास. उद्यां मोठा झालास म्हणजे आजूबाजूच्या दीन दरिद्री बंधूंच्या जीवनाच्या कळ्या फुलव. किती गरिबांचीं मुलें मरत आहेत! त्या गुलाबाच्या कळ्या कोण फुलवणार? त्या मुलांच्या गालांवर आनंदाचा, आरोग्याचा गुलाबी रंग कोण फुलवणार?

"मुलांनो, हा बाहेरबगीचा आहे, तसाच एक अंदरबगीचाही आहे. येथें बाहेर गुलाब फुलविलेत, अंतःकरणांतही गुलाब फुलवा. ह्या जमिनीवरची घाण दूर केलीत, तशी हृदयांतीलही घाण दूर करा. हृदयांत सद्विचारांचीं रोपें लावा, सत्कल्पनांच्या वेली लावा, स्फूर्तीचीं कारंजीं नाचवा. बाहेर फुलें फुलवा, आंत फुलें फुलवा.

"रघुनाथ, ह्या गुलाबाच्या कळीला जपत होतास. कीड मुंगी झाडीत होतास. तुझ्या जीवनाच्या कळीलाही जप. जीवनाच्या कळीलाही मोहाचे किडे खाणार नाहींत, वासनांचे भुंगे पोखरणार नाहींत ह्याबद्दल जप. बाहेर श्रम करीत राहिलेत म्हणजे हृदय आपोआप फुलेल. आळशी माणसाचें हृदय सैतानाचें माहेरघर होतें. परंतु कर्मयोग्याचें हृदय म्हणजे सद्गुणांचें वासस्थान होतें. नेहमीं उद्योगांत राहा, कर्ममय व्हा — म्हणजे जीवनाला तेज चढेल, मलीनता झडेल.

"स्वतःचें जीवन समृद्ध करणारे, आपल्या बांधवांचीं जीवनें रसमय करणारे, भारतमातेला हसवणारे, देवाचे मजूर आपण होऊं या.

देवाचे मजूर । आम्ही देशाचे मजूर ।
कष्ट करूं भरपूर ॥ आम्ही देवाचे मजूर ॥
बाहेरील ही शेती करून
धनधान्यानें तिला नटवून
फुलांफळांनीं तिला हसवून
दुष्काळा करूं दूर ॥ आम्ही० ॥
हृदयांतीलहि शेती करून
स्नेहदयेचे मळे पिकवून
समानता प्रेमाला निर्मून
सौख्या आणूं पूर ॥ आम्ही० ॥
रोगराई ती करुनि दूर
घाण सकलहि करुनि दूर
स्वर्ग निर्मूं तो या पृथ्वीवर
बदलूं सारा नूर ॥ आम्ही० ॥
दिवसभर असे कष्ट करून
जाऊं घामाघूम होऊन
रात्रीं भजनीं जाऊं रमून
भक्तीचा धरूं सूर ॥ आम्ही० ॥
कर्मामध्यें दिव्यानंद
सेवेमध्यें दिव्यानंद
नाहीं अन्य फळांचा छंद
नाहीं कांहीं जरूर ॥ आम्ही० ॥

"गड्यांनो, असे देवाचे मजूर तुम्ही पुढें व्हाल अशी मी आशा धरून येथें वागत आहें. माझी ही आशा व्यर्थ नाहीं ना दवडणार? हीच आशा धरून देवानें तुम्हांला जन्माला घातलें. त्याची ती थोर आशा नाहीं ना धुळींत मिळवणार? परमेश्वर अनंत निराशा सहन करतो. त्याच्या आशावादीपणास अंत नाहीं. परंतु माझ्यासारख्या पामरांना आशाभंग सहन होत नाहीं. आपल्या

हृदयांत केळवलेल्या आशा विफल झालेल्या पाहाणें ह्याहून तीव्र व कटु दुःख दुसरें कोणतें आहे ? "

" असो. आतां नामदेव बांसरी वाजवील. ती ऐकून मग आपण जाऊं या. "

नामदेवानें बांसरी काढली. वरतीं ताऱ्यांचें संगीत चाललें होतें. सभोवतीं सुगंधी वाऱ्याचें संगीत चाललें होतें. हृदयांत दिव्य भावनांचें संगीत चाललें होतें. सारी अंतर्बाह्य सृष्टि महान् संगीतासिंधूंत डुंबत होती. नामदेवाची वेणू थांबली.

" नामदेव, किती सुंदर वाजवतोस. तुझ्या ओंठांपासून ती वेणू कधीं दूर न व्हावी व सर्वांची समाधी लागावी असेंच मला वाटत आहे, " स्वामी म्हणाले.

" नामदेव छात्रालयाचें भूषण आहे, " मुकुंदा म्हणाला.

" तो उद्यां खानदेशचें भूषण होईल, महाराष्ट्राचें भूषण होईल, " स्वामी म्हणाले.

समारंभ संपला व मुलें आपापल्या खोलींत गेलीं. कांहीं अभ्यास करीत बसलीं. कांहीं अंथरुणावर पडलीं. कांहीं विचार करीत बसलीं. तो पाहा रघुनाथ गच्चीवर जात आहे. गच्चींत उभा राहून तो वरच्या अनंत आकाशाकडे पाहात आहे. ताऱ्यांप्रमाणें अश्रु त्याच्या डोळ्यांत चमकत आहेत. रघुनाथ, कां रे रडतोस ? कां हें पाणी ? हें अंदरबगीचा फुलविण्यासाठीं पाणी. हृदयांत मांगल्य निर्माण करण्यासाठीं हें पाणी.

स्वामी म्हणाले, " रघुनाथ, जीवनाला कीड लागूं देऊं नकोस ! "

ते शब्द रघुनाथाच्या हृदयांत सुरीप्रमाणें घुसले. रघुनाथाला स्वतःचें जीवन किडलेलें दिसलें. किती तेथें घाण, किती बरबट ! एवढ्या लहान वयांतच किती वासनांचा धुमाकूळ ! तो देवाला म्हणाला, ' देवा, तूं माझी आई हो. तूं मला धू. माझी घाण धुवावयास मी असमर्थ आहें. तुझें बाळ धुवून स्वच्छ कर. जसें माळावरचें उनाड फूल, तसें माझें जीवन. तें कसें तरी वाढलें, कोठें तरी गेलें. ना मार्ग दाखवावयास कोणी, ना काळजी घ्यावयास कोणी. ' रघुनाथाला गीतांजलींतील प्रार्थना आठवली. स्वामींची आवडती प्रार्थना.

' हे जीवनेश्वरा ! मी माझें जीवन निर्मळ राखीन. माझें शरीर निर्मळ राखीन. माझें हृदय प्रेमानें भरीन. माझ्या बुद्धींत ज्ञानाचा दिवा लावीन. '

निर्मळ शरीर, निर्मळ हृदय, निर्मळ बुद्धि ! आणि हीं तिन्ही भारतमातेस अर्पण करावयाचीं ? आणि माझी माता ? रघुनाथाला स्वतःची कष्टमूर्ति आई डोळ्यांसमोर दिसली. वडील आईला मारीत आहेत, कुऱ्हाड घेऊन आईच्या अंगावर धावत आहेत ! खायला घरांत दाणे नाहींत म्हणून लोकांचें दळण करणारी आई ! जिला जगांत प्रेमाचा शब्द कधीं ऐकावयास मिळाला नाहीं, गोड घास खायला मिळाला नाहीं ! एकीकडे त्याला स्वतःची आई दिसे, तर दुसरीकडे भव्य भारतमाता दिसे. हृदयसागरांतून दोन माता पुन्हा पुन्हा वर येत व रघुनाथाकडे आशेनें बघत.

‘ रघुनाथ, हीं बघ तुझीं तीन भावंडें. ह्यांना खायला नाहीं रे मला देतां येत. तुला ते पैसे पाठवतात, पण आमचे हाल करतात रे. त्या रांडेच्या घरीं सारें नेऊन भरतात. मला दाणेही नाहीं रे घरांत ठेवीत. रघुनाथ, मोठा हो व ह्या भावंडांना वाढव. मोठा हो व आईचे अश्रु पूस. तुझी मला आशा, तुझा विसावा, ’ असें आई म्हणत होती.

‘ रघुनाथ, हीं पाहा कोट्यवधि तुझीं भावंडें ! हे पाहा कारखान्यांतील पिळवटून जाणारे, चिपाडाप्रमाणें होणारे तुझे लाखों भाऊ ! हे पाहा सावकारी पाशांत जखडून गेलेले तुझे शेतकरी बंधु ! नवरा दारूबाज झाल्यामुळें ही पाहा लाखों पत्नींच्या अश्रूंची वाहाणारी कढत कढत अश्रूंची महागंगा ! सनातनी दगडांच्या जाचामुळें त्रस्त झालेली ही पाहा अस्पृश्य जनता ! हे पाहा हिंदुमुसलमानांतील मारामारीचे माझ्या अंगावर उडणारे रक्ताचे थेंब ! ह्या पाहा परकी सरकारनें चालविलेल्या पिळणुकी व ह्या धगधगीत जालियनवाला बागा ! रघुनाथ, एका साडेतीन हाताच्या आईकडे नको बघूं. मी मातांची माता आहें. मला मुक्त कर म्हणजे इतर कोट्यवधि माता आपोआप मुक्त होतील. माझे अश्रु पूस म्हणजे त्यांचे पुसले जातील. मोठ्यांत छोटें येऊन जातें. रघुनाथ, तुम्हा मुलांकडे मी आशेनें बघत आहें. इतर भूमाता माझ्यासारख्या अभागी नाहींत. जपान भूमातेसाठीं लाखों मरावयास उठतात. फ्रान्स, जर्मनी, रशिया, इंग्लंड, तुर्कस्थान ह्या साऱ्या भूमाता सत्पुत्रवती आहेत. आणि मी ? पस्तीस कोटी माझीं लेंकरें. तरीही माझी कुतरओढ व्हावी का ? ह्या जगांत ज्ञानानें, भक्तीनें, धनधान्यानें पूर्वी मिरवलें. ध्येयवादानें, सत्यानें, सत्त्वानें शोभलें. परंतु आज मात्र

साऱ्या जगांत मजहून तुच्छ दुसरें कोणी नाहीं. मी रडूं नको तर काय करूं? रघुनाथ, या, सारे या. माझे अश्रु पुसून मला हसवा.'

भारतमातेचे शब्द रघुनाथाच्या हृदयांत शिरत होते.

ही माता का ती माता?

जन्मदात्री माता का अन्नदात्री माता?

क्षणभंगुर माता का अनाद्यनंत भारतमाता?

निश्चय होईना. रघुनाथ केविलवाणें तोंड करून बसला होता.

"रघुनाथ, अजून तूं जागा?" स्वामींनीं विचारलें.

"मी विचारांत होतों," रघुनाथ म्हणाला.

"फार विचार करणें बरें नाहीं. थोडी ती गोडी. जीवनाला फार खणीत नको बसूं. जा आतां नीज," असें म्हणून स्वामी गेले.

रघुनाथ अंथरुण घेऊन वरतींच आला. तेथेंच गच्चींत त्यानें अंथरुण घातलें. अंथरुणावर तो पडला. आकाशांतले तारे त्याला दिसत होते. त्याला स्वामींचें वचन आठवलें.

'दिवसां आपण पृथ्वीवर सत्कर्मांचीं फुलें फुलवावीं. रात्रीं देवाचीं फुलें फुललेलीं बघावीं.'

खूप जोराचा वारा सुटला. चोहोंबाजूंनीं वारे येऊं लागले. त्या रघुनाथाला दशदिशांतून येऊन वारे त्याला कुरवाळीत होते; त्याला गाणीं म्हणत होते; ते वारे भारतवर्षाची सर्व कहाणी त्याला सांगत होते. बंगालमधील हजारों कुटुंबांतील अश्रूंच्या कथा, वियोगाच्या कहाण्या ते अश्रु सांगत होते. मद्रास-प्रांतांत मिठासाठीं समुद्रकिनाऱ्यावर जाऊन लोक जमीन कशी चाटतात तें ते वारे सांगत होते. पिण्याला पाणीही संस्थानांतून मिळत नाहीं, अब्रूची सुरक्षितता नाहीं, असें संस्थानी वारे सांगत होते.

ते वारे त्याला म्हणाले, 'रघुनाथ, झोप; तुझ्या आईचे अश्रु आम्ही पुसूं; तूं भारतमातेचे अश्रु पुसावयास जा. तूं रजपूत आहेस. रजपूत कुळाची पर्वा करीत नाहीं. घरादाराची पर्वा करीत नाहीं. रजपूत देशासाठीं मरतो! रघुनाथ, शिसोदे कुळांतील ना तूं? राणा प्रताप आठव. बाप्पा रावळ आठव. घरच्या मोहांत पडूं नकोस. मोहाशीं झगड व भारताची हाक ऐक.'

रघुनाथ अंथरुणावर पडला. परंतु अनेक विचारांचे वारे हृदयाकाशांत भावनांच्या उष्णतेमुळें उत्पन्न झाले होते. असें करतां करतां त्याला झोप लागली.

स्वामींच्या विचारांचा, शिकवणीचा, उदाहरणांचा रघुनाथवर जसा विलक्षण परिणाम होई, तसाच नामदेववरही होई. नामदेवही फार भावनाप्रधान होई. तो मुका कवि होता. तो फार बोलत नसे. तो आपल्या भावना संगीतांत प्रकट करी. रंगांत प्रकट करी. नामदेव कलावान् होता. ईश्वरानें त्याला सौंदर्योपासक बनविलें होतें. त्याचीं बोटें कलावानाचीं होतीं. तीं लांब टोकदार बोटें होतीं. तीं बोटें सुंदर चित्रें काढीत, बांसरीवर सुंदर फिरत. सूर्यास्त झाला म्हणजे छात्रालयाच्या विहिरीवर जाऊन तो बसे व आकाशांतील रंगशोभा पाही. देवाची चित्रकला पाही. स्वामींजवळून त्यानें एक रामाची सुंदर तसबीर घेतली होती. त्या तसबिरीस तो फुलांचे हार घाली. तेथें उदबत्ती लावी. नामदेवाच्या खोलींत कधीं घाण नसावयाची. सारें स्वच्छ, सुंदर, सुव्यवस्थित. सारें पवित्र व गोड. त्याच्या पुस्तकांवर नीट कव्हरें असत. वहीवर डाग नसे. त्याचा पोषाख साधाच परंतु स्वच्छ असे. खादीची पांढरी टोपी त्याला किती खुलून दिसे. त्याचे केंस अगदीं काळे कुळकुळीत होते. त्याचें कपाळ निर्मळ व मोठें होतें. नाक सरळ, जरा बांकदार होतें. ओंठ लाल व पातळ होते. त्याची अंगकांति गोरी होती. अत्यंत प्रमाणबद्ध त्याचें शरीर होतें. जणुं देवानें कलेचा नमुनाच त्याच्या रूपानें निर्माण केला होता.

नामदेवाचें घराणें प्रसिद्ध होतें. पूर्वज पराक्रमी सरदार होते. सुसंस्कृत घराणें होतें. नामदेवाच्या घरीं सत्यशोधकी पंथ होता. त्याचे वडील वाचणारे होते. विजयी मराठा वगैरे पत्रें त्यांच्याकडे येत असत. मराठींतील कितीतरी सुंदर पुस्तकें त्यांच्याकडे होतीं. गीतारहस्य होतें. विवेकानंदांचे खंड होते. गाथा होती. नामदेवानें घरीं पुष्कळ वाचलें होतें. विवेकानंदांच्या चरित्राचा त्याच्यावर फार परिणाम झाला होता. तो विवेकानंदांचा वेडा होता. विवेकानंदांचे कितीतरी निरनिराळे फोटो त्याच्या खोलींत टांगलेले असत.

नामदेवाची आई तो लहान असतांनाच वारली होती. रायबांनींच त्याला वाढविलें. तळहाताच्या फोडाप्रमाणें म्हातारा नामदेवाला जपायचा. नामदेवावर वडिलांचें फार प्रेम होतें. बाप नामदेवाचा वेडा होता. दहावारा वर्षांचा

होईपर्यंत नामदेवाला ते आपल्याजवळ निजावयास घेत. मुलाला जरा कांहीं झालें तर रायबा घाबरून जात. नामदेव आजारी पडला तर रायबा आजारी पडायचे ! जणुं मुलाचें दुखणें ते स्वतःवर घेत.

आईवेगळा नामदेव, सर्वांत लहान नामदेव, सुंदर गोरागोमटा नामदेव, रायबांचा प्राण होता. रायबा म्हणायचे, ‘ माझ्या नाम्याचे दांत मोत्यासारखे आहेत. माझ्या नाम्याच्या ओंठावरील हसूं देवाच्या मूर्तीच्या तोंडावरील हास्याप्रमाणें गोड व रमणीय आहे. ’ ज्याला देवानें असें सुंदर रूप दिलें त्यानें त्याला सुंदर मनोबुद्धि नसेल का दिली ?

नामदेव कधीं खेळायला जायचा नाहीं, व्यायाम करायचा नाहीं.

“ नामदेव, चल रे तालमींत, ” मुकुंदा त्याला हाक मारी.

“ मुकुंदा, त्या तेल लावलेल्या मलखांबावर तूंच उड्या मार, मी बघेन, ” असें तो म्हणे.

एकादे वेळेस स्वामी त्याला हात धरून खेळावयास नेत. बागेचें काम सुरू झाल्यापासून नामदेवाला व्यायाम होऊं लागला. त्याला बागेंत काम करणें आवडे. तो फुलझाडांना माती घाली. विहिरीचें पाणी ओढून काढी व झाडांना नेऊन घाली. तो कलावानाचा आनंद होता. फुलें फुलविण्याचें तें काम होतें. तो निर्माण करणारा, कांहीं तरी नवीन सुंदर सुगंधी सृजन करणारा तो श्रम होता.

नामदेवाला स्वामींबद्दल काय वाटे तें शब्दांत सांगतां येणार नाहीं. तुळशीदासांच्या शब्दांत सांगावयाचें तर असें म्हणतां येईल,

> ब्रह्म तूं हूं जीव तूं ठाकूर हूं चेरो
> तात मात गुरु सखा तूं सबविधिहि तूं मेरो
> तोहि मोहि नातें अनेक मानिये जो भावै ’

स्वामींची काय सेवा करावी तें त्याला समजत नसे. परंतु एके दिवशीं त्याला सेवेचा मार्ग दिसला. शाळेंतून येतांच तो स्वामींच्या खोलींत जाई. त्या वेळेस स्वामी खोलींत नसत. स्वामींचा कंदील तो पुसून ठेवी. त्यांत तेल वगैरे सर्व भरून ठेवी. स्वामी रात्रीं येत तों कंदील पुसून ठेवलेला ! कोण कंदील पुसतें, त्यांना कळेना. एके दिवशीं खोलींतच राहावयाचें त्यांनीं ठरविलें. शाळा सुटतांच नामदेव छात्रालयांत आला. आधीं स्वामींच्या खोलीकडे निघाला. स्वामींच्या खोलीला कुलूप नसे. त्यानें दार उघडलें तों आंत स्वामीजी !

" नामदेव, काय पाहिजे ? " त्यांनीं विचारलें.

" कांहीं नाहीं, " तो लाजत म्हणाला.

" उगीच आला होतास ? कंदील पुसावयास आला होतास, होय ना ? मी ओळखलें कीं नाहीं ? " स्वामींनीं विचारलें.

" होय, " नामदेव म्हणाला.

" नामदेव, मी कधीं आजारीं पडलों तर करा माझें काम. परंतु मी जोंपर्यंत हिंडता फिरता आहें, निरोगी आहें, तोंपर्यंत माझें काम मीच करीन. दुसऱ्यानें काम केलेलें मला आवडत नाहीं, " स्वामी विरक्तपणें म्हणाले.

" तुम्हीं मात्र आमचें काम करावें का ? तुम्ही आमच्यासाठीं किती काम करतां ? रोज पहाटे उठून दैनिक लिहितां, प्रार्थना सांगतां. आमचे निरनिराळ्या विषयांचे तास घेतां. आजारी पडलों तर शुश्रूषा करतां. आमच्या खोल्याही झाडतां, कपडेही धुतां. दैनिकांत नवीन नवीन माहिती देण्यासाठीं किती वाचतां, किती चाळतां ! तुमची सेवा आम्ही घ्यावी ; आमची तुम्हीं कां घेऊं नये ? तुम्हांला आमच्याबद्दल परकेपणा वाटतो, होय ना. तुम्हांला आमची सेवा घ्यावयाचा अधिकार आहे. आईबापापेक्षां अधिक अधिकार तुम्हीं प्राप्त करून घेतला आहे. पुसूं का मी कंदील ? घेऊं ? " नामदेवानें विचारलें.

" घे हो नामदेव, तुला त्या सेवेंत आनंद असेल तर घे. तुझा आनंद मी कां हिरावून घेऊं ? " स्वामी म्हणाले.

" माझा आनंद म्हणजे जर तुमचें दुःख असेल, तर तो आनंद मला काय करावयाचा आहे ? " नामदेव म्हणाला.

" माझा कंदील तूं पुसलास तर मी दुःख करणार नाहीं. नामदेव, आज माझा कंदील पुशीत आहेस. परंतु भारतमातेच्या लाखों झोपड्यांत प्रकाश न्यावयाचा आहे. तें काम पुढें कर हो ! तें काम विसरूं नकोस, " स्वामी म्हणाले.

नामदेवानें कंदील पुसला. कंदील पुसतांना त्याचें तोंड किती सुंदर व सात्विक दिसत होतें. हृदयांतील आनंदाचा व कृतज्ञतेचा दिवा, त्याची प्रभा तोंडावर उमटली होती.

एके दिवशीं स्वामी पहाटे स्नानास गेले होते. ते आंघोळ करून खोलींत आले. ते दैनिक लिहावयास बसले. तों तेथें त्यांना चिठ्ठी आढळली. कोणाची

होती ती चिठ्ठी ? ती नामदेवानें लिहिली होती. स्वामी आंघोळीला गेल्यावर ती त्यानें हळूच तेथें आणून ठेवली होती. त्या चिठ्ठींत काय होतें ?

" मला मार्ग दाखवा. माझें मन स्थिर होत नाहीं. तें अभ्यासांत रमत नाहीं. शेंकडों ध्येयें डोळ्यांसमोर येतात व मी तंद्रींत राहातों. कधीं रामतीर्थ कधीं विवेकानंद, कधीं रवींद्रनाथ टागोर, तर कधीं नंदलाल बोस. माझ्या डोळ्यां-समोर थोरामोठ्यांचीं चरित्रें येतात. मी विचारांच्या नादांतच राहातों. मी पहाटे उठून वाचूं लागतों. पांच मिनिटें वाचून होतात न होतात तोंच मन कोठेंतरी उड्डाण करून जातें. "

त्या पत्रांत पुष्कळ मजकूर होता. त्या पत्राला दैनिकांत स्वामींनीं उत्तर दिलें. तें पत्र जसेंच्या तसें दैनिकांत त्यांनीं दिलें होतें. फक्त नामदवाचें नांव त्यांनीं गुप्त ठेविलें होतें. स्वामींच्या उत्तरांतील महत्त्वाचा भाग ध्यानांत धरण्यासारखा होता.

' केवळ ध्येयाच्या विचारांत राहाणें योग्य नाहीं. ती एक प्रकाची कर्महीन गुंगी आहे. केवळ विचारांतच राहाण्याची मग आपणांस सवय होते. ज्या वेळेस जें काम हातीं असेल, त्या वेळेस त्यांतच बुडून गेलें पाहिजे. रामतीर्थ विद्यार्थि-दशेंत चोवीस तास अभ्यास करीत. स्वप्नांतही गणितांतील प्रमेयें ते सोडवीत असत. रामतीर्थांची दिव्यता आपणांस दिसते. परंतु त्यांचे निष्ठापूर्वक रात्रंदिवस केलेले प्रयत्न ते आपणांस दिसत नाहींत. झाडावरचीं फुलें-फळें दिसतात. परंतु झाडें रात्रंदिवस ओलावा मिळावा म्हणून मुळांच्या साहाय्यानें कशीं धडपडत असतात तें जगाला दिसत नाहीं. आज तुम्ही विद्यार्थी आहां. वाचा, मनन करा, शरीर कमवा, ज्ञान मिळवा. आज पाया भरावयाचा आहे. अशा वेळेस मनाला मोकाट सोडणें योग्य नाहीं. स्वतःशीं कठोर झालें पाहिजे. कोंडलेला मनुष्य हवेसाठीं, बुडणारा कांठासाठीं, कृपण कवडीसाठीं, त्याप्रमाणें विद्यार्थ्यांनीं ज्ञानासाठीं तडफडलें पाहिजे. ज्ञान, प्रेम व सामर्थ्य मिळवा.

' तसेंच आपल्यांतील दोषांचें सारखें चिंतन करीत बसूं नये. आपल्यांतील दोषांची सतत खंत बाळगीत राहिल्यानें ते दोष उलट दृढमूल होतात. आपण आपल्यांतील सदंशावर दृष्टि केंद्रिभूत केली पाहिजे. मी वाईट आहें, मी असाच चंचल सदैव असणार असें म्हणत बसाल तर तसेच व्हाल. मी ईश्वराचा पुत्र आहें, परमात्म्याचा अंश आहें, मी मंगल आहें, शिव आहें, सुंदर आहें, समर्थ आहें असा संकल्प कराल तर तसे व्हाल. जे विचार मनांत नांदवाल तसे व्हाल.

आपलें आजचें जीवन कालपर्यंत केलेल्या विचारांचें फळ आहे. जे विचार खेळवाल तसा वृक्ष होईल. आजचा दिवस माझा चांगला गेला असें ज्याला निजतांना म्हणतां येईल व आजची माझी रात्र चांगली गेली असें उठतांना ज्याला म्हणतां येईल तो परमकृतार्थ होय, तो मुक्त पुरुष होय.'

नामदेवाला उत्तर वाचून आनंद झाला. त्यानें तें उत्तर कितीदां तरी वाचलें. कोणी मुलें वाचनालयांत नाहींत असें पाहून त्यानें तो दैनिकाचा अंक हृदयाशीं दोन्ही हातांनीं घट्ट धरून ठेविला. डोळे मिटून बसला.

"नामदेव, झाला का रे वाचून अंक ? मला दे," एक मुलगा म्हणाला. नामदेवानें डोळे उघडले. तो अंक त्या मुलाला देऊन नामदेव निघून गेला.

एकदां शाळेंत परीक्षा होती. नामदेवानें एका मुलाला गणिताचें उत्तर विचारलें. नामदेवाचें उत्तर बरोबर होतें. परंतु घरीं आल्यावर नामदेवाच्या मनाला ती गोष्ट झोंबली. आपण असत्य गोष्ट केली. कांहींतरी स्वतःला शिक्षा केली पाहिजे असें त्याला वाटलें. त्यानें तापलेल्या कंदिलावर आपलें सुंदर मनगट ठेवलें. त्यानें मनगट भाजून घेतलें. त्यावर पांढरी स्वच्छ पट्टी त्यानें बांधून ठेवली. दुसऱ्या दिवशीं नामदेव गणितशिक्षकाकडे गेला व त्यांना त्यानें सर्व हकीकत सांगितली. "माझें गणित चूक द्या वाटलें तर. मीं स्वतःला शिक्षाही करून घेतली आहे'" असें सद्गदित होऊन तो म्हणाला.

"नामदेव, तूं वेडा आहेस असा हात का भाजून घ्यावा. विवेक करणें, संयम राखणें ही गोष्ट शीक. बिचाऱ्या शरीराला कां कष्ट ?" असें शिक्षक म्हणाले.

"नामदेव, हाताला रे काय लागलें ?" स्वामींनीं विचारलें.

"कांहीं नाहीं," तो म्हणाला.

"बागेंत काम करतांना का लागलें ? दगडबिगड नाहीं ना लागला ? बघूं दे मला" असें म्हणून स्वामी त्याची जखम पाहूं लागले.

"काय रे हें ? भाजला वाटतें हात ?" स्वामींनीं विचारलें.

"ती माझ्या हाताला मीं शिक्षा केली आहे," नामदेव खालीं मान घालून म्हणाला.

"फुलें वाढवणाऱ्या, झाडांना पाणी घालणाऱ्या, सुंदर चित्रें काढणाऱ्या, बांसरी बाजवणाऱ्या हाताला कां बरें शिक्षा ?" स्वामींनीं विचारलें.

" मीं असत्य गोष्ट केली म्हणून. वर्गांत दुसऱ्या मुलास मीं गणिताचें उत्तर विचारलें. मला मागून वाईट वाटलें. आठवण राहावी म्हणून ही शिक्षा मीं केली आहे. पुन्हा खोटें करतांना हा डाग मला दिसेल, " नामदेव म्हणाला.

स्वामींनीं नामदेवाकडे करुणेनें व प्रेमानें पाहिलें. दोघांनीं एकमेकांकडे पाहिलें. दोघे दोन दिशांना निघून गेले.

रघुनाथ, नामदेव ज्याप्रमाणें जीवनाचा अर्थ समजूं लागले, त्याचप्रमाणें यशवंतही जीवनाची किंमत समजूं लागला. यशवंताच्या पूर्वीच्या जीवनांत व आतांच्या जीवनांत जमीनअस्मानाचा फरक दिसून येत होता. यशवंत एका श्रीमंत जहागीरदाराचा भाऊ होता. लहानपणीं यशवंत शाळेंत जाई, त्या वेळेस एखाद्या राजपुत्राप्रमाणें सजून जाई. अंगांत रेशमी कपडे, डोक्याला भरजरी टोपी, पायांत बूट ! एक गडी त्याला उचलून खांद्यावर घेई, एक गडी त्याचें पाटीदप्तर घेई ! शाळेंत यशवंत कोणाशीं मिसळत नसे. इतर लहान मुलांबरोबर खेळत नसे. कपडे मळतील अशी त्याला भीति वाटे. जरीची टोपी मातींत पडेल अशी त्याला भीति वाटे. त्याची श्रीमंती भूमातेच्या मांडीपासून त्याला दूर ठेवी. मुलाला रंगरूप देणारी धूळ—त्या धुळींत श्रीमंतीमुळें यशवंत खेळूं शकत नसे. भूमाता त्याला हाक मारी, परंतु तो ओ देत नसे.

यशवंताच्या घरीं केवढें गायींचें खिल्लार होतें. परंतु गायींच्या वांसराबरोबर त्याला बागडतां येत नसे. गायीच्या मृदु, मऊ अंगाला त्याला हात लावतां येत नसे. तो घरीं दिवाणखान्यांत बसे. पाटावरून ताटावर व ताटावरून पाटावर एवढेंच काय तें त्याला माहीत. जगांत असून तो जगापासून दूर होता. गायीगुरांत, फुलामुलांत, शेतमळ्यांत असूनही त्यापासून तो दूर होता. तो एकप्रकारें अस्पृश्य होता.

श्रीमंतांचीं मुलें अस्पृश्यच असतात ! कोणत्या थोर भावनांचा त्यांना स्पर्श होत असतो ? दोनचार लांगूलचालन करणाऱ्या 'होयबा' व 'जी सरकार' करणाऱ्या माणसांशिवाय कोठें आहेत त्यांचे मित्र? कृत्रिमता व खोटी आढ्यता ह्यांशिवाय त्यांच्या जीवनांत काय असतें ? समुद्रांत असून ते कोरडे असतात, जिवंत असूनही ते मेलेले असतात. सभोवतीं अनंत जीवनांचा, प्रचंड भावनांचा समुद्र उचंबळत असूनही त्यांचीं हृदयें शुष्क व नीरस राहातात ! जगापासून दूर राखणारी, लाखों स्त्रीपुरुष कामकरी मजूर ह्यांपासून दूर ठेवणारी, सामान्य

जनतेपासून दूर राखणारी, पशुपक्षी, फुलेंमुलें, तारेवारे, ऊनपाऊस ह्या सर्वांपासून दूर ठेवणारी, अनंतरूपानें पसरलेला हा जो विराट विश्वंभर त्याच्या दिव्य स्पर्शापासून दूर ठेवणारी—अशी ही श्रीमंती! तिच्यापेक्षां नरकवास बरा!

बिचारा यशवंत! घरीं पिंजऱ्यांत पाळलेल्या पोपटापेक्षां दुसऱ्या पक्ष्यांची त्याला माहिती नव्हती. तो स्वतःच श्रीमंतीच्या पिंजऱ्यांतील एक पक्षी झाला होता. पिंजऱ्यांतील पोपटाला पेरू मिळेल, डाळिंब मिळेल; परंतु बाहेरच्या सृष्टीचा त्याला जीवनदायी स्पर्श नाहीं. बाहेरचा पोपट हिरव्या गर्द झाडावर बसून वाऱ्याबरोबर झोके घेतो, निळ्या आकाशांत हिंडतो, रानचे विविध मेवे खातो. पिंजऱ्यांतील पोपट त्या हातभर जागेंत नाचणार; तेथेंच उडणार. तेथेंच खाणेंपिणें, तेथेंच मलमूत्रविसर्जन करणें! शिकविलेले दोन शब्द तो बोलेल. यशवंतचें असेंच होतें. ठराविक माणसें, ठराविक गोष्टी, ठराविक पदार्थ, ठराविक शब्द त्याला ठाऊक! घरांतील दहीं, दूध, बासुंदी, अंगावरचे जरीचे कपडे—ह्यांशिवाय त्याला काय माहीत होतें? जगांत कोरडी शिळी भाकर खावी लागते, कांजी प्यावी लागते, लक्तरें व चिंध्या धारण कराव्या लागतात, धुळींत निजावें लागतें, उन्हांत जळावें लागतें, थंडींत गोठावें लागतें—हें त्याला कांहीं माहीत नव्हतें!

पूर्वजांच्या वैभवावर ऐट मारणारे हे ऐदी शेणगोळे पाहिले कीं एक प्रकारची खरोखर चीड येते. पूर्वजांचा पराक्रम गेला, पूर्वजांची तलवार गेली, पूर्वजांची दिलदारी व पूर्वजांचा त्याग—सारें गेलें. खोटा अभिमान व ऐट हीं मात्र ह्या भेषपात्रांजवळ शिल्लक असतात. दागदागिने घालतील, जरीचे पोषाख करतील व मोटारींतून मिरवितील. यशवंत कधीं पायांनीं शाळेंत जात नसे! ईश्वरानें श्रीमंतांस पाय दिले तरी कशाला? उगीच ओझें! एक पोटाची पोतडी दिली असती म्हणजे भागलें असतें! परमेश्वरानें केवळ शिस्नोदर देऊन पाठविलें असतें तर ह्या पौरुषहीन गर्भश्रीमंतांनीं देवाचे आभार मानिले असते. खरें पाहिलें तर शरीराच्या अवयवांचा उपयोग करून शरीर बळकट होतें. अत्यंत परिश्रम केल्यानें शरीर खंगेल ही गोष्टही खरी. परंतु चार पावलें जावयाचें झालें तरी जो पाय उचलीत नाहीं, त्याला काय म्हणावें? आमच्या श्रीमंतीच्या कल्पनाच विचित्र आहेत. ईश्वरानें दिलेल्या हातापायांचा जो कमींतकमी

उपयोग करतो व शिस्नोदराचा जो जास्तींतजास्त उपयोग करतो तो श्रीमंत व सुखी—अशी आमची कल्पना आहे !

जगांतील अनेक शाळा व अनेक छात्रालयें हिंडून यशवंत अमळनेरच्या छात्रालयांत आला होता. विलायती वस्त्रांत नटून मूर्ति आली होती. श्रीमंत लोक म्हणजे परदेशी वस्तूंचीं बोलतींचालतीं प्रदर्शनें ! यशवंत एक भली मोठी काळी ट्रंक घेऊन आला. त्या ट्रंकेंत बारा सदरे होते. बारा हातरुमाल होते. चार कोट होते. दोन वूलन कोट होते. अन्न, वस्त्र ह्यांनीं ती ट्रंक भरलेली होती.

यशवंतला येथें सारेंच निराळें दिसूं लागलें. निराळ्याच जगांत आपण आलों असें त्याला वाटलें.

"यशवंत, आज तूं केर काढ. आज तुझी पाळी," खोलींतील मुलें म्हणालीं.

"मी काढणार नाहीं. मीं आजपर्यंत कधींही केरसुणी हातांत धरली नाहीं," यशवंत म्हणाला.

"जमूं दे खोलींत केर. स्वामी रागावतील," मुलें म्हणालीं.

त्या खोलींतील केर कोणीच काढीना. यशवंत आपलें अंथरुणही गुंडाळीत नसे. एके दिवशीं तो आपल्या खोलींतील मुलांस म्हणाला, "माझें गुंडाळा रे अंथरुण मी तुमच्यापेक्षां श्रीमंत आहें. मी जहागीरदार आहें. तुम्हांला माहीत नाहीं का ?"

"अरे श्रीमंत असलास तर घरचा. येथें आपण सारे सारखे. तुझे कांहीं आम्ही नोकर नाहीं. समजलास ?" तो मुलगा म्हणाला.

मुलांची आंघोळी करण्याची वेळ होती. स्वामी सहज यशवंताच्या खोलींत गेले. तेथें गादी तशीच पडलेली, जिकडेतिकडे केर सांचलेला. स्वामींना वाईट वाटलें. त्यांनीं अंथरुण नीट गुंडाळलें. कोपऱ्यांतील केरसुणी घेऊन ते केर काढूं लागले.

यशवंत खोलींत शिरतो तों तें गंभीर दृश्य.

"तुम्ही कशाला केर काढतां ? तीं मुलें काढतील," यशवंत म्हणाला.

"मीं काढला म्हणून काय झालें ?" स्वामींनीं विचारलें.

"तुम्ही मोठे आहांत," यशवंत म्हणाला.

"केर न काढणारा तो मोठा अशी का तुझी समजूत आहे ?" स्वामींनीं विचारलें.

" मोठीं माणसें अशीं कामें करीत नाहींत ; " तो म्हणाला.

" यशवंत, तूं महात्माजींचें नांव ऐकलें आहेस का ? " स्वामींनीं विचारलें.

" हों, " तो म्हणाला.

" ते मोठे आहेत कीं नाहीं ? "

" जगांतील सर्वांत थोर पुरुष त्यांना म्हणतात, " यशवंत म्हणाला.

" परंतु त्यांनीं कितीदां रस्ते झाडले, कितीदां शौचकूप स्वच्छ केले तुला माहीत आहे ? सेवा करून महात्माजी मोठे झाले. सूर्य, चंद्र, तारे, वारे, जगांतील अंधार व घाण सदैव दूर करीत असतात. नद्या घाण वाहून नेत असतात. आई मुलाची घाण दूर करते. काम टाळल्यानें कोणी मोठें होत नाहीं. यशवंत, श्रीकृष्ण परमात्मा धर्मराजाच्या राजसूय यज्ञाचे वेळीं उष्टीं काढी व शेण लावी. तो अर्जुनाच्या घोड्यांचा खरारा करी. माहीत आहे ? "

" हो, " यशवंत म्हणाला.

" अरे, प्रत्यक्ष भगवानांचे हात घाण दूर करतात तर आपले हात का त्यांच्या हातांपेक्षां पवित्र व थोर ? ज्याचे हात काम करतील त्याचे हात देवाला आवडतात. जो हात श्रमतो, त्यालाच खाण्याचा अधिकार आहे. नाठाळ, दूध न देणाऱ्या गुराला का कोणी प्रेमानें चारा देतो ? त्याप्रमाणें समाजाची सेवा न करणारा, समाजाला भाररूप अशा माणसाला काय म्हणून खायला द्यावें ? "

स्वामी असे बोलत होते. आजूबाजूला मुलें जमलीं. नामदेवानें हळूच स्वामींच्या हातून केरसुणी घेतली होती.

" कोठें आहे केरसुणी ? " त्यांनीं विचारलें.

" मी केर काढतों, " नामदेव म्हणाला.

" आम्ही काढूं ? " खोलींतील मुलें म्हणालीं.

" मीच काढतों, " यशवंत म्हणाला.

" शाबास, यशवंत ! खरा माणूस हो, " स्वामी म्हणाले.

* * *

एके दिवशीं एका मुलाच्या खोलींत स्वामी बसले होते. तो मुलगा गांवाहून आला होता.

" फराळाचा काढ डबा ; आपण सारे मिळून खाऊं, " स्वामी म्हणाले.

त्या मुलानें डबा काढला. खोलींतील सारीं मुलें आलीं.

" त्या यशवंतालाही बोलवा जा, " स्वामी म्हणाले.

यशवंता आला.

" ये, यशवंता, खायला ये. आपण सर्व मिळून खाऊं, " स्वामी म्हणाले.

" माझ्याजवळ आहे, " यशवंत म्हणाला.

" तूं तुझ्या खोलींतील मुलांना नाहीं का देत ? " स्वामींनीं विचारलें.

" नाहीं, " यशवंत म्हणाला.

" तूं त्या सर्वांच्या देखत खातोस का ? "

" नाहीं. मी एकटाच असतों, तेव्हांच खातों, " यशवंत म्हणाला.

" कां बरें ? "

" सर्वांच्या देखत एकट्यानें खाणें बरें नाहीं. "

" आपल्या खोलींतील सारे दूर गेले असतां आपण हळूच चोरासारखें खाणें हें बरें का ? आपलें मनच सांगतें कीं हें बरोबर नाहीं. यशवंत ! आतां आपण सारीं एकाच घरचीं मुलें. ह्या छात्रालयांत आपण सारे एकमेकांचे भाऊ. जवळ खाऊ असेल तो सारे मिळून खाऊं. एकानें दहा दिवस आनंदांत राहावयाचें व बाकीच्यांनीं दहा दिवस दुःखी असावयाचें ; ह्यापेक्षां सारे एक दिवस आनंदांत राहूं या. जाईल दिवस तो सर्वांचा सुखाचा जावो, " स्वामी म्हणाले.

" मी आणूं माझे लाडू ? " यशवंतानें विचारलें.

" आतां नको, उद्यां तुझ्या खोलींत कार्यक्रम करूं. " स्वामी म्हणाले.

" हा खादी कार्यक्रम गोड असतो, " एक मुलगा म्हणाला.

" परंतु अंगावर खादी घालण्याचा कार्यक्रम जड असतो नाहीं ? " स्वामींनीं विचारलें.

" यशवंत, फिरावयास येतोस ? " नामदेवानें विचारलें.

" हो. चल आपण नदीकडे जाऊं, " यशवंत म्हणाला.

दोघे नदीकडे गेले. प्रथम कोणी बोलत नव्हतें. शेवटीं नामदेवानें बोलावयास सुरुवात केली.

नामदेव : यशवंत ! पूर्वी तूं कोठें होतास ?

यशवंत : बडोद्याला शिकत होतों. तेथें मी घोड्याच्या गाडींतून शाळेंस जात असें. तेथें केवढी माझी ऐट !

नामदेव : तेथें तुला कोणी मित्र होते का ?

यशवंत : कोणी नाहीं.

नामदेव : येथें कोणी मित्र आहे ?

यशवंत : अजून माझा कोणाशीं फारसा परिचय नाहीं.

नामदेव : होईल हळुहळू. तूं मुलांत मिसळत जा. खोटा मोठेपणा सोड. खेळायला जात जा.

यशवंत : मला व्हॉलीबॉल आवडतो.

नामदेव : मग जात जा ना. मला खेळायला नाहीं आवडत. परंतु तूं जात जा. खेळण्यानें मोकळेपणा येतो. अहंकार जातो. कृत्रिम भेद मावळतात. स्वामी सांगतात कीं कृष्णपरमात्मा गोकुळांतील सर्वांना खेळायला लावी. असें करूनच त्यानें सारे भेदभाव नष्ट केले. कृष्णानें खेळाची दिव्यता दाखविली. खेळ ही दैवी वस्तु आहे.

यशवंत : भगवान् कृष्णानें क्रीडेचें महत्त्व ओळखलें. कृष्णानेंच श्रमाचें महत्त्व वाढविलें.

नामदेव : आणि कृष्ण कांबळा पांघरे व वनमाळा घाली. यशवंत, तूं खादी केव्हांपासून वापरणार ? खादी म्हणजे स्वामींचा प्राण आहे. खादी वापरणाऱ्याला दहा खून माफ असें एखादे वेळेस ते विनोदानें म्हणतात.

यशवंत : त्या दिवशींचें खादीचें प्रवचन ऐकून मला खूप वाईट वाटलें. मुलें सारखीं माझ्याकडे पाहात होतीं.

नामदेव : यशवंत, तूं खरोखर चांगला आहेस. आमच्या सर्वांपेक्षां तूं पुढें जाशील.

यशवंत : आजपर्यंत माझ्याजवळ मोकळेपणानें कोणी बोललें नाहीं. नामदेव, तूं माझा मित्र हो. नामदेव मी वाईट आहें. मला गर्व आहे, मला ऐट आहे.

नामदेव : मला गर्व आहे हें ज्याला समजूं लागलें, त्याचा गर्व गेलाच समज. तुझ्यामधील देव जागा होत आहे.

यशवंत : माझ्यामधील देव ?

नामदेव : हो. प्रत्येकाच्या जीवनांत चांगुलपणा आहे. तो चांगुलपणा म्हणजे देवाचेंच रूप.

यशवंत : नामदेव, तूं किती सुंदर बोलतोस !

नामदेव : स्वामींनीं हें शिकविलें. त्यांनीं ही दृष्टि दिली.

यशवंत : ते खरोखर थोर पुरुष आहेत.

नामदेव : त्यांना शोभेसे आपण होऊं या. त्यांना ज्यामुळें दुःख होईल, तें आपण सोडून देऊं. त्यांना सुख होईल तें करूं.

यशवंत : होय. मी तसा वागेन. नामदेव, तूं माझा मित्र. तूं माझा सोबती. घे, माझा हात हातांत घे.

नामदेवानें यशवंताचा हात हातांत घेतला. यशवंताचा हात थरथरत होता. कोणीही बोलत नव्हतें. आजपर्यंत यशवंत एकटा होता. त्याला मित्र मिळाला. हृदयांतील श्रीमंती दाखविणारा मित्र मिळाला. हृदयांतील भावनांचे झरे त्याला दिसूं लागले. बाह्य श्रीमंतीच्या दगडाखालीं आजपर्यंत दडले गेलेले झरे झुळझुळ वाहातांना त्याला दिसूं लागले. यशवंत विलासांतून विकासाकडे आला, विषांतून अमृताकडे आला, पशुत्वांतून माणुसकीकडे आला. तो आजपर्यंत मढें होता, तो आतां जिवंत झाला, तो द्विज झाला. अंड्यांतून पक्षी बाहेर पडला. रूढीच्या चिखलांत व खोट्या कल्पनांत रुतलेला त्याचा आत्महंस वर उडाला. श्रीमंतीचे, ऐषआरामाचे, मानापानाचे, पोषाखाचे सारे पडदे फाडले गेले, टरटर फाडले गेले. बंधनें दूर झालीं. विशाल आकाश, नवीन क्षितिजें, दिव्य ध्येयें !

नामदेव : यशवंत चल, जेवावयाची घंटा होईल.

यशवंत : खाऊनखाऊन मी कंटाळलों आहें. आज तूं नवीन खाद्य दिलें आहेस. मला जशी मस्ती चढली आहे. नामदेव, ये ; आपण नाचूं. येतोस ?

नामदेव : नको. आतां उशीर झाला आहे. आपण ध्येयाभोवतीं नाचूं ये. त्यागाभोवतीं नाचूं ये. भारताच्याभोवतीं नाचूं ये.

दोघे मित्र परत आले. भोजनें झालीं. मुलें अभ्यास करीत होतीं. बिगूल वाजलें व मुलें झोपीं गेलीं. सारीं मुलें झोपलीं. परंतु यशवंत जागा होता. त्याला झोप येईना. 'स्वामींना दुःख होईल तें करूं नको. आपण स्वामींच्याभोवतीं नाचूं. भारतमातेच्या भोवतीं नाचूं.' नामदेवाचे शब्द त्याला आठवले. त्याच्या गादीवर विदेशी चादर होती, विदेशी रग होता. त्याच्या अंगांत विदेशी शर्ट होता. यशवंताला चैन पडेना. तो त्या अंथरुणावरून उठला. त्यानें तें गुंडाळून ठेवलें. त्यानें सदरा काढला. आणि धोतर ?

नकोत हे कपडे. आगलावे विदेशी कपडे! साऱ्या देशाला आग लावली ह्या कपड्यांनीं! भारतीय संसाराची होळी केली ह्या विदेशी वस्त्रांनीं! आग, आग, आग!

यशवंत व्हरांड्यांत आला. तों समोर मैदानांत कोणीतरी फिरत आहे असें त्याला वाटलें. कोण बरें तें? स्वामी! हो स्वामीच ते. कां बरें ते हिंडत आहेत? त्यांना झोप नाहीं का येत? कोणत्या आहेत त्यांच्या वेदना, कोणत्या यातना?

यशवंत निघाला. स्वामींकडे निघाला.

" कोण, यशवंत?" स्वामींनीं हाक मारली.

" होय," यशवंत म्हणाला.

" कां रे उठलास?" स्वामींनीं विचारलें.

"तुम्ही येथें कां फेऱ्या घालीत आहांत? तुम्हांला झोप येत नाहीं?" यशवंतानें उत्सुकतेनें विचारलें.

" तुम्ही निजलांत म्हणून मला झोप येईना. तुम्ही जागे झालांत म्हणजे मी निजेन. मुलें खादी वापरीत नाहींत, गरिबांची हाक ऐकत नाहींत, जागे होत नाहींत तोंपर्यंत मी कसा झोपूं? तुम्ही माझे लहान भाऊ, विदेशी वस्तूंचे व विदेशी वस्त्रांचे विषारी सर्प जवळ घेऊन तुम्ही झोपलांत तर मला कशी झोप येईल? तुम्ही कर्तव्य करायला पेटून उठत नाहीं तोंपर्यंत माझ्या हृदयाची लाहीलाही होणार, आगडोंब होणार. खरें म्हटलें म्हणजे मीच चांगला नाहीं. माझ्या वाणींत तेज नाहीं, माझ्या करणींत तेज नाहीं म्हणून तुम्ही माझें ऐकत नाहीं. मी देवाला प्रार्थना करतों आहें कीं देवा, मला शुद्ध कर. देवा, मला इतका शुद्ध कर कीं माझ्यासभोवतीं कोणी पाप करूं नये, बंधुद्रोह करूं नये. जा. यशवंत, तूं जा. देव तुला सद्बुद्धि देवो," असें म्हणून स्वामी निघून गेले.

यशवंत तेथेंच उभा होता. शेवटीं तोही खोलींत जाऊन झोपला.

सकाळीं यशवंत नामदेवाकडे गेला. तेथें रघुनाथही बसला होता.

नामदेव म्हणाला, " ये, यशवंत तुझे डोळे लाल दिसत आहेत. रात्रीं झोप नाहीं का आली?" यशवंतानें रात्रीची सारी हकीकत सांगितली. तो वृत्तांत ऐकतां ऐकतां नामदेवाचे डोळे भरून आले. ते सरळ सुंदर डोळे भरून आले.

" नामदेव! रडूं नकोस" यशवंत, म्हणाला.

नामदेव म्हणाला, " मला तुकारामांचा एक चरण आठवला."

रघुनाथानें विचारलें, "कोणता ?"

"काय वानूं या मी संतांचे उपकार
मज निरंतर जागवीशी,'

हा तो चरण," नामदेव म्हणाला.

रघुनाथ म्हणाला, "खरेंच, स्वामी आपणा सर्वांस जागे करण्यासाठीं किती झटत आहेत.

यशवंत म्हणाला, "पण अजून आम्ही जागे होत नाहीं."

नामदेव म्हणाला, "होय. एक दिवस होऊं. आपण धडपड करीत राहूं. आपण सारीं धडपड करणारीं मुलें !"



## ४

# गोपाळराव

एक हात भू नांगरणें
शत व्याख्यानांहून थोर
एक वार खादी विणणें
शत चर्चांपेक्षां थोर
संडास झाडणें एक
तव पांडित्याहून थोर
शेतकरी, तसे विणकरी, तसे रंगारी बना देशाचे
आळशी न कुणी कामाचे, यापुढें

गोपाळराव म्हणजे एक गूढ व्यक्ति होती. त्यांच्या जीवनांत अनेक गुंतागुंती होत्या. त्यांच्या हृदयाचा थांग लागणें कठीण. ते अत्यंत निर्भीड व स्पष्टवक्ते होते. कर्तव्याची त्यांना फार कदर. व्यवस्थितपणा व हिशेबीपणा त्यांच्याजवळच शिकावा. लहानपणीं अगदीं गरिबींतून ते वर आले होते. भिक्षा मागून, वार लावून ते शिकले होते. कॉलेजमध्यें त्यांनीं शिष्यवृत्त्या वगैरे मिळविल्या होत्या.

ते दक्षिणाफेलो होते. एके काळीं प्रोफेसरही होते. गणित व शास्त्र हे त्यांचे आवडते विषय; परंतु अर्थशास्त्राचाही त्यांनीं चांगला अभ्यास केला होता. संस्कृत सुभाषितेंही त्यांना कितीतरी पाठ येत. रघुवंशांतील श्लोक कधींकधीं ते म्हणून दाखवीत. त्यांची स्मृति असाधारण होती. त्यांची बुद्धि कुशाग्र होती.

मिशनरी लोकांचा त्याग पाहून गोपाळरावांना स्फूर्ति मिळाली होती. प्रोफेसरी त्यांनीं सोडून दिली व निरनिराळ्या राष्ट्रीय शाळांतून त्यांनीं काम केलें. एखादें काम हातीं घेतलें म्हणजे त्यांत तनमनधनेंकरून ते पडत. परंतु महाराष्ट्रांतील बहुतेक राष्ट्रीय शाळा मेल्या, मरणपंथास लागल्या. गोपाळरावांची प्रखर निराशा झाली. त्या वेळेपासून ते एकप्रकारें बाह्यात्कारी नास्तिक झाले होते. जगांत कांहीं एक चांगलें नाहीं. सारा किड्यांचा बाजार आहे असें त्यांना वाटे. परंतु स्वतः निराश असले तरी निराशावाल्यांस ते आशावंत करीत. त्यांना स्वतःला कशांतही अर्थ वाटत नसला तरी दुसऱ्याला जीवनांतील अर्थ ते दाखवूं पाहात.

शिक्षणाचें त्यांना वेड होतें. शिक्षणानेंच राष्ट्राचा उद्धार होईल, शिक्षणानेंच नवविचार तरुणांत फैलावतां येतील असें त्यांना वाटे. परंतु आजचें भारतीय शिक्षण दगडांच्या हातांत आहे. भावनाहीन, स्वाभिमानशून्य लोक शाळांतून, कॉलेजांतून शिकवीत आहेत. ज्यांना ध्येयाचें दर्शन नाहीं, ज्ञानाबद्दल नितांत निष्ठा नाहीं असले पोषाखी किडे आचार्य होत आहेत व मुलांना किड्यांप्रमाणें बनवीत आहेत.

परंतु रूप कसें बदलावयाचें ! राष्ट्रीय शाळा काढल्या तर मुलें येत नाहींत. अराष्ट्रीय शाळांत गेलें तर देश शब्द उच्चारावयासही बंदी ! आपापल्या ध्येयांना उराशीं धरून जगांत जें करतां येईल तें करीत राहिलें पाहिजे असें गोपाळरावांस वाटे. अमळनेरला येऊन त्यांनीं एक स्वतंत्र छात्रालय काढलें. गोपाळरावांच्या प्रयत्नामुळें तें छात्रालय सर्वत्र नांवाजलें. नोकरीमुळें महाराष्ट्राच्या बाहेर असलेले पालक आपलीं मुलें ह्या छात्रालयांत ठेवीत. गोपाळराव मुलांची अत्यंत काळजी घेत.

गोपाळराव अमळनेरमधील इंग्रजी शाळेंत शिकवावयासही जात. ते उत्कृष्ट शिक्षक होते. शास्त्रासारखा रुक्ष विषय; परंतु ते कादंबरीसारखा तो रसाळ करून सांगत. शास्त्राचा अभ्यास मुलांच्या जीवनांत ते आणीत. पोळी कां फुगते, भाकरीला पापुद्रा कां सुटतो, गोंवरीचीच राखुंडी चांगली कां—सारे

प्रश्न ते सोडवावयाचे. ते स्वामींजवळ एखादे वेळेस म्हणत, 'जगांत एका तरी गोष्टीची मी ऐट मारीन. मी सायन्स फार उत्कृष्ट शिकवितों. माझ्यासारखा सायन्स शिकविणारा शिक्षक क्वचित्‌च असेल.'

त्यांच्या कर्तव्यनिष्ठेमुळें इतर शिक्षकांस त्यांच्याबद्दल आदर वाटे. परंतु गोपाळरावांची त्यांना भीतीही वाटे. गोपाळराव केव्हां काय बोलतील ह्याचा नेम नसे, केव्हां काय करतील ह्याचा नेम नसे. एकदां एका शिक्षकाकडे त्यांच्या नकळत ते गेले व मुलांचीं प्रश्नोत्तरें तपासूं लागले. ते शिक्षक घरीं येतात तों गोपाळराव प्रश्नोत्तरें तपासण्यांत तन्मय झालेले त्यांना दिसले! ते दारांतच आश्चर्यानें उभे राहिले.

"हें काय गोपाळराव! वा, वा," असें म्हणून त्या शिक्षकांनीं गोपाळरावांच्या हातांतील प्रश्नोत्तरपत्रिका ओढून घेतली.

"तुम्ही केव्हां आलांत? मला कळलेंही नाहीं. आतां तुम्ही सारे पेपर वेळेवर पुरे कराल. तुम्हांला मदत व्हावी म्हणून मी आलों होतों," गोपाळराव म्हणाले.

"मला प्रश्नोत्तरें तपासून द्यावयास नेहमीं उशीर होतो, म्हणून तुम्हीं हा प्रयोग केलात वाटतें? गोपाळराव, आम्हांला असें लाजवण्यानें काय होणार आहे? ह्या गोष्टीस एवढें महत्त्व कां द्यावें? काय आहे ह्या शाळांतून? दोन दिवसांनीं उशीरां दिले पेपर म्हणून स्वराज्य थोडेंच दूर जाणार आहे? ह्या ध्येयहीन शाळांतून एवढीच तेवढी साहेबी ऐट कशाला?" ते शिक्षक म्हणाले.

"तुमचें म्हणणें एका अर्थी बरोबर आहे. परंतु एकदां जें पत्करलें तें नीट पार पाडणें चांगलें नाहीं का?" गोपाळराव म्हणाले.

"म्हारकी करावयाची, परंतु तीही नीट केली पाहिजे असेंच तुमचें म्हणणें ना?" त्या शिक्षकांनीं विचारलें.

"हो," गोपाळराव म्हणाले.

इतर शिक्षकांत न मिसळणाऱ्या एखाद्या शिक्षकाकडे इतर कांहीं मित्र बरोबर घेऊन गोपाळराव मुद्दाम जावयाचे व म्हणावयाचे, 'करा बोवा, कांहीं पोहेबिहे करा. तुमच्याकडे खावेंसें वाटतें आहे. का केळीं आणतां? तो पाहा केळीवाला चालला आहे. मारूं का हाक?' अशा रीतीनें ते सहकार्य वाढवावयाचे. समाजाच्या सहकार्यासाठीं त्याग करावयास शिकवावयाचे.

एकदां एका वकिलाच्या घरीं ते गेले. तों तेथें गादीवर केर पडलेला. गोपाळराव केर काढायला लागले. वकीलसाहेब लाजले.

"अहो, हें काय गोपाळराव ! गडी आहे तो झाडील," वकील म्हणाले.

"परंतु मी आहें ना गडी. बोर्डिंगांतील गडी रागावून गेला तर मोठमोठीं भांडींही घासण्याची ह्या हातांना सवय आहे. ह्या हातांना एकाच गोष्टीचा तिटकारा आहे व तो लेखणीचा," ते म्हणाले.

"झाडूं द्या हो त्यांना. झाडा गोपाळराव. अहो, एम्. ए., बी. एस्सी. झालेला झाडू आपणांला तरी कधीं मिळणार ! गोपाळराव, ह्या कपबश्याही खालीं नेऊन ठेवा." दुसरे तेथें एक वकील होते ते म्हणाले.

"अहो, महात्मा गांधींसारखे झाडू तुम्हांला लाभले आहेत; माझें काय घेतां ? तुमच्यासारखे भाग्यवान् तुम्हीच. जगांत असा कोणता देश असेल कीं जेथल्या जनतेला महात्मा गांधींसारखे झाडू मिळाले असतील ! हें भारतीयांचेंच श्रेष्ठ भाग्य होय," गोपाळराव म्हणाले.

गोपाळराव जगाबद्दल नेहमीं वाईट मत धरून चालावयाचे. ते म्हणत, 'मनुष्य वाईट आहे असें धरून आपण चालावें. तो जर पुढें चांगला दिसून आला तर ठीकच आहे. परंतु एखादा मनुष्य चांगला आहे म्हणून प्रथम आशा करून राहावें आणि त्यानें शेवटीं आपलें घाणेरडें रूप दाखवावें. अशा वेळेस जी निराशा होते, जें दुःख होतें त्याची कटुता त्या निराश होणाऱ्यासच माहीत. असें निराशेचें दुःख करावयास लागण्यापेक्षां ती आशा न करणेंच बरें.'

म्हणून गोपाळरावांच्या तोंडून चांगला शब्द फारसा बाहेर पडत नसे. गोपाळरावांच्या तोंडून 'चांगलें' म्हणवून घेणें म्हणजे ती कसोटी होती. गोपाळरावांनीं ज्याला चांगलें म्हटलें, त्या माणसाच्या अंगावर मूठभर मांस चढे. कांहींतरी दुर्मिळ वस्तु आपण मिळविली असें त्या माणसास वाटे.

गांवांत वाङ्मय मंडळ म्हणून एक संस्था होती. शिक्षक, वकील, व्यापारी ह्या संस्थेचे सभासद होते. ह्या तिन्ही वर्गांतील लोकांना एकत्र आणणारें तें मंडळ होतें. निरनिराळे लोक निबंध वाचीत. अल्पोपहाराची पाळीपाळीनें व्यवस्था ठेवण्यांत येई. निबंधावर चर्चा होत असे. ह्या मंडळातर्फे कधींकधीं गायनाचे, वादनाचे कार्यक्रमही होत. गायनाचार्य मित्र म्हणत, 'गाणें हाच आमचा निबंध. दुसरा कोणता निबंध आम्ही वाचूं !' धतार उत्कृष्ट

वाजविणारे एक शिक्षक म्हणत, 'एक दिवस मी सतार वाजवीन. माझा तोच निबंध समजा.'

एके दिवशीं गोपाळरावांच्या पाठीमागें मंडळी लागली.

गोपाळराव म्हणाले, "माझा निबंध तुम्हांला आवडणार नाहीं."

"आवडेल, आवडेल. तुम्ही लिहा तर खरा," मंडळी म्हणाली.

"ऐका माझा निबंध. तीन हात खोल, दोन हात लांब, दीड हात रुंद असा एक खळगा खणावयाचा व त्यांत एक झाड लावून त्याला पाणी घालावयाचें, हा माझा एक निबंध. छात्रालयाच्या आवारांतील किंवा शाळागृहाच्या सभोंवतालची सारी घाण उचलून जाळून टाकणें, हा दुसरा निबंध. छात्रालयाच्या इमारतीवरील कौलें चाळणें, हा तिसरा निबंध. छात्रालयाच्या म्हशी धुणें, हा माझा चौथा निबंध. छात्रालयाचे गडी संप करतील तर भांडीं घासणें व आचारी संप करतील तर स्वयंपाक करणें, हा माझा पांचवा निबंध," गोपाळराव भराभर निबंध वाचूं लागले.

गोपाळरावांना लिहिणें आवडत नसे. एखादें नवीन पुस्तक त्यांच्याजवळ नेलें तर ते म्हणत, 'ह्या पुस्तकावर किती कप चहा होईल? या, तें जाळूं.' गोपाळरावांची अशी वृत्ति कां बरें झाली होती?

देशांत गोष्टीवेल्हाळ लोक फार. भराभर भराभर लिहितील व खंडीभर बोलतील; परंतु प्रत्यक्ष कृतीच्या नांवानें शून्याकार. देशांत बोलणाऱ्यांचा व लिहिणाऱ्यांचा सुकाळ झाला आहे. प्रेमाच्या कथा व प्रेमाच्या कविता. परंतु जीवनाचीं काव्यें सर्वांचीं रडकीं व भिकार! जीवन हेंच महाकाव्य आहे. परंतु हें लक्षांत कोण घेतो? जीवनांत त्याग नाहीं, यज्ञ नाहीं, संयम नाहीं, विवेक नाहीं, सेवा नाहीं, प्रेम नाहीं, सहकार्य नाहीं, उदार ज्ञान नाहीं! आणि ग्रंथनिष्पत्ति करतात! ज्यांचीं जीवनें मेलेलीं आहेत ते काय उठवणार! भराभरा साहित्याचे आचार्य व साहित्याचे सम्राट निर्माण होत आहेत. परंतु किती जीवनांत त्यांनीं क्रांति केली, किती जीवनांत चैतन्य ओतलें, किती लोकांस दिव्य अमर स्फूर्ति दिली, किती जणांस कर्तव्यासाठीं खेंचून आणलें, किती जणांस दीनदरिद्री देशासाठीं मरावयास उठवलें? गुलगुल गोष्टी करणारे, व्रात्य विनोद करणारे, गुळमुळीत लिहिणारे—असे लोक का राष्ट्र तयार करतात? पलंगपंडित बनून, चुलीजवळ चहाबिस्किटें खातखात स्वातंत्र्याचीं काव्यें कोणाला

लिहितां येतील ? सरकारची नोकरी करणारे हृदयाला पीळ पाडणारी देशभक्तीची कादंबरी काय लिहिणार ? स्वतःच्या देशबांधवांस फांसावर चढवून शिवाजीची आग्र्याहून सुटका पुस्तक लिहिणाऱ्याचा आम्ही मानसन्मान करतों. धिक् आमचें जीवन, धिक् पुरुषार्थ, धिक् स्वाभिमान !

मनांत ध्येय नाहीं, कृतींत तळमळ नाहीं, जीवन पेटलेलें नाहीं, स्वदेशीचा गंध नाहीं, स्वदेशाची आचारांत स्मृति नाहीं. ज्यांना फक्त लिहावयाच्या वेळीं पुस्तक खपावें म्हणून देशाची आठवण येते त्यांचें लिखाण का मेलेल्या मुर्दांना खडबडून उठवील ? भाडोत्री लेखक, पैसेमिळवू लेखक—गोपाळरावांना ह्या सर्व गोष्टींची चीड येई. प्रेम, सेवा वगैरे शब्दांची ते टर उडवीत. कोणी रडूं लागला म्हणजे त्यांना हसूं येई. जगांत खरा अश्रु दुर्मिळ आहे असें ते म्हणत. एखादा मित्र परगांवीं जाऊं लागला म्हणजे गोपाळराव त्याला म्हणत, 'पावशेर रडून दाखवूं का रे ? नाहींतर मी प्रेमशून्य ठरावयाचा ह्या प्रेमपूर्ण जगांत ! मी वाटेल तेव्हां व वाटेल तितकें रडून दाखवीन, पैज मारा,' असें ते म्हणावयाचे.

ते व्याख्यानाला होताहोईतों जात नसत. कधीं गेलेच तर पांचदहा मिनिटें फार तर बसावयाचे. 'चला हो, काय ऐकतां पोकळ शब्द ? आपण डिक्शनरी चाळूं, पुष्कळ शब्द मिळतील,' असें ते म्हणावयाचे. गोपाळराव म्हणत, 'मीं एकच व्याख्यान पहिल्यापासून शेवटपर्यंत ऐकलें आहे व तें म्हणजे लोकमान्य टिळकांचें !' लोकमान्यांबद्दल गोपाळरावांस फार भक्ति वाटे. परंतु ते सहज एकदां म्हणाले, 'लोकमान्यांचें चारित्र्य व लोकमान्यांची बुद्धिमत्ता ह्यांना तुलना नाहीं हें खरें, पण लोकमान्यांनीं महाराष्ट्रांत भांडखोरपणाही वाढविला आहे. अनादरबुद्धि वाढविली आहे. लोकमान्यांच्या अलौकिक त्यागामुळें, धडाडीमुळें, ध्येयोत्कटतेमुळें, देशभक्तीच्या एकतानतेमुळें तो भांडखोरपणा त्यांना साजे. परंतु त्यांच्या मरणानंतर त्यांच्या अनुयायांनीं अनुदारपणा व भांडखोरपणा मात्र ठेवला आहे. आणि ध्येयोत्कटता व देशभक्तीची एकतानता ह्यांना फांटा दिला आहे. इतर प्रांत नवीन इतिहास निर्माण करीत आहेत आणि आम्ही गतइतिहासाचेच फक्त पोवाडे म्हणत बसलों आहोंत !'

महात्मा गांधी म्हणजे गोपाळरावांची श्रुतिस्मृति होती. ते म्हणत, '१९१९ साल आलें व माझ्या जीवनांत खरी क्रांति झाली. साहेबाचा मी साधा मनुष्य

झालों. बूटसूट जाऊन साधा सदरा अंगावर आला.' महात्माजींचा यंग इंडिया केव्हां येतो ह्याची ते वाट पाहात असत. महात्माजींनीं लिहिलेलें अक्षरन् अक्षर वाचण्यासाठीं त्यांना तहान असे. जो गृहस्थ इतर शब्दवेल्हाळांचीं बाडें जाळावयास तयार होत असे तोच महात्माजींचा शब्दन् शब्द वाचण्यासाठीं तडफडत असे. कां बरें? कारण महात्माजींच्या शब्दापाठीमागें, लिहिलेल्या अक्षरापाठीमागें त्यांची चाळीस वर्षांची सेवा होती. ज्यांचा प्रत्येक श्वासोच्छ्वास देशाच्या सेवेंत जात आहे अशा महात्म्याचें तें लिहिणें होतें; तें लिहिणें म्हणजे आवड नव्हती, करमणूक नव्हती. तें लिहिणें म्हणजे आत्मदर्शन होतें. लिहावयास पाहिजे म्हणूनच तें लिहिलेलें असे. न लिहितां भागलें असतें तर महात्माजींनीं लिहिण्यांत वेळ दवडला नसता. त्यांचें लिहिणें म्हणजे ध्येयभेटीचे प्रयोग होते. सत्यदेवाच्या प्राप्तीचे अनुभव होते. महात्माजींचें लिहिणें म्हणजेच खरी सत्यनारायणाची पोथी.

गोपाळरावांना केसरी आवडतनासा झाला. 'टिळकांच्या बरोबर महाराष्ट्राला पुढें नेणारा केसरी मेला. महाराष्ट्राला मागें ओढणारा केसरीच्या नांवानें हा कोणी तोतया आहे,' असें ते म्हणत. तेजोभंगाचे धडे देणें व सर्वांवर टीका करणें हेंच आतां केसरीचें उद्दिष्ट. नवीन ध्येयदर्शन नाहीं, नवीन राष्ट्राला हाक नाहीं, उत्कटतेचा संदेश नाहीं, विशाल दृष्टीची भेट नाहीं. खरा केसरी उडी मारतो, त्यागाला मिठी मारतो, युगप्रवर्तक व पथप्रवर्तक असतो. आजच्या केसरीला हृदय नाहीं व बुद्धि आहे तीही जड व जरठ झालेली. महात्माजींची केसरींत येणारी निंदा पाहून गोपाळराव कधीं कधीं फार चिडत, चवताळत. त्या केसरीचा चोळामोळा करीत. ती विषारी कुजकट विचारसरणी पाहून त्यांचें पित्त फार खवळे;

'न केवलं यो महतोऽपभाषते
श्रृणोति तस्मादपि सोऽपि पापभाक्।'

'जो महात्म्यांची अखंड निंदा करतो, तो तर पापी होतोच. परंतु ती निंदा ऐकणाराही त्या पापांत भागीदार होतो,' असें ते म्हणावयाचे.

एके दिवशीं लोकमान्यांच्या पुण्यस्मरणाच्या प्रसंगाच्या निमित्तानें केसरींत महात्माजींवर गलिच्छ टीका आली होती. गोपाळरावांचे डोळे लाल झाले. ते शाळेंतील शिक्षकालयांत बसलेले होते. बोटें थरथरत होतीं. त्यांनीं तो केसरी

टरकन् फाडला व तो फेकून दिला. परंतु इतक्यांत त्यांची कर्तव्यबुद्धि जागृत झाली. ते म्हणाले, 'हा शाळेचा सार्वजनिक केसरी ! हा फाडावयाचा मला काय अधिकार आहे ?' त्यांनीं लगेच एक दुसरा केसरी मागवून घेतला व तेथें आणून ठेवला.

गोपाळरावांची कर्तव्यनिष्ठा जाज्वल्य होती. सार्वजनिक जीवनाचें पावित्र्य ते ओळखीत. अंगांत ताप असला तरी ते शिकवावयास जात. एकदां १०३ डिग्री ताप असतांही ते शाळेंत शिकवावयास गेले. तापानें त्यांचें तोंड लाल झालें होतें. इतर शिक्षक म्हणाले, "गोपाळराव, आज नका जाऊं वर्गावर. तुम्ही घरीं जा, नाहीं तर येथें पडून राहा."

गोपाळराव म्हणाले, "मी वर्गांत शिकवतांना पडलों तर मग मला येथें उचलून आणून झोपवा. कर्म करीत असतांना मला पडूं दे. कर्मक्षेत्रावरचा मी शिपाई."

एकदां छात्रालयाची म्हैस हरवली. गोपाळराव म्हैस शोधावयास निघाले. म्हैस सांपडेपर्यंत त्यांना चैन पडलें नाहीं. 'देवा, म्हैस सांपडो, तुला खडीसाखर ठेवीन,' असें ते म्हणाले. शेवटीं एकदांची म्हैस सांपडली. गोपाळरावांनीं खडी-साखर वांटली.

गोपाळरावांची ईश्वरावर श्रद्धा होती. गांवाबाहेर दूर आलेल्या मारुतीच्या दर्शनाला तें शनिवारीं नित्यनेमानें जावयाचे. त्या मारुतीला डुबकीचा मारुती असें म्हणत. डुबकी म्हणून तेथें पूर्वीं गांव होतें. पेंढाऱ्यांच्या भीतीमुळें तें गांव उठून गेलें. गोपाळराव मारुतीला प्रदक्षिणा घालावयाचे. कांहीं वर्षें ते दर शनिवारीं सायंकाळीं तेथें दिवली नेऊन लावीत.

गोपाळराव संध्या करावयाचे. थोडी ध्यानधारणा करावयाचे. सर्व श्लोक म्हटल्याशिवाय ते राहात नसत. ते त्यांचे पाठ होते. एखादे दिवशीं जर मनाचे श्लोक म्हणावयाचे राहिले तर दुसऱ्या दिवशीं ते दोन वेळां म्हणत.

गोपाळराव अंधश्रद्धावान् नव्हते. रूढींचा त्यांना तिटकारा होता. एकदां अमळनेरांत एक गृहस्थ फिरून लग्न करणार होते. पहिली बायको होतीच. पहिल्या बायकोला माहेरीं पाठवून इकडे न कळत द्वितीय विवाह ते करणार होते. ते गृहस्थ गोपाळरावांचे मित्र होते. गोपाळरावांना वाईट वाटलें. शाळेंतील सर्व शिक्षक घेऊन ते त्या सद्गृहस्थांकडे गेले व धरणें धरून बसले. शेवटीं तें

लग्न झालें नाहीं. गोपाळरावांनीं त्या गृहस्थांस दुसरीकडे नेलें. त्यांच्या पत्नीस तारेनें बोलविलें. त्या पत्नी आल्यावर गोपाळराव त्यांना म्हणाले, ' हे पती ताब्यांत घ्या. ' गोपाळरावांचे मित्र हसले. ह्या लग्नामध्यें दलाली उपटणारे जे लोक होते त्यांच्या नाकाला मिरच्या झोंबल्या. ह्या मास्तरांना असल्या गोष्टींची उठाठेव कशाला वगैरे बोलत परंतु गोपाळराव निर्भय व निस्पृह. ते त्या लोकांना म्हणत, ' शिक्षक म्हणजे कचरा नाहीं. शिक्षक हा सर्व गांवचा शिक्षक आहे. विसरूं नका. खेड्यांतील शिक्षक गांवचा सल्लागार असतो. ज्यांचें लग्न गोपाळरावांनीं होऊं दिलें नाहीं ते गृहस्थ मात्र सज्जन होते. गोपाळरावांवर ते रागावले नाहींत. गोपाळराव कधीं भेटले तर ते त्यांना म्हणत, ' साहेब ! तुम्ही किती चांगली गोष्ट केलीत ! मला वांचवलेंत व त्या मुलीलाही वांचवलेंत. तुमचे खरोखर उपकार आहेत ! '

गांवांतील व्यापारी, वकील वगैरे जर एखादे वेळेस उगीचच्याउगीच शाळेवर, छात्रालयावर, शिक्षकांवर टीका करूं लागले, तर गोपाळराव त्यांना तेथल्या तेथें सुनवीत. ते नसत्या उठाठेवी करणाऱ्या वकिलांना एकदां म्हणाले, ' तुम्ही वकील झालेत म्हणजे का सर्वज्ञ झालेत ? तुम्हीं खोटेंनाटें शिकवावें, मुन्सफाची मनधरणी करावी. पैसा तुमचा देव व ह्या देवाला मिळविण्याचें असत्य हें तुमचें साधन. तुम्ही काय आम्हांला सल्ला देणार ? शिक्षणशास्त्राचा अभ्यास केला आहे का ? ध्येयें कधीं डोळ्यांत खेळविलीं आहेत का ? '

ते व्यापाऱ्यांना एकदां म्हणाले, ' तुम्हीं पैसे द्या परंतु पैशाबरोबर मतें आणूं नका. शिक्षण कसें द्यावें हें शिक्षणतज्ज्ञांना ठरवूं दे. तुम्हांला व्यापार कसा करावा हें आम्हीं सांगणें योग्य नाहीं व तुम्ही असें करा तसें करा ह्याप्रमाणें आम्हांला प्रवचन देण्याची ऐट आणूं नये. '

एकदां एक लक्षाधीश व्यापारी छात्रालयांत आले. ह्या व्यापाऱ्यांची सहानुभूति असे. ते कांहींतरी छात्रालयासंबंधींची तक्रार घेऊन आले होते. ते गोपाळरावांना म्हणाले, " गोपाळराव ! तुम्हांला कांहीं सुचवावयास मी आलों आहें. "

" वा. फार छान. व्यापार थोडा वेळ दूर करून तुम्ही मुलांच्या विकासाकडे लक्ष देऊं लागलेत, ही आनंदाची गोष्ट आहे, " गोपाळराव म्हणाले.

"गोपाळराव, छात्रालयांत म्हणे सारीं मुलें एके ठिकाणीं जेवावयास बसतात?" व्यापाऱ्यानें प्रश्न केला.

"एके ठिकाणीं म्हणजे काय? प्रत्येकाचा पाट व प्रत्येकाचें ताट, निरनिराळें असतें. दोन पाटांमध्यें दीड वितीचें अंतर असतें," गोपाळराव म्हणाले.

"परंतु निरनिराळ्या जातींच्या पंक्ति अलगअलग तुम्हीं कां बसवीत नाहीं?" व्यापारी म्हणाले.

"तें जमणार नाहीं. मुलांना तुम्ही सांगितलेंत तरी दोन दिवशीं पुन्हा पूर्वींप्रमाणेंच होणार. मुलें युगधर्म ओळखतात. एखाद्याला खरूज झाली असली किंवा कांहीं रोग असला तर मात्र त्याला निराळें बसवतों. त्याचें ताट, त्याचा पाट निराळा ठेवतों," गोपाळराव म्हणाले.

"परंतु मुलें निरनिराळ्या पंक्तीला बसविलें म्हणजे बरें. कोणाचीं मनें दुखविलीं जाणार नाहींत. सब्गोलंकार करणें बरें नव्हे," व्यापारी म्हणाले.

"हें पाहा, तुमचीं मनें दुखविलीं जाणार नाहींत; परंतु ज्यांना तुम्हीं दूर ठेवाल त्यांचीं मनें दुखविलीं जातील. दूर ठेवण्यांत श्रेष्ठ, कनिष्ठपणाचीच मुळांत भावना आहे. आज सर्वांना स्वाभिमानाची जाणीव झालेली आहे. त्यांचीं मनें कां मी दुखवूं? आणि हें पाहा शेटजी, सब्गोलंकार वास्तविक पाहिलें तर तुम्ही सनातनीच करीत आहांत. तुम्हीच सर्व जाती मोडीत आहांत," गोपाळराव म्हणाले.

"तें कसें काय? हें तर मी नवीनच ऐकतों," व्यापारी म्हणाले.

"विचार न करणाऱ्याला सारें नवीनच असतें. हें पाहा शेटजी, तुम्हीं गिरणी काढलीत कापडाची. पारोळ्याचे विणकर मेले, पिंजारी मेले, कातारी मेले, लोढारी मेले. ह्या सर्व जातींचे धंदे बुडाले व ते तुमच्या ह्या राक्षसी कारखान्यांत एके ठिकाणीं मरत आहेत. तुम्ही घरांवर कुंभाराचीं कौलें घालीत नाहीं, विलायती पत्रे घालतां; त्यामुळें कुंभार भिकेला लागला. तो तुमच्या मिलमध्यें आला. तुम्हीं एक तेलाची गिरणी काढली आहे. त्यामुळें शेंकडों तेल्यांचे घाणे बंद झाले. ते तेली तुमच्या गिरणींत आले. तुम्ही लोखंडी घमेलीं वापरूं लागलेत, त्यामुळें बुरुड मेला व तुमच्या कारखान्यांत तो मरायला आला. तुमचे कारखाने सर्व जातींचे धंदे बुडवून त्यांना एकत्र आणीत आहेत. तुम्हांला विणकर जगावा अशी इच्छा असती तर खादी

वापरली असतीत. तेली जगावा अशी इच्छा असती तर हातघाणीचें तेल घेतेत. कुंभार जगावा अशी इच्छा असती तर कुंभाराचीं मडकीं व कौलें घेतलीं असतींत. शेटजी! धर्म म्हणजे थट्टा नाहीं. धर्म म्हणजे त्याग आहे. आज महात्माजी एकप्रकारें जातीचें रक्षण करीत आहेत व तुम्ही जाती मारीत आहांत. धर्म तुमच्यापेक्षां मला अधिक समजतो. तुम्हांला धर्माची चाड असती, तर आज वानप्रस्थ झाले असतेत व समाजाची सेवा करूं लागले असतेत. तुमचें आतां वय झालें. परंतु आणखी कारखाने काढीतच आहांत. सनातन धर्म नांव सोपें आहे. सनातन धर्म पाळणें म्हणजे सतीचें वाण आहे. एक महात्मा गांधी खरे सनातनी आहेत! बाकी सारे दांभिक बगळे आहेत झालें!"

शेटजी थंडगार झाले. ते मुकाट्यानें उठले व जाऊं लागले. दारापर्यंत गोपाळराव त्यांना पोंचवावयास गेले. असे हे गोपाळराव होते. स्वामींना प्रथम गोपाळरावांचा स्वभाव नीट समजेना. ते बुचकळ्यांत पडत. त्यांचे कडाक्याचे वाद होत. एके दिवशीं गोपाळराव, स्वामी व इतर कांहीं मित्र बसले होते. प्रेमासंबंधींची चर्चा चालली होती.

स्वामी म्हणाले, " ह्या जगांत प्रेम नसेल, तर जग जगणारच नाहीं. प्रेमसूर्य जर कायमचा अस्तंगत झाला तर जग चालेल कसें? प्रेम हें जीवनाचें जीवन आहे. माता मुलांवर प्रेम करणार नाहींत तर तीं अगतिक मुलें कशीं वाढतील? आईचें मुलांवरील प्रेम—ही गोष्ट तरी सत्य मानतां कीं नाहीं?"

गोपाळराव म्हणाले, " नाहीं. तेथेंही मला परिपूर्ण निःस्वार्थता दिसत नाहीं. स्वार्थाचा वास प्रेमाला सहन होत नाहीं. जगांत स्वार्थाशिवाय तर जगतां येत नाहीं. मूल म्हणजे पतिपत्नींच्या विषयचेष्टेची ती खूण! इलाजच नाहीं म्हणून माता त्या मुलाला वाढवते."

स्वामी संतापले, लाल झाले. ते रागानें म्हणाले, " काय, मातेच्या प्रेमाचीही तुम्ही टवाळी करतां? तुमची जीभ झडत कशी नाहीं?"

गोपाळराव म्हणाले, " मी सत्य सांगत आहें म्हणून झडत नाहीं. वाटलें तर तुम्ही या व प्रेमानें ती उपटून टाका."

स्वामी म्हणाले, " गोपाळराव, ह्या जगांत कशावरच तुमची श्रद्धा नाहीं का?"

गोपाळराव म्हणाले, " तसें खोल पाहिलें तर खरोखरच कशावरही माझी श्रद्धा नाहीं. "

स्वामी म्हणाले, " खोल पाहिलेंत तर सर्वत्र श्रद्धाच तुम्हांला दिसेल. श्रद्धेवर सारें विश्व चाललें आहे. महात्माजींना वाटतें माझ्या मार्गानें सुख येईल. साम्यवाद्यांना वाटतें आमच्या विचारानें सुख येईल, तोफवाल्यांना वाटतें तोफेनें तुफानें शांत होतील. जो तो आपली श्रद्धा धरून जात आहे. परंतु तें दूरचें जावो. ही हवा तुम्ही नाकानें आंत घेत आहांत, ती विषारी नाहीं अशी तुमची श्रद्धा आहे. पायाखालची भूमि दुभंगणार नाहीं, आकाश वरून पडणार नाहीं अशी तुमची श्रद्धा आहे. मी तुमच्या डोक्यांत धोंडा मारणार नाहीं ह्या श्रद्धेमुळेंच तुम्ही येथें बोलत आहांत. तुमची पत्नी तुम्हांला जेवायला वाढते त्यांत विष नाहीं अशी तुमची श्रद्धा असते. आपण निजतों तर घर कोसळणार नाहीं अशी श्रद्धा तुमच्याजवळ असते. "

" गोपाळराव, श्रद्धा आपल्या जीवनांत इतकी भरलेली आहे म्हणूनच ती दिसत नाहीं. आपण श्वासोच्छ्वास करतों ह्याची आपणांस जाणीव थोडीच असते ! तसेंच श्रद्धेचें. श्रद्धेशिवाय श्वासोच्छ्वास नाहीं, श्रद्धेशिवाय पाऊस पडत नाहीं. श्रद्धा आहे म्हणून तुम्ही जगत आहांत. श्रद्धा आहे म्हणून तुम्ही मला बोलावलेंत. श्रद्धा आहे म्हणून छात्रालय चालवितां. तुमच्या रोमरोमांत श्रद्धा आहे. ज्या क्षणीं सारी श्रद्धा उडेल, त्या क्षणीं जीवन नाहींसें होईल, जीवन गळून पडेल. श्रद्धेच्या सूक्ष्म परंतु बलवंत तंतूंवर सारें विश्व विसंबून आहे. श्रद्धा नाहीं असें जेव्हां तुम्ही म्हणतां तेव्हां तुमचें तुम्हांलाच आपण काय बोलतों हें समजत नसतें. "

गोपाळराव म्हणाले, " तुम्ही कांहींही म्हणा, वादविवाद मला करावयाचा नाहीं. "

ज्या गोपाळरावांनीं आशोपनिषद् आळवून स्वामींना प्रत्यक्ष सेवेच्या कामांत ओढून आणलें, ते गोपाळरावही पुष्कळदां निराशेनें बोलत. स्वामींना त्याचें आश्चर्य वाटे.

एके दिवशीं गोपाळराव स्वामींना म्हणाले, " जगांत एक गोष्ट सत्य आहे व ती म्हणजे मरण. शेवटीं मूठभर राख—हें ह्या जगाचें स्वरूप आहे. असलें नालायक जग निर्माण करणाऱ्या ईश्वराचा निषेध करून मरावें असें मला वाटतें.

इंग्रज सरकारचा किंवा सनातन्यांचा निषेध करण्याऐवजीं त्या परमेश्वराचाच निषेध केला पाहिजे. परंतु मरण्याचें धैर्य अजून मला होत नाहीं."

स्वामी म्हणाले, "रोज मरेन, मरेन म्हणणारा भरपूर जगणार ह्यांत संशय नाहीं. मरणाचा शब्दही उच्चारूं नये असें आपण म्हणतों. परंतु तो शब्द पुन्हा पुन्हा उच्चारून त्या शब्दांतील डर तुम्ही नाहींसा करीत आहां. मरण म्हणजे भाजीपाला, मीठमिरची असें तुम्ही करीत आहांत. तुम्हांला जीवन प्रिय आहे, मरण नाहीं."

गोपाळराव म्हणाले, "ह्या जगांत मनांत खेळविलेल्या आशा कधीं पुऱ्या होत नाहींत."

स्वामी म्हणाले, "एका अर्थी तें बरें. प्रत्येकाच्या आशा व मनोरथ जर ईश्वरानें पुऱ्या करावयाच्या ठरविलें तर तें अशक्य होईल. कुत्र्यांची आशा व इच्छा पुरी करावयाचें देवानें ठरविलें तर त्याला हाडकांचा पाऊस पाडावा लागेल; दुर्जनांची आशा पूर्ण करावयाचें त्यानें ठरविलें तर त्याला रक्ताचा पाऊस पाडावा लागेल. परमेश्वराला जें टिकवावयाचें असेल तें शेवटीं तो टिकवील."

गोपाळराव म्हणाले, "मनांतील सत्कल्पना तरी यशस्वी कां न व्हाव्यात ? ईश्वरानें ध्येयें तरी आमच्या मनांत कां उत्पन्न करावींत ? जीं ध्येयें मूर्तिमंत करतां येत नाहींत, अशीं ध्येयें मनांत खेळवीत बसण्यापेक्षां ध्येयहीन पशु होणें बरें. ही मनाची ओढाताण तरी नको."

स्वामी म्हणाले, "गोपाळराव ! अहो ओढाताण हेंच तर मानवाचें भाग्य. धडपड हेंच भाग्य. आपण धडपडणारीं मुलें. धडपड नको, ओढाताण नको, म्हणजे यत्न नको. मनांत येतांच सारें व्हावें असें का तुम्हांला वाटतें ? त्याला अर्थ नाहीं व किंमत नाहीं. मनांत येतांच जें होतें, त्याचें महत्त्व आपणांस वाटत नाहीं. ज्याच्यासाठीं जीवनें द्यावीं लागतात, त्याचें आपणांस मोल वाटतें. आपले मनोरथ ताबडतोब सिद्धीस गेले पाहिजेत असें म्हणणें म्हणजे अहंकार आहे. विचार व आचार ह्यांचीं पावलें सारखीं पडत नसतात. डोळे एक मैलावरचें पाहातात, परंतु पाऊल एका हातावर पडतें. अशीं पावलें टाकीतच ध्येयाची पर्वती गांठावयाची आहे. भगवान् बुद्धांस पूर्ण व्हावयास पांचशें जन्म घ्यावे लागले. आपणांस पांच हजार लागले तरी थोडेच आहेत. पुन्हा पुन्हा

जन्म घेऊन मी माझें ध्येय गांठीन असा अमर आशावाद मनांत खेळविण्याचें सोडून हीं रडगाणीं, निराशेचीं भेसूर गाणीं काय गात बसलेत ?"

गोपाळराव म्हणाले, "पुनर्जन्मावर ज्याची श्रद्धा नाहीं त्यानें काय करावें ?"

स्वामी म्हणाले, "आपणांस पुनर्जन्म नसला तरी सृष्टि अनंत आहे व काळ अनंत आहे. आपलीं ध्येयें वाढविणारा कोणीतरी येईल. आपण लावलेल्या झाडांना तो पाणी घालील. दादाभाईंच्या कार्याला लोकमान्यांनीं पाणी घातलें. लोकमान्यांच्या कार्याला महात्माजी पाणी घालीत आहेत. आपण मर्त्य असलों तरी समाज अमर आहे. ध्येयें अमर आहेत. शेवटीं जगांत ध्येयेंच राहावयाचीं. त्या ध्येयांना आपल्या जीवनांतील घड्यानें पाणी घालावयाचें व घडा फोडून टाकावयाचा, मडकें फोडावयाचें ! गोपाळराव, जोंपर्यंत आपल्या जगण्यानें कोणालातरी सुख समाधान होत आहे, तोंपर्यंत मरणाची गोष्ट कां काढावी ? आपल्या बोलण्यानें, आपल्या हसण्यानें, आपल्या केवळ असण्यानें जर कोणाला सुख वाटत असेल तर आपल्या जीवनाचें साफल्य झालें. ह्या बुडबुड्यापासून अधिक अपेक्षा अहंकारानें कां धरावी ? हाच युक्तिवाद करून तुम्हीं मला येथें छात्रालयांत आणिलेंत ना ? आणि आतां तुम्ही निराश होतां ?"

"गोपाळराव ! तुमच्या जगण्यामुळें कोणालाच आनंद होत नसेल का ?" असा हृदयभेदक प्रश्न स्वामींनीं शेवटीं विचारला.

गोपाळराव म्हणाले, "नाहीं !"

स्वामी म्हणाले, "कोणाला नाहीं ? तुम्हीं खोटें बोलत आहांत. ते पाहा तुमचे डोळे. तें तुमचें तोंडच सांगत आहे कीं, हें खोटें आहे. तुम्ही हृदयाची फसवणूक करीत आहांत. अहो, तुम्ही मला आवडतां. तुम्हांला पाहून मला आनंद होतो. तुम्हांला पाहून मुलांना आनंद होतो. तुमच्या पत्नी गोदूताई, त्यांना आनंद होतो. आपल्या छात्रालयांतील तो हेला, त्यालाही तुम्हांला पाहून आनंद होतो. तो दुसऱ्यावर शिंगें उगारतो. परंतु तुम्हांला पाहून तो प्रेमळ होतो; तुम्हांला पाहून त्या शिरीषाच्या झाडालाही आनंद होत असेल. कारण तेथें तुम्ही पाणी घालतां. गोपाळराव, जग कांहीं कृतघ्न नाहीं. एखादे वेळेस आपणांस माहीतही नसतें, परंतु कितीतरी जीवनांत आपल्यामुळें आनंद, स्फूर्ति, शांति, क्रांति हीं आलेलीं असतात. आपल्याला न कळत आपणांस आशीर्वाद मिळत असतात."

गोपाळराव म्हणाले, " शिव्याशापही मिळत असतील. "

स्वामी म्हणाले, " सारें संमिश्र आहे. अंधार व उजेड, दिवस व रात्र. जगांत केवळ आनंद नाहीं, केवळ दुःख नाहीं; आणि म्हणूनच गोडी आहे. मनुष्याला केवळ आंबट आवडत नाहीं. केवळ गोड आवडत नाहीं. मनुष्याला आंबट गोड आवडत असतें. "

दिपवाळीची सुट्टी असल्यामुळें मुलें दुःखानें घरीं गेलीं होतीं. गोपाळरावांना जरा बरें वाटत नव्हतें. त्यांना हिंवताप येत होता. स्वामी मधून मधून चौकशी करून जात. एके दिवशीं सकाळीं गोपाळरावांची चौकशी करण्यासाठीं म्हणून स्वामी गेले. ते दरवाजाजवळ जातात, तों त्यांना काय दिसलें? गोपाळरावांच्या खोलीच्या दरवाजांतच स्वामी उभे राहिले. त्यांच्यानें आंत पाऊल टाकवेना. तें दिव्य दर्शन होतें. पवित्र दर्शन होतें. गोपाळराव घळघळ अश्रु ढाळीत होते! अश्रूंची टवाळी करणाऱ्या गोपाळरावांच्या डोळ्यांत मोत्यासारखे अश्रू! ह्या मनुष्याचें हृदय आहे तरी काय? वरून ओबडधोबड परंतु आंत रसाळ आहे हा पुरुष. दगडाच्या आंत गुप्तगंगा आहे; वरून कठोर परंतु आंत प्रेमाचे झरे आहेत. ती पावन गंभीरता भंगावी असें स्वामींस वाटलें नाहीं. पवित्र दूर्वांकुरां-वरील स्वच्छ दंवाचे बिंदु—ते पाहाण्यांतच धन्यता व सुंदरता असते.

आवाज न करतां स्वामी माघारे गेले. त्या पातळ, दुबळ्या अश्रूंनीं स्वामी व गोपाळराव ह्यांना कायमचें जोडलें, अभंग जोडलें. अश्रु हे जोडणारे आहेत. दगडांना जोडणारें अश्रूंसारखें सिमेंट दुसरें कोणतें आहे? स्वामींची गोपाळ-रावांवर भक्ति बसली, प्रेम बसलें. गोपाळरावांस पाहावें, वरचेवर पाहावें, दुरून प्रेमानें पाहावें असें त्यांना वाटे. स्वामीजी कधीं फुलें तोडीत नसत, परंतु गोपाळरावांना फुलें आवडत म्हणून कधीं कधीं हलक्या हातानें सुंदर, सुगंधी फुलें तोडून स्वामी त्यांच्या टेबलावर त्यांना नकळत नेऊन ठेवीत. देवाला नकळत त्याची पूजा करीत.

स्वामी नेहमीं छात्रालयांतच जेवत असत. ते कधीं जेवत, कधीं जेवतही नसत. ज्या दिवशीं त्यांचें मन खिन्न असे, विषण्ण असे, त्या दिवशीं ते जेवणाला टाळा देत. ते म्हणत, ' जेवतांना मन प्रसन्न असावें. ज्या दिवशीं मन अप्रसन्न असेल त्या दिवशीं जेवूं नये. अप्रसन्न व अशांत मन असतांना घेतलेलें अन्न विषाप्रमाणें होईल. त्या अन्नानें शरीरास पुष्टी मिळणार नाहीं! ' एखादे दिवशीं

ते म्हणत, 'रोज उठून काय जेवायचें! कधीं कधीं ह्या जेवणाचा मला कंटाळा येतो!'

एके दिवशीं अकस्मात् स्वामींच्या खोलींत गोपाळराव आले. गोपाळराव असे मधूनमधून स्वामींकडे येत असत. ते फार बोलत नसत. नुसते येऊन जात. जणुं त्या खोलींतील प्रेम व माधुर्य प्यावयास ते येत असत.

"काय गोपाळराव?" स्वामींनीं विचारलें.

"मी तुम्हांला एक प्रार्थना करावयाला आलों आहें." गोपाळराव म्हणाले.

"आज्ञा करावयास आलों आहें असें म्हणा," स्वामी म्हणाले.

"तितकें प्रेम माझ्याजवळ कोठें आहे? प्रेम मारूं शकतें, आज्ञा करूं शकतें." गोपाळराव म्हणाले.

"मी तुमच्यासाठीं काय करूं?" स्वामींनीं विचारलें.

"तुम्ही छात्रालयांत न जेवतां माझ्याकडेच उद्यांपासून जेवायला येत जा. मी तुम्हांला नको सांगेपर्यंत माझ्याकडेच जेवायचें," गोपाळराव म्हणाले.

"कां बरें?" स्वामींनीं विचारलें.

"तुम्ही छात्रालयांत वेळच्यावेळीं जेवत नाहीं. कोणाला कांहीं कळत नाहीं. माझ्याकडे जेवायला येऊं लागलेत म्हणजे रोजची हजेरी गैरहजेरी कळत जाईल. कां जेवलेत नाहीं तें विचारतां येईल. तुम्ही प्रकृतीची काळजी घेत नाहीं," गोपाळराव म्हणाले.

"मी कधीं आजारी पडत नाहीं. प्रकृतीची फार काळजी घेऊन तरी काय करायचें?" स्वामींनीं विचारलें.

"सेवा करावयाची. तुमची सर्वांना जरूर आहे. तुम्ही शेंकडों मुलांचे आहांत. खानदेशांतील मुलांचे आहांत. तुम्ही त्यांना प्रेमामृताचें, ऐक्यामृताचें भोजन द्यावयास जिवंत राहिलें पाहिजे. तुम्ही आमची आशा, तुम्ही आमची स्फूर्ति. तुम्हांला माहीत नाहीं, तुमच्यावर तुमची सत्ता नसून आमची आहे. मुलांच्या संमतीनें मी तुम्हांला जेवायचें कायमचें आमंत्रण देत आहें. नामदेव, यशवंत, रघुनाथ, जनार्दन, मुकुंदा, नरहर सारे असेंच म्हणाले. मग येणार ना?" गोपाळरावांनीं पुन्हा विचारलें.

"हो," स्वामी म्हणाले.

स्वामी गोपाळरावांकडे जेवावयास जाऊं लागले. बारीक सारीक गोष्टी स्वामींच्या लक्षांत येत. गोपाळरावांच्या पत्नी गोदूताई किती मनापासून पतीची सेवा करीत. परंतु गोपाळराव पत्नीशीं प्रेमानें, प्रसन्नतेनें कधीं बोलले आहेत असें होत नसे. गोपाळराव जेवावयास नसले म्हणजे गोदूताई भाजी वगैरे करीत नसत. एकट्यासाठीं कशाला? परंतु गोपाळरावांसाठीं त्या सर्व कांहीं करावयाच्या.

"भाजी चांगली झाली आहे का?" गोदूताई विचारीत.

परंतु गोपाळराव कांहीं बोलत नसत. 'होय, चांगली झाली आहे,' अशा एका गोड वाक्यानें गोदूताईंना कृतार्थ वाटलें असतें. परंतु गोपाळराव कृपण होते. कुणालाही चांगलें म्हणण्यांत ते कंजूष होते. गोदूताईच्या हृदयाची भूक त्यांना काय माहीत? ह्या जगांत एका स्मितानें, एका प्रेमळ दृष्टिक्षेपानें, एका गोड शब्दानें केवढें समाधान दुसऱ्याला देतां येतें? परंतु हृदयशून्य लोक त्याचा विचार करीत नाहींत. सहानुभूतीचा अभाव हा हिंदुस्थानचा रोग आहे. दुसऱ्याच्या मनोभावनांचा, दुसऱ्याला माझ्या कृत्यांनीं काय वाटत असेल ह्याचा आपण कधींही विचार करीत नाहीं. सहानुभूति जेथें नाहीं तेथें काय आहे? सहानुभूतिहीन व्यवहार म्हणजे सारहीन भुसा होय!

गोदूताई पतीच्या इच्छेविरुद्ध कधीं जात नसत. सारा हिशेब वगैरे त्या ठेवीत. घरांत आदर्श स्वच्छता राखीत. सारें नीटनेटकें, सुंदर त्यांचें करणें. परंतु गोपाळराव कधीं सहानुभूति दाखवीत नसत. स्वामींचें हृदय दुःखी झालें. दुसऱ्यांच्या भावना पाहाण्याची त्यांना सवय झाली होती. आपल्या वर्तनानें दुसऱ्याच्या जिवाला काय वाटेल ह्याचें परीक्षण स्वामी सदैव करीत.

एके दिवशीं स्वामींनीं दैनिकांत 'दुसऱ्याचें हृदय' म्हणून एक लेख लिहिला. गोपाळरावही बहुतेक नियमानें दैनिक वाचीत असत. त्या दिवशींचें दैनिक गोपाळरावांच्या हृदयास हलवितें झालें, डोळ्यांना ओलें करितें झालें. जेवतांना गोपाळराव स्वामींस म्हणाले, "आजचें तुमचें दैनिक जीवनांत क्रांति घडविणारें आहे."

"क्रांति दिसूं दे," स्वामी म्हणाले.

"भाजी कशी झाली आहे? चांगली झाली आहे का?" गोदूताईनीं विचारलें.

"चांगली झाली आहे," गोपाळराव म्हणाले.

गोदूताईच्या तोंडावर ते दोन शब्द ऐकून केवढें समाधान दिसलें!

“ गोपाळराव, एखादाच शब्द, परंतु मानवी हृदयांत त्या शब्दानें केवढाल्या उलथापालथी होतात, नाहीं ? ” स्वामींनीं विचारलें.

त्या दिवशीं काय झालें कोणास कळे. परंतु स्वामींनीं गोपाळरावांस एकदम चिठ्ठी पाठविली. मी आजपासून आपणाकडे जेवावयास येणार नाहीं. आपल्या-कडे जरा श्रीमंती अन्न असतें. तूप दहीं जास्त असतें. दूध जास्त असतें. मला असें अन्न खाण्याचा अधिकार नाहीं. मला आग्रह करूं नका, ’ अशा अर्थाचा मजकूर त्या चिठ्ठींत होता.

ते पाहा गोपाळराव स्वामींकडे येत आहेत. गोपाळरावांची मुद्रा म्लान दिसत आहे. ते स्वामींच्या खोलींत शिरले. त्यांच्यानें बोलवेना. स्वामी गोपाळरावांकडे पाहात होते. गोपाळरावांना एकदम जोराचा हुंदका आला. स्वामी खालीं पाहूं लागले. शेवटीं गोपाळरावांनीं अश्रु आवरिले. ते म्हणाले, “ स्वामी, आजपर्यंत हा गोपाळराव कोणासमोर रडला नाहीं. ह्या जगाला अश्रूंची किंमत नाहीं. परंतु आज तुमच्यासमोर माझे डोळे रडत आहेत. माझें हृदय ओरडत आहे. तुम्ही माझ्याकडेच जेवायला या. तुम्हांला हवी तर शिळी भाकर मुद्दाम ठेवून वाढीत जाऊं. म्हणजे तर झालें ? ”

स्वामींचा निश्चय त्या अश्रुपुरांत कोठल्याकोठें वाहून गेला. गायीपाठीमागून वासरूं, माणसापाठीमागून छाया, देवापाठीमागून भक्त त्याप्रमाणें गोपाळरावांच्या पाठीमागून स्वामी गेले.

अशाप्रकारें स्वामी व गोपाळराव परस्परांच्या जीवनांत शिरत होते. ते एक-मेकांपाशीं फारसे बोलत नसत. कांहीं बोलायचेंच झालें तर चिठ्ठी पाठवीत. ते एकमेकांजवळ डोळ्यांनीं बोलत. परस्परांनीं परस्परांस बघणें म्हणजेच सारें बोलणें होतें. गोपाळरावांना माहीत नव्हतें कीं स्वामी आपल्या जीवनांत इतक्या उत्कटतेनें स्थान घेतील. स्वामींनाही माहीत नव्हतें कीं गोपाळरावांची व आपली अशी थोर शब्दहीन निःस्तब्ध मैत्री जडेल. आपल्याला माहीत नसलेल्या अनंत गोष्टी—कल्पना नसलेल्या शेंकडों गोष्टी—परमेश्वर प्रत्यक्ष समोर आणून ओतीत असतो।



५

# महादेवाचें दर्शन

महात्मा गांधींची जयंती हिंदुस्थानभर साजरी होत होती. महात्माजींना खादीपेक्षां दुसरें काय प्रिय आहे ? ग्रामसेवेपेक्षां त्यांना दुसरें कसलें वेड आहे ? ठिकठिकाणीं लोक खादी विकूं लागले. कोठकोठें स्वयंसेवक सफाई करूं लागले. स्वामींच्या मनांत एखाद्या खेड्यांत जाऊन सफाई करून यावें असें आलें. परंतु मुलें तयार होतील का ? त्यांनीं दैनिकांत लेख लिहिला व ज्यांना रविवारीं एखाद्या खेड्यावर येण्याची इच्छा असेल त्यांनीं नामदेवाजवळ नांवें द्यावींत अशी सूचना दिली.

जवळजवळ पंचवीस मुलांनीं नांवें दिलीं. स्वामींना खूप आनंद झाला. हरी व वामन ह्या दोन मुलांनींही नांवें दिलीं होतीं. स्वामी त्या मुलांना भेटले व म्हणाले, “ तुम्ही फार लहान आहांत ; तुम्ही दमून जाल. ”

“ मीं मुळींच दमणार नाहीं. मी सर्वांच्या पुढें राहीन, ” वामन म्हणाला.

“ मीसुद्धां दमणार नाहीं. मारवड गांव तर येथून सारें सात मैल आहे. मला का सात मैल चालवणार नाहीं ? ” हरीनें विचारलें.

“ आणि पाऊस आला तर ? ” स्वामींनीं विचारलें.

“ आम्ही पावसांत नाचूं, ” दोघे एकदम म्हणाले.

“ वाटेंतील नाल्यांना पाणी आलें तर ? ”

“ आम्ही पोहूं, ” मुलें म्हणालीं.

स्वामींना त्या लहान मुलांचा उत्साह पाहून कौतुक वाटलें.

रविवार उजाडला. स्वामींनीं सर्व तयारी केली. फावडीं, झाडू, त्यांनीं जमा केलीं. कांहीं औषधें त्यांनीं बरोबर घेतलीं. फिनेलची बाटली बरोबर घेतली. दोन बादल्या व कांहीं पत्र्यांचे तुकडे त्यांनीं बरोबर घेतले. मंडळी निघाली. बरोबर बिगूल होता. यशवंतानें बिगूल वाजविला. सेवेचें बिगूल फुंकलें गेलें. नवजीवनाचें शिंग फुंकलें गेलें. स्वामी त्यांना गाणीं सांगत होते. मुलें म्हणत होतीं. स्वच्छतेचे शिपाई, सेवेचे शिपाई नीट पावलें टाकीत निघाले. झाडूचे झेंडे त्यांच्या हातांत होते. फावड्यांचे झेंडे कांहींनीं उंच धरिले होते.

वाटेंत भेंड्या लावण्याचाही कार्यक्रम झाला. अडेल त्याला स्वामी सांगत. त्यामुळें कोणत्याच पक्षाचा पराजय झाला नाहीं. स्वामींनीं मधून मधून गमतीच्या गोष्टी सांगितल्या. हसत, खेळत, नाचत, कुदत मुलांचा प्रवाह चालला होता. शहरांतील नदी खेड्याकडे जात होती. शहरांतील मुलें मातेकडे जात होतीं. खेडीं म्हणजे शहरांना पोसणाऱ्या माताच. शहराला धान्य, दूध, शाक, भाजी, सारें खेडीं पुरवतात. खेडीं आहेत म्हणून शहरें आहेत परंतु हें शहरांना भान आहे कोठें ?

" नामदेव, " स्वामींनीं हाक मारिली.

" काय ? " त्यानें विचारलें.

" तुला राहूकेतूची गोष्ट माहीत आहे का ? " स्वामींनीं विचारलें.

" हो, आहे. राहू व केतू—एकाच देहाचीं दोन छकलें, " नामदेव म्हणाला.

" आपल्या देशाची तशीच स्थिति आहे, नाहीं ? " त्यांनीं प्रश्न केला..

" म्हणजे कशी ? " रघुनाथनें विचारलें.

" खेड्यांची शहरांना ओळख नाहीं व शहरांची खेड्यांना ओळख नाहीं. खेडीं म्हणजे धडें व शहरें म्हणजे मुंडकीं. धडाची मुंडक्याला भेट नाहीं व मुंडक्याची धडाला भेट नाहीं, " स्वामी म्हणाले.

" मुंडकें म्हणजे बुद्धिमान् लोक—होय ना ? " नामदेवनें विचारलें.

" होय. ह्या बुद्धिमान् लोकांना खेड्यांतील कष्टाळू जनतेबद्दल कोठें आहे प्रेम ? खेड्यांतील लोक आपणांस धान्य देतात, आपण त्यांना विचार नेऊन देऊं असें ह्या बुद्धिमान् लोकांच्या मनांत कधीं येतें का ? " स्वामींनीं विचारलें

" आपण आज जात आहोंत, " मुकुंदा म्हणाला.

" परंतु पुढें मोठे झाल्यावर जाल का ? ह्या खेड्यांतून नवीन, निर्भय विचार पसरविण्यासाठीं याल का ? आपल्या देशांत सात लाख खेडीं आहेत. सात लाख विचार पसरविणारे व विचार पसरवितां पसरवितां सेवा करणारे तरुण देशाला पाहिजे आहेत. आपल्या ह्या तुमच्या खानदेशांतच जवळजवळ पंधराशें खेडीं आहेत. पंधराशें तरुण ह्या कामाला वाहून घेणारे लागतील. प्रत्येक खेड्यांत आपला एक बिभीषण पाहिजे. ज्याप्रमाणें सरकारचा पोलीसपाटील प्रत्येक खेड्यांत आहे, त्याप्रमाणें देशाची सेवा करणारा स्वयंसेवक प्रत्येक खेड्याला पाहिजे, " स्वामी म्हणाले.

" पंधराशें तर दूरच राहिले, परंतु पंधरा तरी मिळतील कीं नाहीं ह्याची शंका वाटते, " रघुनाथ म्हणाला.

" तुम्हांला शंका वाटते, परंतु मला वाटत नाहीं. हिंदुस्थानांत का त्याग नाहीं ? समर्थांच्या वेळेस जर शेंकडों मठ स्थापन करण्यासाठीं तरुण मिळाले, तर आज कां मिळूं नयेत ? मला आशा आहे. भारत हें कांहीं मुमूर्षू राष्ट्र नाहीं. तें वर येणारें राष्ट्र आहे, " स्वामी म्हणाले.

" ती पाहा टेकडीवरची मशीद किती सुंदर आहे, " हरी म्हणाला.

" मागें तेथें आपण वनभोजनासाठीं एकदां गेलों होतों, " वामन म्हणाला.

" आपण रंगारंगाचे दगड गोळा केले होते आणि बोरें किती आपण खाल्लीं, " रघुनाथ म्हणाला.

" त्या वेळेस पुन्या आजारी पडला, " रघुनाथ म्हणाला.

" आणि स्वामींनीं शौचानें भरलेलें त्याचें धोतर धुतलें, " नामदेव म्हणाला.

" कशी एकाकी मशीद दिसते आहे ? त्या टेकडीवरचें तें प्रार्थनास्थान आजूबाजूच्या जगाला देवाचें स्मरण करून देत आहे, " स्वामी म्हणाले.

" परंतु प्रार्थनास्थानें पाहून लोकांचीं हृदयें क्रोधानेंच भरून येतात. मंदिर पाहून मुसलमान लोक दांतओठ खातात. मशीद पाहून हिंदु मनांतल्या मनांत जळफळत असतील, " रघुनाथ म्हणाला.

बोलत बोलत मंडळी मारवड गांवाला आली. गांव लागतांच सकाळचें मलमूत्रविसर्जन रस्त्याच्या दोन्ही कडेला होतें. मुलें नाक धरूं लागलीं.

" आतां नाक धरून कसें होणार ? आतां हातानें नाक न धरतां, ही घाण उचलली पाहिजे, " स्वामी म्हणाले.

" परंतु ही विष्ठा आपण कशी उचलणार ? " मुकुंदानें विचारलें.

" नामदेव, तो पत्रा दे. " स्वामींनीं सांगितलें.

स्वामींनीं मळावर माती टकाली व पत्र्यावर दुसऱ्या तुकड्यानें ओढून घेतली घाण. ती घाण बादलींत जमविण्यांत आली.

गांवांत वार्ता गेली. गांवची मंडळी पाहावयास आली.

रघुनाथच्या ओळखीचीं माणसें गांवांत होतीं. तुकाराम मास्तर, मगन वगैरे त्याच्या परिचयाचे होते. तुकाराम मास्तरांनीं अपमान झाल्यामुळें शाळेंतील नोकरी सोडून दिलेली होती. मारवडला किराणामालाचें त्यांनीं दुकान

घातलें होतें. मगन हा एक भावनाप्रधान तरुण होता. तुकाराम मास्तर स्वतः सूत कांतीत व त्या सुताचें कापड विणकरांकडून विणवून घेत. त्यांच्या घरीं पिंजण, चरका सारें कांहीं होतें. मगनही खादी वापरी. मगनच्या घरीं कितीतरी वर्तमानपत्रें येत. हिंदी पत्रांची त्याला आवड होती. दिल्लीचें चांद मासिक तो घेत असे. खादीबरोबर कांहींतरी विचार जातच असतात. खादी नवीन कल्पना, नवीन ध्येयें बरोबर घेऊन जात असते. प्रत्येक वस्तूच्याभोवतीं एक सहकारी तत्त्वांचें वलय असतें. प्रत्येक वस्तूच्याभोवतीं एकप्रकारचें तत्त्वज्ञान येतें. तुकाराम मास्तर गांवांत निरनिराळ्या चर्चा करीत असत. महात्मा गांधी म्हणजे काय त्याची गांवाला ओळख होती. आपला गांव स्वच्छ करण्यासाठीं अमळनेरचीं मुलें आलीं आहेत, इंग्रजी शाळेंत शिकणारीं सुखवस्तु लोकांचीं मुलें आलीं आहेत हें ऐकून तुकाराम मास्तर आनंदले. ते निघाले. मगनही त्यांच्याबरोबर निघाला.

" काय रघुनाथ, हें काय ? " मगननें विचारलें.

" तुमचा गांव झाडावयाला आम्ही आलों आहोंत, " रघुनाथ म्हणाला.

" आम्ही देवाचे मजूर—आम्ही देशाचे मजूर , " नामदेव म्हणाला.

" महात्माजींचा वाढदिवस आहे. त्यांना आवडणारी गोष्ट करावयास आम्ही आलों आहोंत, " यशवंत म्हणाला.

" आपल्या राष्ट्राला नवजीवन देणाऱ्या, राष्ट्राची मान उंच करणाऱ्या महात्म्याबद्दल आपण कृतज्ञता नको का दाखवायला ? महात्माजी म्हणजे राष्ट्राचे जनक आहेत, " स्वामी म्हणाले.

" मगन ! घे, तूंही एक झाडू घे, " तुकाराम मास्तर म्हणाले.

" आणि तुम्ही नाहीं का घेत ? " रघुनाथनें तुकाराम मास्तरांना विचारलें.

" मी फावडें घेतों. आमच्या विहिरीजवळ घाण आहे. माझ्याबरोबर कांहीं मुलें चला. आपण तेथें स्वच्छ करूं, " तुकाराम मास्तर म्हणाले.

" कलावान् नामदेवाला जा घेऊन. नामदेव, जा त्यांच्याबरोबर, " स्वामी म्हणाले.

नामदेव व कांहीं मुलें तुकाराम मास्तरांबरोबर गेलीं.

गांव स्वच्छ होऊं लागला. मोऱ्या उपसल्या गेल्या. घाण बादल्यांतून भरून दूर शेतांत नेऊन टाकण्यांत आली. ठिकठिकाणीं फिनेल टाकण्यांत आलें.

" ए भाऊ, तेथें घरांतील मोरींत टाक रे थोडें तें पाणी. फार डांस असतात बघ, " एक बाई म्हणाली.

एका स्वयंसेवकानें त्या मोरींत फिनेलचें पाणी टाकलें.

गांवांतील हरिजनवस्तींत आतां मुलें आलीं. काय त्या झोपड्या, काय तेथील स्थिति! मातीच्या मडक्यांशिवाय तेथें भांडें नव्हतें.

" तुम्ही हरिजनच देशाची सेवा करीत आहांत. कुंभार तुमच्यामुळें जगांत आहे, " स्वामी म्हणाले.

" ए भाऊ, जरा इकडे घरांत ये रे. " एक म्हातारी हरिजनबाई म्हणाली.

" काय हवें बाई ? " यशवंतानें विचारलें.

" ह्या पोराला बघ रे. किती ताप आला आहे मुलाला, " म्हातारी बोलली.

स्वामी त्या झोपडींत गेले. तो आजारी मुलगा जमिनीवर निजला होता. फाटकी घोंगडी त्याच्या अंगावर होती. भूमातेच्या कुशींत तो होता. त्या मुलाच्या अंगांत सदरा नव्हता. त्याच्या पोटांत अन्न नव्हतें.

" रघुनाथ, माझी घोंगडी घेऊन ये आणि आपण खादी आणली आहे ना! त्यांत आयते शिवलेले शर्ट आहेत, त्यांतील एक लहानसा घेऊन ये. जा, " स्वामींनीं सांगितलें.

" ह्याला खायला काय देतां ? " स्वामींनीं विचारलें.

" रात्रीं घरोघर जाऊन भाकर मागून आणतें त्यांतील तुकडा त्याला देतें. दुसरें काय देऊं ? " ती म्हातारी म्हणाली.

रघुनाथ घोंगडी व शर्ट घेऊन आला.

" ऊठ बरें बाळ जरा, " स्वामी गोड शब्दांनीं त्या मुलाला म्हणाले.

मुलगा उठला. स्वामींनीं ती घोंगडी तेथें आंथरली. आपल्या अंगावरचा स्वच्छसा रुमाल त्या घोंगडीवर घातला. " ये, नीज आतां, " असें ते त्या मुलाला म्हणाले. बाळ निजला. स्वच्छ अंथरुणावर भारतमातेचा तो प्रिय पुत्र निजला.

" कांहीं दिवस, निदान दोनतीन दिवस दूधच देत जा. तुकाराम मास्तर, मी पैसे देऊन ठेवीन. ह्याला दूध तुम्ही देण्याची व्यवस्था करा, " स्वामी म्हणाले.

" गरिबाला कशाला दूध! सोसणार नाहीं आम्हांला भाऊ. आमच्या कोठ्याला त्याची सवय नाहीं, " म्हातारी म्हणाली.

"दूध चांगलें तापवून देत जा. तें बाधणार नाहीं हो आणि ह्या गोळ्या देऊन ठेवतों ह्या दुधाच्या घोटाबरोबर देत जा. दिवसांतून तीन गोळ्या जाऊं दे पोटांत. आतांच मी दोन देऊन ठेवतों. पाणी आहे का ?" स्वामींनीं विचारलें.

म्हातारीनें नारळाच्या करटींत पाणी आणलें ! नारळाच्या करटीचा पेला व मातीचा गडवा ! सर्व गांवाची सेवा करणारा हरिजन बंधु, त्याची काय ही हीनदीन स्थिति ! ती करटी पाहून स्वामींचें हृदय दुभंग झालें. त्यांचे डोळे भरून आले. मुलें पाहात होतीं. महादेवाचें वैभव पाहात होतीं. स्मशानांत राहाणाऱ्या खट्वांगधारी शिवाचें दर्शन घेत होतीं.

गोळी कडू होती. बाळानें तोंड वाईट केलें. परंतु तेथें थोडीच मोसंब्याची फोड किंवा साखरेचा खडा होता ! तेथें घरांत थोडेसे चिंचोके पडलेले होते. चिंचोके हा त्या मुलाचा मेवा होता. ही त्याची खडीसाखर. ह्या त्याच्या मनुका, हें सर्व कांहीं.

"मगन, येथें गांवांत संत्रीमोसंबीं मिळतात ?" स्वामींनीं विचारलें.

"आपलाच मळा आहे ना मोसंब्यांचा," मगन म्हणाला.

"मगन ! तुझा मोसंब्यांचा मळा आहे, परंतु काय त्याचा उपयोग ! ह्या देवांना त्याचा उपयोग होत नसेल तर काय त्याचा उपयोग ? हा मुलगा बरा होईपर्यंत त्यांच्याकडे मोसंबीं पाठव. पाठवशील का ? महात्माजींचा आजचा वाढदिवस ! महात्माजींच्या आत्म्याला केवढें समाधान होईल !"

स्वामींच्या त्या सहानुभूतिपूर्ण शब्दांना मगन नकार कसा देणार ?

"देईन हो स्वामी," मगन म्हणाला.

"आजी ! आतां आम्ही जातों. बरा होईल बरें बाळ," स्वामी म्हणाले.

त्या झोपडीभोवतीं फिनेल वगैरे टाकण्यांत आलें. सूर्याचे किरण गरिबांच्या घरांकडे येतच असतात ! देवाचे उबेचे किरण येतच असतात. परंतु मानवी प्रेमाचे किरण आज तेथें आले होते.

सारा गांव स्वच्छ झाला. दुपारचे बारा बाजले. सूर्य डोक्यावर आला होता. श्रम करण्याऱ्या मुलांकडे पाहात होता.

"चला आतां आंघोळी करावयास जाऊं." रघुनाथ म्हणाला.

"नदीमध्येंच जाऊं. नदीला पाणी आहे. पाण्यांत डुंबूं. पाण्यांत खेळ खेळूं," वामन म्हणाला.

" परंतु रघुनाथ, जेवावयाची व्यवस्था काय ? सर्वांना भुका लागल्या असतील," स्वामी म्हणाले.

" त्याची चिंता नको करायला, " नामदेव म्हणाला.

**" कशास चिंता करिशी उगीच**
**जिथें तिथें माय असे उभीच, "**

स्वामींनीं गोड चरण म्हटले.

" येथें मगनची माय उभी आहे. डाळरोटी वाट पाहात आहे, " रघुनाथ म्हणाला.

सारीं मुलें नदीवर गेलीं. जेथें पाण्याची धार पडत होती, तेथें फारच मजा येत होती. पाण्याच्या प्रवाहाबरोबर आपोआप पुढें जातां येत असे. जणुं देवाची शक्ति मागून लोटीत पुढें घेऊन जात आहे !

ज्यांना पोहतां येत नव्हतें त्यांना रघुनाथ, मुकुंदा धरीत होते. नामदेवाला पोहतां येत नव्हतें. पाण्यांत डुबुक, डुबुक करीत होता. स्वामी म्हणाले, " नामदेव, अरे अजून पाण्यांतही तरतां येत नाहीं, मग जगांत कसा तरशील ? येथें तर एकच धार आहे, एकच प्रवाह आहे. परंतु जगांत शेंकडों विचारप्रवाह, शेंकडों ठिकाणांहून खळखळ करीत येणार, त्यांत तुझी नांव कशी चालणार, कशी राहाणार ? "

ज्यांना पोहतां येत होतें ते नाना खेळ करीत होते: कोणी पाण्यांत बुडून हळूच खालून येऊन कोणाला पकडीत, तर कोणी पाण्यांतच एकमेकांना शोधीत. कोणी गोलांटी मारीत, कोणी एकमेकांच्या अंगावर पाणी उडवून गुदमरवून टाकीत. तीं मुलें जणुं पाण्यांतील मासे बनलीं. सरित्मातेच्या अंगावर तीं मुलें धुडगूस घालीत होतीं.

" चला रे आतां, उशीर होईल. आकाशांत ढग जमा होत आहेत. आपणांस पावसापूर्वी परतलें पाहिजे, " स्वामी म्हणाले.

सारीं मुलें बाहेर आलीं. कपडे वगैरे धुवून सर्व मंडळी मगनच्या घरीं आली. तेथें तयारी होतीच. तुकाराम मास्तर व मगन वाढीत होते.

" पोटभर जेवा. कोणी संकोच करूं नका, " मगनची आई म्हणाली.

" आम्हांला जेवण देणारी माता जेथें तेथें भेटतेच, " स्वामी म्हणाले.

" कांदा हवा का कोणाला, " मगननें विचारलें.

" द्या ह्या मुलांना कांदा. कांदा म्हणजे राष्ट्रीय अन्न. कांदा भाकर खाऊन मराठ्यांनीं स्वराज्य व स्वातंत्र्य मिळविलें. बासुंदीपुरी खाणाऱ्यांनीं शेवटीं गमाविलें," तुकाराम मास्तर म्हणाले.

मुलांनीं भराभर बुक्यांनीं कांदे फोडले. सपाटून भुका लागल्या होत्या. मगनची आई कढत कढत रोटी पाठवीत होती.

" स्वामीजी! आमच्या गांवाला महात्माजींना आणा ना," मगनची आई बाहेर येऊन म्हणाली.

" लोक खादी वापरीत नाहींत, कोर्टकचेरी सोडीत नाहींत, श्रेष्ठकनिष्ठपणा टाकीत नाहींत, घाण दूर करीत नाहींत, मग महात्माजींना कसें आणूं? थोर पुरुषाला आणावयाचें तर आपल्या घरांत घाण असतां कामा नये, आपल्या गांवांत घाण असतां कामा नये, आपल्या मनांत घाण असतां कामा नये. अंतर्बाह्य स्वच्छ व्हावें व मग महात्म्याचें दर्शन घ्यावें," स्वामी म्हणाले.

" पण सूर्य आल्याशिवाय अंधार दूर होत नाहीं, जागृति येत नाहीं," तुकाराम मास्तर म्हणाले.

" हिंदुस्थानांत सूर्य आला आहे, तो उभा आहे. अंधार दूर होत आहे, जागृति येत आहे," स्वामी म्हणाले.

" प्रत्यक्ष दर्शनानें निराळाच परिणाम होतो," मगन म्हणाला.

" तें खरें आहे. परंतु महात्माजी कोठें कोठें जातील? आपण त्यांची विचार-रूप भेटच घेतली पाहिजे. फार तळमळ असेल तर ते जेथें असतील तेथें गेलें पाहिजे. तुम्हांला फार तळमळ लागली तर महात्माजीही येथें येतील, कोणीं सांगावें?" स्वामी म्हणाले.

जेवण झालें. गांवांतील कांहीं मंडळी जमली होती, त्यांच्याशीं निरनिराळ्या गोष्टींवर चर्चा झाली. तेथें जवळच खादी पडली होती.

" ही खादी महाग असते. कशी काय घ्यावी?" एकानें प्रश्न विचारला.

" स्वतंत्र होऊं पाहाणाऱ्या लोकांनीं स्वस्त व महाग हे प्रश्न करून चालणार नाहीं. इतर फालतू गरजा कमी करूं व खादीच घेऊं असे निर्धार झाले पाहिजेत. स्वातंत्र्य स्वस्त नाहीं. त्याच्यासाठीं अपरंपार त्याग करावयास जनतेनें उठलेंच पाहिजे. तुम्ही आपापल्या गांवांतच खादी तयार कां करीत नाहीं? तुमच्या गांवचा शेतसारा किती आहे?" स्वामीनीं प्रश्न विचारला.

" सात हजारांच्या आसपास आहे, " एक पाटील म्हणाले.

" इंग्रज सरकार तुमच्या गांवांतून शेतसाऱ्याचे दरसाल सात हजार रुपये नेतें. परंतु इतर तऱ्हांनीं आपण किती संपत्ति गांवांतील दवडतों, ह्याचा जरा विचार करा. तुमच्या गांवची वस्ती पंचवीसशें आहे. प्रत्येक माणसाला कमींतकमी पांच रुपयांचें कापड वर्षाला धरलें तर साडेबारा हजार रुपये होतात. तुमचा गांव कपड्यासाठीं केवळ बारा पंधरा हजार रुपये बाहेर पाठवतो. हे आपल्या गांवांत वांचवतां आले तर ? जाडेंभरडें कसेंही असो, गांवांतच कापड तयार करावयाचें असा संकल्प सर्वांनीं करावा. गांवचें स्वरूप बदलून जाईल. तुमच्या बायका शेतांतून कामाला जात नाहींत. काढा म्हणावें सूत, फिरूं दे रहाट ! इच्छाशक्ति पाहिजे. गांवांतील पुढाऱ्यांनीं ह्याचा विचार केला पाहिजे. खादीनें स्वराज्य, ह्याचा अर्थ हा आहे कीं गांवचे पंधरा हजार रुपये गांवांतच ठेवायचे, " स्वामी म्हणाले.

" हें सारें कठीण आहे, " एकजण म्हणाला.

" मग गुलामगिरींत राहाणें सर्वांत सोपें आहे. तेंच आपण करूं या. आपणांस सारेंच कठीण वाटतें. रस्त्यांतील घाण उचलणें कठीण, हरिजनांस जवळ घेणें कठीण, हिंदुमुसलमानांचें ऐक्य कठीण, स्वदेशी व्रत कठीण, ज्या लोकांना सारें कठीण वाटतें, त्यांना मरणें एवढेंच सोपें आहे. पुरुषार्थ कठीणच असतो. आपण उठलें पाहिजे. गांवांतील गायीम्हशींचें शेण उचलावयास माणसें धावतात, परंतु माणसांचें शेण का फक्त डुकरांनीं येऊन खावें ? मांजरेंसुद्धां आपल्या विष्ठेवर माती टाकतात आणि आम्ही माणसें ! सनातन संस्कृतीचीं ! घाण, रोग, आळस, दंभ ह्यांचा प्रचार व प्रसार म्हणजे सनातन संस्कृति नाहीं. सनातन संस्कृति विषाचें अमृत करणारी आहे. विष्ठेचें सोनें करणारी आहे. शेतांत शौचास जाऊन त्यावर माती टाकावी असें धर्मांत सांगितलें आहे. परंतु शेंडींत व गंधांत धर्म राहिला. बाकी सारें कठीण होऊन बसलें. गांवची घाण दूर करण्याचा तुम्हीं कधीं विचार केला का ? रोज सकाळीं भाग्यलक्ष्मी तुमच्या गांवांत शिरूं पाहाते, परंतु घाण पाहातांच नाकाला पदर लावून ती दूर जाते. भाग्यलक्ष्मी तुमच्या गांवच्या सीमेजवळ घुटमळत आहे. घाण दूर करा व तिला घेऊन या. ' हात फिरे तेथें लक्ष्मी फिरे, ' जेथें हात हलतील,

सदैव उद्योगांत राहातील, घाण दूर करतील तेथें लक्ष्मी नांदल्याशिवाय राहाणार नाहीं."

स्वामी बोलत होते. मध्येंच त्यांचा आवाज सौम्य होई, मध्येंच संताप होई.

"पाऊस येण्याचीं चिन्हें आहेत, आपण निघूं या," नामदेव म्हणाला.

"चला. घ्या आपापलीं निशाणें! घ्या झाडू, घ्या खराटे, घ्या कुदळी, फावडीं," रघुनाथ म्हणाला.

गांवांतील मंडळी सीमेपर्यंत पोचवावयास आली. वंदे मातरम्, वंदे भ्रातरम् स्वामी म्हणाले, मुलें म्हणालीं. निघाले, यात्रेकरू परत निघाले. नवभारताचे ते यात्रेकरू होते. त्यांनीं घेतलेला हा पहिला पाठ होता. त्या सर्वांना सेवेचा आनंद झाला होता. नेहमींच्यापेक्षां निराळ्या जीवनाचा तो अनुभव होता. गाणीं गात गप्पा मारीत मुलें निघालीं. पुढच्या रविवारीं पुन्हा आपण कोठें तरी असेच जाऊं असें कांहीं म्हणत होतीं. परंतु आकाश आतां फारच भरून आलें. जवळजवळ अंधार पडला. पक्ष्यांची तारांबळ उडाली. घरट्यांतून पांखरें जाऊं लागलीं. मुलें भराभर चालूं लागलीं. गडगडाट होऊं लागला. जोराचा वारा सुटला. सृष्टीचें महान् संगीत सुरूं झालें.

"नामदेव! खोलींत बसून गातोस. येथें गा. ह्या विश्वसंगीतांत तुझें गीत मिळव," स्वामी म्हणाले.

"नामदेव बाहेर कधीं गाणें म्हणत नाहीं. तो लाजतो," यशवंत म्हणाला.

"खरें गाणें खोलींत बसून म्हणतां येणार नाहीं. पांखराला पिंजऱ्यांत बसून किंवा खोपट्यांत बसून खरी लकेर मारतां येणार नाहीं. निळ्या आकाशांत उडत चंडोल गातो व गात गात उडतो. सृष्टीची अनंतता पाहून आत्म्याची प्रतिभा स्फुरते. आत्म्याला पंख फुटतात, गाणें स्फुरतें. एखाद्या हिरव्या फांदीवर बसून विशाल सृष्टि पाहात पक्षी गातो. खोलींतील, डोलींतील गाणें म्हणजे मरणाचें गाणें. बाहेरचें गाणें म्हणजे जीवनाचें गाणें, विकासाचें गाणें, समरसतेचें गाणें. गा! नामदेव गा," स्वामी म्हणाले.

नामदेव गाऊं लागला. मुलें नाचूं लागलीं. परंतु आला, जोराचा पाऊस आला. सारीं मुलें ओलींचिंब झालीं.

"खादी तेथेंच ठेवली म्हणून बरें," रघुनाथ म्हणाला.

"आपणही तेथेंच थांबलों असतों तर बरें झालें असतें," मुकुंदा म्हणाला.

" अरे, पावसांत तर मजा आहे. पाऊस म्हणजे देवाची कृपा. आज देव तुमच्यावर प्रसन्न झाला आहे. तुमच्यावर परमेश्वर अभिषेक करीत आहे. आज तुम्ही देवाचे देव झालां आहांत, " स्वामी म्हणाले.

" तें कसें काय ? " विश्वनाथानें विचारलें.

" अरे आज तुम्हीं महादेवाचें दर्शन घेतलेंत. ज्या महादेवाच्या दर्शनाला कोणी जात नाहीं तेथें आज तुम्ही गेलांत, " स्वामी म्हणाले.

" अस्पृश्याच्या घरीं, होय ना ? " मुकुंदा म्हणाला.

" अरे खेडेगांवांतील जनता म्हणजेच महादेव. हा भोळा सांब आहे. सेवा करणाऱ्यावर हा भोळा सांब लवकर प्रसन्न होतो. परंतु ह्याची आज उपेक्षा होत आहे. भोळ्या सांबाची उपेक्षा केली तर तो रुद्र होतो. खेड्यांतील जनतेची जर स्थिति सुधारली नाहीं, तर सर्वांचा संहार आहे. सरकार, सावकार सर्वांकडून हा भोळा सांब पिळला जात आहे. रूढी व खोटा धर्म ह्यांच्याकडून छळला जात आहे. हा भोळा सांब एक दिवस आपलें समाधान, संतोष फेंकून देईल व सर्वांना काकडीप्रमाणें खावयास उठेल. ह्या महादेवाची पूजा करावयास सर्वांनीं निघालें पाहिजे. ह्या महादेवाला प्रदक्षिणा घातल्या पाहिजेत. प्रदक्षिणा घालून देवाचें स्वरूप समजतें. देवाला किती हात, किती पाय, त्याला कोणता नैवेद्य हवा आहे हें सारें समजूं लागतें. आपण प्रदक्षिणा घालून देवाशीं समरस होतों.

" तुम्हीं ह्या खेड्यांना प्रदक्षिणा घातल्या पाहिजेत. ह्या अनंतबाहु, अनंतशिर देवाला कोणता नैवेद्य हवा आहे तें मग समजूं लागेल. ह्या देवाला कशाची भूक आहे, कशाची तहान आहे, कशाची वाण आहे तें तुम्हांला कळून येईल. मग ह्या विराट् देवाशीं तुम्ही एकरूप व्हाल, " स्वामी बोलत होते.

पावसांतील थंडींत मुलांच्या हृदयाला ऊब येत होती. भावनांची ऊब मिळत होती ! ती ऊब म्हणूं का पाऊसच म्हणूं ? वरून पाऊस पडून देह ओले होत होते. स्वामींच्या विचारांच्या दृष्टीनें मनें ओलीं होत होतीं, हृदयें ओलीं होत होतीं.

" यशवंत ! योग्यांची एक गंमत तुला माहीत आहे का ? " स्वामींनीं प्रश्न विचारला.

" ते तास तास नाक धरून बसतात, " यशवंत हसत म्हणाला.

"ते पाण्यावरून चालत जातात, हवेंतून उडत जातात." नामदेव म्हणाला.

"ते हवा खातात व फक्त पाणी पितात; तरी गलेलठ्ठ दिसतात," मुकुंदा म्हणाला.

"तें सारें जाऊं दे. खरा योगी जो असतो, त्याचीं इंद्रियें फार सामर्थ्यवान् होतात. त्याच्या कानांना दूरचा आवाज ऐकूं येतो, त्याच्या नाकाला दूरचा गंध येतो, त्याच्या डोळ्यांना दूरचें दिसतें. तो ताऱ्यांचें संगीत ऐकतो व नंदन-वनांतील कल्पवृक्षांच्या फुलांचा वास घेतो," स्वामी सांगत होते.

"तो नरकांतील घाणही मग घेईल. त्याला दूरची घाण नाहीं का येणार?" वामननें विचारलें.

"हो, तीही त्याला येईल. साऱ्या सृष्टींतील रंग, गंध, ध्वनि जणुं त्याचे होतात. तो जणुं पोकळ झालेला असतो. साऱ्या सृष्टींतील वारे त्याच्यामध्यें घुसतात. तो जणुं स्वतःला विसरतो व विश्वाशीं एकरूप होतो. परंतु आपलें जीवन पाहा! आपलीं इंद्रियें स्वतःच्याच विचारानें रात्रंदिवस भरलेलीं असतात. अहंकारानें आपण अंतर्बाह्य बुजून गेलेलें असतों. आपल्या वैयक्तिक सुखदुःखाचें एकेरी संगीतच आपण ऐकत असतों. परंतु आजूबाजूच्या लाखों लोकांच्या सुखदुःखांचा आवाज आपल्या कानांत शिरत नाहीं. आपण आतां ह्या गांवांतील ती हरिजनबाई पाहिली. काय तिची दशा! मुलाच्या अंगांत नाहीं, निजायला कांहीं नाहीं, खायला कांहीं नाहीं! हिंदुस्थानांतील दगडांच्या मूर्तींच्या डोक्यावर हिरेमाणकें चमकत आहेत आणि हीं देवाचीं हिरेमाणकें मातींत मिळत आहेत! हा आर्तनाद कोणाच्या कानांत जातो? हा आर्तनाद विवेकानंदांच्या कानांत घुसला, महात्माजींच्या कानांत घुसला! परंतु तो तुमच्या आमच्या कानांत कां घुसत नाहीं?

"गड्यांनो! अशीं महादेवाचीं दर्शनें घेत जा, म्हणजे तो आवाज ऐकूं येऊं लागेल. जरा स्वतःच्या खोल्यांतून बाहेर या. खुर्च्यांवरून, पलंगांवरून, गाद्यागिरद्यांवरून जरा उठा. मोटारींतून, बंगल्यांतून जरा बाहेर या. हीं प्राणघेणीं गाणीं इकडे चाललीं आहेत. ते थांबवा जरा रेडिओ, म्हणजे ह्या लाखों हाका तुमच्या कानांत घुसतील!

"नामदेव, रघुनाथ, यशवंत, मुकुंदा! तुम्ही मोठे व्हाल तेव्हां ह्या महादेवाला विसरूं नका. ह्या महादेवाचें दर्शन आज तुम्हांला घडलें आहे. त्याची स्थिति तुम्हीं पाहिली आहे. ह्या महादेवाची खरी पूजा ज्याला करावयाची

असेल, त्याला ह्या भारतांत विशाल क्रांति करावी लागेल. ती क्रांति उत्पन्न झाली आहे. त्या क्रांतींत घुमावें लागेल, घुसावें लागेल; त्या क्रांतीसाठीं जगावें लागेल, त्या क्रांतीसाठीं मरावें लागेल," स्वामी भावरूप होऊन बोलत होते.

तो पाहा आला नाला! अरे बापरे! किती पाणी आलें आहे नाल्याला! लाल लाल पाणी! फेसाळ पाणी! सारी घाण वाहून चालली आहे.

"घाण वाहून जाण्यासाठीं अशा विचारांच्या लाटा उसळल्या पाहिजेत; कर्मांचे प्रवाह सुरू झाले पाहिजेत," स्वामी म्हणाले.

"आतां पलीकडे कसें जावयाचें? किती आहे पाणी? ओढ फार असेल," मुलें बोलूं लागलीं.

निर्भय रघुनाथ पाण्यांत शिरला! त्याच्या पाठोपाठ मुकुंदा निघाला. पाण्याचें परीक्षण निरीक्षण होऊं लागलें. भीतभीत नामदेवही निघाला. यशवंत नामदेव हात धरून चालले होते. स्वामींनीं वामनला घेतलें व पलीकडे नेलें पुन्हा परत येऊन त्यांनीं हरीला उचललें. रघुनाथ व मुकुंदा ह्यांनींहीं परत येऊन कांहीं मुलांना हात धरून नेलें. सारीं मुलें बाहेर आलीं.

"एकमेकांच्या मदतीनें सारे तरलेत. तुम्ही मोठे झालेत म्हणजे असेच एकमेकांना हात द्या व क्रांतीच्या प्रवाहांत यशस्वी व्हा. ये, वामन! तुला उचलून घेतों. तूं आतां दमला आहेस. बस माझ्या खांद्यावर. नाहीं तर पाठंगुळीस तुला घेतों, म्हणजे थंडी वाजणार नाहीं." असें म्हणून वामनला त्यांनीं खरेंच उचलून घेतलें. मुलांनीं टाळ्या पिटल्या. "वंदे मातरम्, वंदे मातरम्," सारे म्हणाले.

नामदेव हरीला म्हणाला, "ये रे तुला मी घेतों. चल ये." हरी हसत हसत नामदेवाच्या खांद्यावर चढला.

मारुतीच्या खांद्यावर राम. अंगदाच्या खांद्यावर लक्ष्मण तसें तें दृश्य दिसत होतें. पर्वताच्या माथ्यावर लहानसें हिरवेंगार झाड असावें, किंवा एखाद्या आम्रवृक्षावर पोपट बसावा तसें तें दृश्य होतें.

"भराभर चला म्हणजे थंडी वाजणार नाहीं. रेंगाळणाऱ्याला सारें बाधतें," स्वामी म्हणाले.

मुलें धावपळ करूं लागलीं. पाण्यानें सारी माती वाहून गेली होती व रस्त्यावरील स्वच्छ खडी पायांना टुपत होती. भराभर पळतांना त्रास होत होता.

पुन्हा पाऊस आला. जोराचा पाऊस आला. आतां वारा नव्हता. कडाड् कडाड् नव्हतें. विजांचा नाच नव्हता. सृष्टीची समाधि होती. विशाल आकाशाच्या समाधींतील ते धन्याश्रु होते. झाडें लवून गेलीं होतीं. गुराखी गुरें घेऊन परतत होते. गुरांच्या माना खालीं झाल्या होत्या. पावसाची झड होती. आकाशाचें अंतरंग भरून आलें होतें. होऊं दे रितें.

तें पाहा स्टेशन दिसूं लागलें. आलें, अमळनेर आलें. मुलांच्या पायांत जोर आला. ध्येय दिसूं लागतांच पाय लगट करूं लागले. आलीं, सारीं मुलें छात्रालयांत आलीं. सर्वांनीं अंगें कोरडीं केलीं, केस नीट पुसले. दुसरे धुतलेले स्वच्छ कपडे घातले. इतक्यांत गोपाळराव आले.

" तुम्हांला नमस्कार केला पाहिजे. तुम्ही दरिद्रीनारायणाची यात्रा करून आलेत, " ते हसत म्हणाले.

" आम्ही महादेवाचें दर्शन करून आलों, " नामदेव म्हणाला.

" मारवडला कोणता महादेव आहे ? " गोपाळरावांनीं विचारलें.

" प्रत्येक गांवाला महादेव आहे, " यशवंत म्हणाला.

" प्रत्येक गांवांत मारुती आहे; पण महादेव कोठें आहे, " गोपाळराव पुन्हा म्हणाले.

" खेड्यांतील जनता म्हणजे महादेव. दारिद्र्यांत, विपत्तीच्या स्मशानांत पडलेला महादेव ! भोळा भाबडा महादेव. थोड्याशा सेवेनें हृदय देणारा महादेव. परंतु उपेक्षेची पराकाष्ठा झाली असतां रुद्र बनून सर्व जगाचा संहार करणारा महादेव ! ह्या महादेवाचें आम्हीं दर्शन घेतलें, " स्वामी म्हणाले.

गोपाळराव क्षणभर मुके होते.

" अरे तुमची हुडहुडी अजून जात नाहीं. दहादहा जोर तरी काढा, " गोपाळराव म्हणाले.

" खडे बोचून पाय दुखत आहेत. व्यायाम भरपूर झाला आहे, " रघुनाथ म्हणाला.

" एकेक कोयनेलची गोळी घ्या सारे. नामदेव ! जा, घेऊन ये ती वळी. तिच्यांतील एकेक गोळी सर्वांना दे, " गोपाळराव म्हणाले.

" आम्हांला खाऊ देण्याऐवजीं कडूकडू गोळी देणार वाटतें, " मुकुंदानें हसत विचारलें.

" अरे, आजारी पडलेत तर तुमचे पालक माझ्या नांवानें खडे फोडतील. छात्रालयांत कोणी आजारी पडूं नये अशी देवाला माझी प्रार्थना असते. घ्या एकेक गोळी म्हणजे पुन्हा महादेवाचें दर्शन घ्यावयास अडचण पडणार नाहीं," गोपाळराव म्हणाले.

नामदेवानें सर्वांना एकेक गोळी दिली.

" अरे, स्वामींनाही दे. घेऊं दे त्यांनाही," गोपाळराव म्हणाले.

" मला नको. मी कधीं आजारी पडणार नाहीं," स्वामी म्हणाले.

" अहंकार नको. उद्यांच पडायचेत नाहींतर आजारी," गोपाळराव म्हणाले.

" दे रे नामदेव ! मलाही घेऊं दे. सुखदुःखांत, कडूगोडांत तुमच्याबरोबर राहूं दे." स्वामींनींही हातांत गोळी घेतली.

" थांबा रे, मी मंत्र म्हणतों, मग गोळ्या गिळा," असें म्हणून गोपाळराव संकल्प सांगूं लागले.

> **" अद्योच्चरितवर्तमान एवंगुणणविशेषणविशिष्टायां शुभपुण्यतिथौ मम आत्मनः श्रुतिस्मृतिपुराणोक्तफलप्राप्त्यर्थं पुनःपुनः ग्रामसेवा-प्रसंग प्राप्त्यर्थं, शरीररक्षणार्थं इदं कटुगुटिकाभक्षणम् अहं करिष्ये ।**

अरे, थांबा जरा.

> **अच्युतानंदगोविंदनामोच्चारणभेषजम् ।**
> **नश्यन्ति सकला रोगाः सत्यं सत्यं वदाम्यहम् ॥"**

ॐ

" गिळा रे गिळा," गोपाळराव म्हणाले.

" अरे, त्याला पाणी द्या. त्याला गिळतां नाहीं येत," स्वामी म्हणाले.

" महादेवाच्या कंठांत विष राहिलें. ह्याच्या कंठांत कोयनेलची पांढरी गोळी राहावयाची. तो निळकंठ व हा श्वेतकंठ !" गोपाळराव विनोद करीत होते.

" आपण आतां पुनः महादेवाच्या दर्शनास कधीं जावयाचें ?" मुलांनीं विचारलें.

" आपण जाऊं तेव्हां जाऊं. परंतु तुम्ही मोठे झालांत, शिक्षण संपविलेंत म्हणजे मात्र गेल्याशिवाय राहूं नका ! महादेव वाट पाहात आहे ! तुम्ही केव्हां मोठे होऊन येतां त्याची वाट पाहात आहे !" स्वामी गंभीरपणें म्हणाले.

६

# प्रतिज्ञा

स्वामींच्या डोक्यांतून नेहमीं नवीन नवीन कल्पना व नवीन नवीन उद्योग बाहेर पडत असत. अमेरिकेमध्यें वृक्षारोपणदिन पाळण्यांत येत असतो. तसा आपल्या-कडे सुरू करावा असें त्यांच्या मनांत आलें. तपोवनांची संस्कृति ज्या भारतभूमींत जन्मली तेथें वृक्षांसंबंधीं केवढी उदासीनता! तपोवनें म्हणजे भारताचीं भूषणें. भूमातेच्या हिरव्या पदराखालीं भारतीय संस्कृतीचें बाळ जन्मलें, पोसलें गेलें, वाढलें. परंतु हें बाळ आतां उघडें पडूं लागलें. दरवर्षी लाखों झाडें तोडलीं जातात, परंतु नवीन किती लावलीं जातात? कोण विचार करतो? ह्या कृषिप्रधान भारतवर्षाला मोठमोठ्या जंगलांची फार जरूर आहे. झाडें मेघांना ओढून आणतात. झाडी कमी झाली तर पाऊस कमी होतो. ठिकठिकाणीं पाऊस कमी होत आहे. देवाच्या नांवानें ओरडून काय होणार? आपलीं हीं पापें, आपला हा आळशीपणा, आपली ही विचारशून्यता! प्रत्येकानें निदान एक तरी झाड पावसाळ्यांत लावावें. इटली देशांत मागें सरकारनें तीन लक्ष नवीन झाडें लाविलीं! अमेरिकेमध्यें वॉशिंगटनच्या दोन वाढदिवसांच्या दिवशीं लाखों झाडें लाविलीं गेलीं आणि अमेरिकेंत पुनः जंगलांची वाण नाहीं. मैलच्या मैल पसरलेलीं अफाट वनें, काननें तेथें आहेत. दरवर्षी अमेरिकेंत मुलांमुलींकडून लक्षावधि झाडें लावलीं जातात. वृक्षारोपणाच्या दिवशीं मिरवणुकी निघतात. भूमातेचीं, वृक्षांचीं सुंदर गाणीं म्हणण्यांत येतात! वाद्यें असतात, झेंडे असतात! परंतु आपल्या ह्या कर्मशून्य देशांत काय आहे?

हिंदुस्थानांतील खेडीं पूर्वी भरगच्च आंबराईत असत. भूमातेच्या हातांनीं आलिंगलेलीं खेडीं असत. वृक्ष म्हणजे पृथ्वीचे हजारों हातच होत. ह्या हातांच्या प्रेमळ वेष्टनांत गांवें सुखानें नांदत. परंतु हे हिरवे हिरवे हात काटले गेले, छाटले गेले. गांवांची रया गेली, तेज गेलें. आंबराया नाहींशा होत चालल्या. गायी-गुरांना बसायला छाया नाहीं. मुलांबाळांना खेळायला जायला जागा नाहीं. हीं माझ्या हातचीं दहा झाडें असें ज्याला म्हणतां येईल असे किती भाग्यवान् लोक आपल्या भारतांत असतील?

स्वामींच्या मनांत आलें कीं हा दिवस सुरू व्हावा. आषाढी पौर्णिमा हा वृक्षसंवर्धनदिन म्हणून सर्वत्र पाळला जावा. परंतु आषाढी पौर्णिमा तर होऊन गेली होती. अद्याप पावसाळा होता. झाडें अजून जगलीं असतीं. अमळनेरांत ही प्रथा पाडण्याचें नक्की झालें. स्वामी मराठी शाळेंतील शिक्षकांना भेटले. इंग्रजी शाळेंतील शिक्षकांना भेटले. त्या प्रसंगार्थ सुट्टी देण्याचें सर्वांनीं कबूल केलें.

नामदेव, रघुनाथ, यशवंत, मुकुंदा वगैरे मुलांनीं झेंडे तयार केले. वृक्षांच्या पल्लवांचे व फुलांचे झेंडे तयार करण्यांत आले. निरनिराळीं ब्रीदवचनें तयार करण्यांत आलीं.

**‘ झाडें म्हणजे देवाचीं हिरवीं मंदिरें ’**
**‘ झाड लावणें म्हणजे पाऊस आणणें ’**
**‘ झाडें लावाल तर सुखी व्हाल ’**
**‘ वृक्ष, लता, वेली हीं भूमीचीं भूषणें आहेत ’**
**‘ झाडांच्या सावलींत ऋषींनीं तपश्चर्या केली ’**
**‘ वृक्ष म्हणजे भूमातेचे मंगल आशीर्वाद ’**

स्वामींनीं निरनिराळीं ब्रीदवचनें दिलीं. सुंदर गाणीं करून दिलीं. मिरवणुकीची तयारी झाली.

गांवांतील इंग्रजी, मराठी शाळेंतील सारीं मुलें, मुली एकत्र जमलीं ! खूपच उत्साह होता. प्रत्येक मुलानें हिरव्या पानांची ध्वजा हातांत घेतली होती. वाद्यें वाजत होतीं. गांवांतलीं कांहीं मुलें घोड्यावर बसलीं होतीं. पताका फडकत होत्या. ब्रीदवचनें झळकत होतीं ! जाहिराती वांटल्या जात होत्या. एका प्रचंड वटवृक्षाखालीं सभा होणार होती. वड म्हणजे वृक्षवनस्पतींचा राजा. त्याच्या अध्यक्षतेखालीं स्वामींनीं दोन शब्द सांगितले. ‘ त्या त्या वर्गांतील मुलांनीं आपापल्या वर्गांचीं म्हणून झाडें-बीं लावा. त्यांची काळजी घ्या ! एक झाड लावणें म्हणजे पाण्याचा एक मेघ आणणें होय. ’

मुलें निरनिराळ्या ठिकाणीं गेलीं. कांहीं मुलांनीं शाळेच्या आवाराभोवतीं झाडें लाविलीं. कांहीं मुलांनीं गांवाबाहेरच्या देवळाभोवतीं झाडें लाविलीं. छात्रालयांतील मुलांनीं छात्रालयाच्या भोवतीं झाडें लाविलीं !

"तुम्ही छात्रालयांतून जाल. परंतु तुमच्या हातचीं झाडें राहातील. छात्रालयांत तुमच्या हातची जिवंत खूण ठेवून जा. छाया देणारी, सुगंध देणारी, फळ देणारी आठवण ठेवून जा. अशोक, चदन, बकूळ, आम्र, शिरीष, निंब, पुन्नाग, जांभूळ लावा. नाना प्रकारचीं झाडें, त्यांना कुंपण घाला. पाऊस नसेल तेव्हां पाणी घाला. आपल्या हातानें कांहीं निर्माण करा. त्यांत किती आनंद आहे, केवढें समाधान आहे!" स्वामी सांगत होते.

**हिरवीं हिरवीं हिरवीं गार। चला झाडें लावूं चार॥**
**चला झाडें लावूं चार।**
**उठा झाडें लावूं चार।**
**हिरवीं हिरवीं हिरवीं गार। चला झाडें लावूं चार।**
**झाडें लावूं सुंदर छान। त्यांना मानूं आपण प्राण।**
**देतिल छाया थंडगार। होऊं देवाजीला प्यार॥ हि०॥**
**हिरवीं हिरवीं मंदिरें। चला लावूं सुंदरें।**
**पाहून झाडें हिरवीं गार। वरून येईल मेघधार॥ हि०॥**

वगैरे गाणीं म्हणत मुलांचें काम चाललें होतें! स्वामी मधून मधून वृक्षसंस्कृति सांगत होते. वड, पिंपळ, औदुंबर, आवळी, बेल, इत्यादि वृक्षांना आपण कसें पावित्र्य दिलें आहे. आवळीखालीं जेवावें, वनभोजनास जावें, पत्रावळीवर जेवावें, त्यांचीं व्रतें घ्यावीं, कसा महिमा आहे! आपल्याकडे वृक्षवेलींचीं आपण लग्नेंही कशीं लावीत होतों! शाकुंतल नाटकांत शकुंतला आम्रवृक्षाचें जातिमुक्तालतेशीं कसें लग्न लावते! तुळशीचें लग्न अद्याप कसें अस्तित्वांत आहे व त्या लग्नांत आवळे, चिंचा, झेंडू ह्यांचें महत्त्व कसें आहे, सारें स्वामी सांगत होते. सृष्टीशीं समरूप व्हावयाची केवढी थोर कल्पना! झाडांना रात्रीं तोडूं नये, रात्रीं पानफूल तोडूं नये. ह्यांतही केवढी सहृदयता आहे! रात्रींच्या वेळीं झाडें निजतात! केवढें काव्य आहे!

भारतीय संस्कृतींतील हृदयंगम दर्शन मधून मधून स्वामीजी मुलांस घडवीत असत व मुलांचा आत्मा भावनांनीं भरून येई. भारतीय ध्येयांची भव्यता व उदारता त्यांना पटे व त्या संस्कृतीचे आपण वारसदार म्हणून अभिमान वाटे.

दुपारीं मुलें शाळेंत गेलीं म्हणजे स्वामींचा वेळ वाचनांत किंवा कांतण्यांत जात असे. परंतु हरिजनांची शाळा सुरू करावी, दुपारच्या वेळीं हरिजनवस्तींत

जावें, तेथील मुलांत बसावें, गोष्टी सांगाव्या असें त्यांच्या मनांत आलें. मनांत आलें कीं करावयाचें हा स्वामींचा दंडक होता. एके दिवशीं रात्रीं ते हरिजनवस्तींतील एका मंदिरांत गेले. तें हरिजनांचें मंदिर होतें. स्वामीजी तेथें गाणें म्हणत बसले. हरिजनमंडळी तेथें जमली.

"मी तुमच्या मुलांना उद्यांपासून दुपारीं बारा ते दोन शिकवायला आलों तर चालेल का ? तुमचीं कांहीं मुलें येतील का ?" स्वामींनीं प्रश्न विचारला.

"हो, कांहीं मुलें येत जातील आणि तुम्ही रात्रीं येत जाल तर आम्ही लहान मोठे सारेच येऊं. आम्हांस गोष्टी सांगा, वाचून दाखवा," एक उत्साही गृहस्थ म्हणाले.

"आठवड्यांतून तीन दिवस रात्रीं मी येत जाईन. परंतु दिवसा बहुधा रोज येत जाईन. ज्या दिवशीं येतां येणार नाहीं त्या दिवशीं कळवीत जाईन," स्वामी म्हणाले.

"परंतु आमच्याजवळ पाटी नाहीं, पेन्सिल नाहीं ; पुस्तक नाहीं, वही नाहीं," मुलें म्हणालीं.

"त्याची मी व्यवस्था करीन," स्वामी म्हणाले.

"येथें देवळांतच बसत जाऊं," मुलें म्हणालीं.

"होय. देवाच्या पायांजवळ बसून शिकूं," स्वामी म्हणाले.

गोपाळरावांजवळून स्वामींनीं एक फळा मागून घेतला. चित्रांचीं पुस्तकें, कांहीं पाट्या, पेन्सिली, खडू—समान तयार झालें. स्वामीजींची राष्ट्रीय हरिजन-शाळा सुरू झाली. रविवारीं हरिजनवस्तींत सर्वत्र सफाई करावयाची असें ठरविण्यांत आलें. स्वामी मुलांना गाणीं सांगत व नाचत. आजूबाजूला बायका-माणसें हें नृत्यगायन पाहावयास व ऐकावयास जमत ! स्वामीजी लहान लहान गोष्टी सांगत. त्या मुलांना फारच आवडत. भारत, भागवत, रामायणांतील गोष्टी ; बुद्ध, महावीर, ह्यांच्या चरित्रांतील गोष्टी ; अशोक, अकबर, प्रताप, शिवाजी ह्यांच्या गोष्टी, महात्माजी, श्रद्धानंद, देशबंधु, लोकमान्य ह्यांच्या गोष्टी ; ज्योतिबा फुले, शाहू छत्रपति, डॉ. आंबेडकर, गुरुवर्य महर्षि विठ्ठल रामजी शिंदे ह्यांच्या कथा—सारें सांगत. मुलें हा गोष्टीरूप इतिहास ऐकतांना तन्मय होत असत. कधीं कधीं देशभक्तांचीं चित्रें आणून मुलांना स्वामी देत. कधीं

स्वामी मुलांना बरोबर घेऊन नदीवर जात. तेथें त्यांना ते साबण देत. कपडे स्वच्छ होत. मुलें एकमेकांच्या पाठी चोळीत! सारे स्वच्छ होत.

स्वामीजी रात्रीं जात तेव्हां वर्तमानपत्रें वाचून दाखवीत. प्राचीन काळापासून अस्पृश्योद्धाराची चळवळ संतांनीं कशी चालवीत आणली आहे, तें ते सांगत. सर्वांना ज्ञान मिळावें म्हणून संतांनीं संस्कृत पंडितांच्याविरुद्ध सर्व हिंदुस्थानभर बंड कसें केलें त्याची हकीकत ते भावनोत्कटतेनें वर्णीत. तोच लढा महात्माजीही पुढें चालवीत आहेत आणि तुम्हीही आतां जागृत झाले आहांत; प्रश्न लौकर सुटेल अशी आशा ते देत.

कधीं कधीं स्वामी नामदेवाला बरोबर घेऊन जात. नामदेव बांसरी वाजवी, सुंदर गाणीं म्हणे, फळ्यावर चित्रें काढून दाखवी. नामदेव अर्थात्‌च दिवसा येणें शक्य नव्हतें. तो कधीं कधीं रात्रीं येत असे. त्याची व हरिजनबंधूंची तेव्हांच मैत्री जमली.

ह्या निरनिराळ्या श्रमांमुळें स्वामींना थकवा आला. श्रमामुळें थकवा आला कीं मनांतील निराशा थकवा देत असते. भारतांतील अपार दुःख पाहून ते हळहळत. ह्या आकाशाला कोण ठिगळ लावणार असें मनांतून त्यांना वाटे. ते बाहेरून खूप आशा दाखवीत, परंतु अंतरीं पुष्कळदां खिन्नच असत. निराशेचा भुंगा त्यांच्या जीवनास रात्रंदिवस पोखरीत होता.

त्याला एक निमित्त कारणही झालें. छात्रालयांत यशवंत म्हणून जो मुलगा होता त्याच्याबद्दल स्वामींना खूप आशा वाटे. यशवंताच्या जीवनांत जमीन-अस्मानाचा फरक झाला होता. छात्रालयांत कोणी आजारी पडला तर तेथें यशवंत सेवेला आधीं हजर असे. स्वच्छतेचें काम असो, कष्टाचें काम असो, स्वयंसेवक व्हावयाचें असो—यशवंतचा पहिला नंबर. खादीशिवाय तो आतां कांहीं वापरीत नसे. खादीफेरीमध्येंही सामील व्हावयाचा. तो सर्वांत मिळून मिसळून वागे. हसतमुख राही. निर्मळ असे. यशवंताला जरा बुद्धि कमी होती. त्याला गणित वगैरे समजत नसे. स्वामी त्याला म्हणत, "यशवंत, तूं घरचा सुखी आहेस. परीक्षा हें तुझें ध्येय नाहीं. तूं खूप वाच. विचार करावयास शीक. नवीन दृष्टि घे. खोटे अभिमान सोड. मी तुझ्याबरोबर निरनिराळीं पुस्तकें वाचीत जाईन."

स्वामींनीं यशवंताबरोबर खरोखरच पुष्कळ पुस्तकें वाचलीं. यशवंत दैनिकांत लेख लिही. इंग्रजी लेखांचें भाषांतर करी. यंग इंडिया, मॉडर्न रिव्ह्यू, जन्मभूमि, त्रिवेणी–सुंदर पत्रें, मासिकें स्वामी त्याच्याबरोबर वाचीत.

एक दिवस स्वामी म्हणाले, "यशवंत, हिंदुस्थानभर प्रवास कर. विश्वभारतींत एक ग्रामसंजीवन अभ्यासक्रम वर्षाचा असतो तेथें एक वर्षभर राहा. मोठे लोक पाहाशील, दृष्टि विशाल होईल, संतांचीं दर्शनें होतील. साबरमतीच्या आश्रमांतही असाच एक वर्षभर राहा. असा सर्व ठिकाणचा रस पिऊन पुष्ट होऊन ये. खानदेशच्या सेवेसाठीं सिद्ध होऊन ये."

यशवंताच्या मनांत हे विचार भरत. विश्वभारतींत जावयाचें तो ठरवूं लागला. छात्रालयांतील मुलें त्या गोष्टीची चर्चा करूं लागलीं. यशवंतानें आपल्या वडील सावत्र भावाला हे सारे विचार कळविले. तो घरच्या पत्राची वाट पाहात होता. आशेनें होता.

परंतु एके दिवशीं अकस्मात् त्याचा भाऊ आला. तो गोपाळरावांस भेटला. त्यांची बोलाचाली झाली.

"तुम्ही आमचीं मुलें बिघडवीत आहांत. घरच्या मंडळीविरुद्ध बंड करावयास शिकवीत आहांत," भाऊ म्हणाला.

"आम्ही योग्य तें करावयास सांगत आहोंत. कोणावर सक्ति नाहीं, जुलूम नाहीं. मुलांना पटतें म्हणून ते करतात," गोपाळराव म्हणाले.

"आमचा सत्यानाश होईल इकडे तुमचें लक्ष आहे का? यशवंतानें सारे विलायती कपडे जाळले आणि आतां गोणपाटें नेसतो. आम्हांला शरम वाटते. कुळाचा नांवलौकिक ठेवायला नको का?" भाऊ रागानें म्हणाला.

"विलायती वस्त्रें वापरणें म्हणजे का कुळाचा नांवलौकिक? तलम वस्त्रें वापरावयाचीं असतील तर तलमही खादी मिळते." गोपाळराव म्हणाले.

"आमच्या घरीं कलेक्टर येतात. सरकारी अधिकारी येतात. त्यांनीं घरांत ही खादी पाहिली तर आम्हांला धोका नाहीं का? आमची जहागीर राहील कां?" भाऊ म्हणाला.

"पूर्वजांनीं स्वातंत्र्यार्थ पराक्रम करून जहागीर मिळविली. आतां ती स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं पुन्हा गमवा. गुलामगिरींत राहाणाऱ्याला जहागिरी काय करावयाची? तुम्हांला स्वाभिमान प्रिय आहे कीं परकीयांचें जूं, प्रिय

आहे ! वरून पूर्वज रडत असतील, तुम्हांला शिव्याशाप देत असतील," गोपाळराव त्वेषानें म्हणाले.

"तुमचे शिव्याशाप ऐकायला मी आलों नाहीं. मी माझा भाऊ घेऊन जातों. त्याला येथें एक क्षणभरही ठेवावयाची मला इच्छा नाहीं. ज्या हातांनीं तरवार धरावयाची, त्या हातांत तुम्ही झाडू द्यावीत काय ? आमचे सगेसोयरे आमच्या तोंडांत शेण घालतील. आमच्या दारांत हत्ती विक्रीसाठीं यावयाचे व अधोलीनें पैसे मोजून आम्हीं द्यावयाचे. त्या कुळांतील मुलानें घरोघर जाऊन खादी विकावी काय ?" भाऊ म्हणाला.

"यशवंत बांधाबांधी कर, ह्यांचे पैसे चुकते कर. बघतोस काय ? माझ्या इच्छेप्रमाणें वागायचें आहे कीं नाहीं ? नसेल वागावयाचें तर दाही दिशा तुला मोकळ्या आहेत. पुन्हा काळें तोंड दाखवूं नकोस," भाऊ बोलत होता.

"येथें नका ठेवूं. परंतु विश्वभारतींत जाऊं दे मला," यशवंतानें विनविलें.

"आपलें घर म्हणजे विश्वभारती. बिघडलास तेवढा पुरे. आणखी दूर गेलास तर आणखी बिघडायचास," भाऊ म्हणाला.

यशवंताच्या डोळ्यांत पाणी आलें. तो स्वामींच्याकडे गेला. स्वामी विचारमग्न होते.

"स्वामीजी, मी काय करूं ? तुम्हीं मार्ग दाखविलात. आतां मी कोठें जाऊं ? घरच्या चिखलांत मी रुतून बसेन. माझा विकास थांबला, प्रगति थांबली. माझे पंख तुटले, शक्ति खुंटली." यशवंत दीनवाणा झाला होता.

स्वामी शांतपणें म्हणाले, "यशवंत, जा, घरीं जा. मी तुला पत्र पाठवीत जाईन. तूं घरीं चांगलीं पुस्तकें, वर्तमानपत्रें घेत जा. हळुहळू घरीं स्वाभिमानानें व स्वतंत्र विचारानें वागायला शीक. आणखी दोनचार वर्षेंपर्यंत असाच राहा. पुढें तूं मोठा होशील. एक दिवस बंधन तोडून मोकळा हो. घरची सर्व माहिती करून घे. चार पांच वर्षें सबूरीनें घे. गांवांतील लोकांशीं प्रेम जोड. त्यांच्यांत मिसळत जा. अभिमान धुळींत मिळव आणि मग पुढें देशाच्या संसाराला येऊन मीळ. समजलास ? रडूं नको. आपणांस घरींदारीं सर्वत्र झगडावयाचें आहे. हिंदुस्थानांत सर्वत्र गुलामगिरी आहे. इंग्रजांची गुलामगिरी एक वेळ पत्करली, परंतु ही घरची गुलामगिरी, स्त्रियांची गुलामगिरी, हरिजनांची गुलामगिरी, मजुरांची गुलामगिरी—ही आपण निर्मिलेली व वाढविलेली

गुलामगिरी पाहिली कीं तळपायांची आग मस्तकास जाते. हा घरचा झगडा अधिक प्रखर व कठीण आहे. तुला धडपडावयाचें आहे ना? तुझी धडपड सुरू झाली. तुझ्या खऱ्या जीवनाला प्रारंभ झाला. ही खादी सोडूं नको. ही खादी तुला तारील. देशाचें स्मरण देईल. गरिबांची आठवण बुजूं देणार नाहीं. हें तारक वस्त्र शरिरावर ठेव. तुझे भाऊ ही खादी घालवूं पाहातील! गुलामगिरीचा व अहंकाराचा नायनाट करणारी ही खादी, दंभाचा व आढ्यतेचा डोलारा धुळींत मिळविणारी ही खादी तुझ्या भावाच्या डोळ्यांतही सलेल. परंतु एवढ्या बाबतींत तूं हट्ट धर. एवढ्या बाबतींत जिंकलेंस कीं पुढें यशस्वी होशील. यशवंत यशस्वी होवो."

"झालें कीं नाहीं रे यशवंत? नीघ," भाऊ रागानें म्हणाला. निघाला यशवंत. हसणारा व हसविणारा यशवंत रडत व सर्वांना रडवीत गेला. छात्रालयांतील मुलें हळहळलीं. त्यांच्यांतील मूर्तिमंत सेवा गेली, खेळ गेला, आनंद गेला, उत्साह गेला. परंतु सर्वांत कोणाला जर वाईट वाटलें असेल तर तें स्वामींना.

त्या दिवशीं ते खिन्न होते. आपण एकेक मुलगा तयार करीत आहोंत, तो चिखलांत ओढला जात आहे! आपण मुलांना भावनांचे, विचारांचे पंख देत आहोंत, घरची मंडळी ते तोडीत आहेत! असेंच शेवटीं होणार का? भारतमातेच्या बंधमोचनासाठीं कोण येणार? ह्या व्यापक संसारांत कोण पडणार? यशवंत गेला. नामदेव, रघुनाथ, मुकुंदा, जनार्दन, नरहर सारे असेच जातील का? आतां पुढच्या वर्षी येथून हे जातील. कोणी कॉलेजांत जातील. कोणी कोर्टें जांतील. त्यांचे विचार टिकतील का? हृदयांतील रोपें वाढतील का जळून जातील?

एक प्रकारची प्रखर निराशा स्वामींना वाटूं लागली. सायंकाळीं ते एकटेच मारवडगांवीं गेले. त्या हरिजनबाईचा मुलगा पाहावयास गेले होते.

"कसा आहे मुलगा?" स्वामींनीं विचारलें.

"चांगला आहे आतां," म्हातारी म्हणाली.

तो मुलगा इतक्यांत तेथें आला. स्वामींनीं त्याला खाऊ दिला, चित्रें दिलीं. त्याच्या पाठीवरून हात फिरविला.

"तुम्ही मला पाहायला आलेत?" मुलानें विचारलें.

" हो, " स्वामी म्हणाले.

" पायीं आलेत ? " त्यानें पुन्हा विचारलें.

" हो. माझे पाय मजबूत आहेत. गरिबांच्या मित्रानें गरीबच झालें पाहिजे. देवाच्या दर्शनाला पायीं जावें, " स्वामी म्हणाले.

" आतां तुम्ही एकटे परत जाणार ? " मुलानें विचारलें.

" हो, " स्वामी म्हणाले.

" ह्या वेळेस तुमच्याबरोबर मुलें कां नाहीं आलीं ? " मुलानें विचारलें.

" नेहमीं कोठलीं मुलें येणार ? " खिन्नपणें स्वामी म्हणाले.

" तुम्हांला जायला उशीर होईल, " मुलगा म्हणाला.

" मी आतां जातों. परंतु तुझें नांव काय ? " स्वामींनीं विचारलें.

" माझें नांव धर्मा, " मुलगा म्हणाला.

" किती रे गोड तुमचीं नांवें असतात! अमळनेरच्या त्या एका मुलीचें नांव आहे एकादशी, एकीचें नांव आहे तुळशी ! तुमच्यांत अधिक धर्म आहे, अधिक परमेश्वर आहे, " स्वामी म्हणाले.

स्वामी जावयास निघाले.

" धर्मा, थोडें पाणी असलें तर दे रे. मला तहान लागली आहे. " स्वामी म्हणाले.

" पण कशांत देऊं पाणी ? " मुलानें विचारलें.

" त्या नारळाच्या आईत. मला करवंटी फार आवडते. करंट्या लोकांना ती आवडत नाहीं, " स्वामी म्हणाले.

धर्मानें पाणी आणलें. स्वामी पाणी प्याले व निघाले.

" मी येऊं थोडा तुमच्याबरोबर ? " धर्मानें विचारलें.

" चल, येत असलास तर, " स्वामी म्हणाले.

धर्मा व स्वामी बोलत बोलत जात होते.

" मी तुमचा हात धरूं ? " धर्मानें विचारलें.

" धर, " स्वामी म्हणाले.

धर्मानें स्वामींचा हात हातांत घेतला.

" तुमचा हात किती कढत आहे, " धर्मा म्हणाला.

" माझ्या हातांत प्रेमाची ऊब आहे, " स्वामी म्हणाले.

" ताप तर नाहीं आला ? " मुलानें विचारलें.

" धर्मा ! आम्हांला ताप कशाला येईल ? तुम्हां गरिबांना ताप, " स्वामी म्हणाले.

" तुम्ही गरीबच आहांत. तुम्ही श्रीमंत असतेत तर आमच्याकडे कशाला येतेत ? करटींतून पाणी कशाला पितेत ? " धर्मा म्हणाला.

" धर्मा, आतां तूं घरीं जा. काळोख पडूं लागला आहे. मी झपझप जाईन. " स्वामी म्हणाले.

" वंदे मातरम्, " मुलगा म्हणाला.

" तुला रे काय माहीत हा शब्द ? " स्वामींनीं विचारलें.

" त्या दिवशींचा मुलांचा तो जयजयकार मीं ऐकला होता. गांवांतील मुलेंही एकमेकांना ' वंदे मातरम्, वंदे भ्रातरम् ' करतात, " धर्मा म्हणाला.

" म्हण तर मग वंदे मातरम्. आपण दोघे एकदम म्हणूं. " स्वामी म्हणाले.

एकदम वंदे मातरम् मंत्र म्हणण्यांत आला. धर्मा गेला व स्वामी झपाट्यानें चालूं लागले. परंतु ते दमले. थकले. त्यांना ग्लानी वाटूं लागली. कढत कढत श्वासोच्छ्वास होऊं लागला. शेवटीं ते एके ठिकाणीं बसले. त्यांना पूर्वींचा असाच एक अनुभव आठवला. त्या अनुभवाच्या स्मृतींत असतांनाच स्वामी तेथें मूर्च्छा येऊन पडले.

शाळेंतून नामदेव, रघुनाथ छात्रालयांत आले. परंतु त्यांना स्वामी दिसत ना. स्वामींचा खिन्न चेहेरा त्यांच्या सारखा डोळ्यांसमोर होता. शाळेंत त्यांची त्यांना आठवण येत होती. स्वामींचा पत्ता लागेना. कदाचित् फिरायला गेले असतील असें मनांत येऊन नामदेव व रघुनाथ निघाले. ते दोघे मारवडच्या रस्त्याला गेले. झप झप पावलें टाकीत होते. हरवलेलें रत्न पाहाण्यासाठीं ते धडफडत होते. त्यांचे पाय पळूं लागले, धावूं लागले. हृदय व प्राण तर शरीराच्या पुढें पळत होते. मनाच्या गतीबरोबर हा मातीचा गोळा टिकेना. पाय भरभर वाऱ्यासारखे जात नाहींत म्हणून त्या दोघांना पायांचा राग येत होता.

थंडगार वारा वाहात होता. स्वामींना वाऱ्यानें शुद्ध आली. पुन: ते उठले. कसेतरी चालत होते. तों समोरून नामदेव व रघुनाथ आले.

" स्वामी, स्वामी, " दोघांनीं शब्द उच्चारला.

"यशवंत गेला, तुम्हीही जाणार का? तुम्हीही जाणार असाल तर कशाला इकडे आलांत? मी एकटा आहें तोच बरा," स्वामी म्हणाले.

"तुम्हांला न्यायला आम्ही आलों आहोंत," नामदेवानें हात धरला.

"रघुनाथ, अरे हात पाहा किती कढत," तो म्हणाला.

"खरेंच," रघुनाथनें दुसरा हात हातांत घेऊन म्हटलें.

"आपण छात्रालयाची गाडी आणली असती तर किती छान झालें असतें!" नामदेव म्हणाला.

"मी जाऊन आणूं कां? तूं येथें थांब. इतके चालण्याचे श्रम त्यांना सहन होणार नाहींत," रघुनाथ म्हणाला.

"पण वाऱ्यासारखा पळत जा व विजेसारखा ये," नामदेव म्हणाला.

रघुनाथ हरणासारखा पळत गेला. नामदेव तेथें बसला. त्यानें स्वामींचें डोकें आपल्या मांडीवर घेतलें होतें. त्या तप्त डोक्यावर तो आपले शीतल हात ठेवीत होता. स्वामी डोळे मिटून पडले होते.

"नामदेव! एकादें गाणें गा," स्वामी हळूच म्हणाले.

प्रेमळ नामदेव गाणें गुणगुणूं लागला.

**"दुःख मला जें मला ठावें"**

**मदश्रूंचा ना**<br>**अर्थ कळे त्यां**<br>**आंत जळून मीं सदा जावें ॥ दुःख ॥**

**वरिवरि हसतों**<br>**अंतरिं रडतों**<br>**घोर निराशा मला चावे ॥ दुःख ॥**

**माता सुखवूं**<br>**बंधु हसवूं**<br>**वदुन असें ना कुणी धांवे ॥ दुःख ॥**

**सारे जातील**<br>**कोणी न उरतील**<br>**प्रभुजी कुणावर विसंबावें ॥ दुःख ॥**

गाणें संपलें. नामदेवाच्या मांडीवर स्वामींच्या डोळ्यांतील पाणी पडलें. नामदेवाच्या डोळ्यांतील पाणी स्वामींच्या मस्तकावर पडलें.

"नामदेव ! माझें दुःख तुला माहीत आहे. एकाला तरी माहीत आहे. पुष्कळ झालें. माझी वेदना समजणारा एक जरी मुलगा निघाला तरी मी पुष्कळच मिळविलें," स्वामी सकंप वाणीनें म्हणाले.

घणघणत, झणझणत गाडी आली.

स्वामी उठले. गाडींत गादी घातली होती. गादीवर घोंगडी होती. उशाला तक्क्या होता. रघुनाथ गाडी हांकत होता. बैल पळत होते.

"रघुनाथ, जरा गाडी हळू हांक. हिसके फार बसतात," नामदेव म्हणाला.

"गाडी धीरे धीरे हांक ! बाबा धीरे धीरे हांक," स्वामी म्हणाले.

"तें गाणें मीं तुमच्याजवळून उतरून घेतलें होतें, परंतु पाठ केलें नाहीं. वेणूलाही तें गाणें येत आहे," रघुनाथ म्हणाला.

"तूं वेणूला तीं पुस्तकें मग नेऊन दिलीं होतींस का ?" स्वामींनीं विचारलें.

"हो. तिला फार आवडलीं," रघुनाथ म्हणाला.

"वेणू कोण रे रघुनाथ ?" नामदेवानें विचारलें.

"अरे, ह्या रघुनाथची बहीण. मोठी तरतरीत व हुशार मुलगी आहे. तिच्यांतील पाणी कांहीं निराळेंच आहे," स्वामी म्हणाले.

"गोपाळराव दारांतच असतील !" रघुनाथ म्हणाला.

"तुम्ही उगीच सर्वांना घाबरवतां," स्वामी म्हणाले.

"तुमच्या अंगांत खरेंच बराच ताप आहे. एवढ्या तापांत तुम्ही कसे येत होतेत ?" नामदेवानें विचारलें.

"अंगांत ताप असतांना मजूर कामें करतात ! कोट्यवधि कुटुंबांतून जी तपश्चर्या चालली आहे, ती कोठें आपणांस माहीत आहे !" स्वामी म्हणाले.

"तुमचें कपाळ चेपूं ? दुखतें का ?" नामदेवानें विचारलें.

"तुझा हात नुसता माझ्या कपाळावर ठेव," स्वामी म्हणाले.

"माझा हात थंड असतो. घरीं रायबासुद्धां मी सुट्टींत गेलों म्हणजे मला म्हणतात, 'नाम्या, ठेव रे तुझा हात माझ्या कपाळावर," नामदेव म्हणाला,

"तूं सर्वांची आग शांत करणारा आहेस. भारतमातेची आग शांत करशील," स्वामी म्हणाले.

" परंतु बर्फ थंड असला तरी त्याचा परिणाम उष्ण असतो म्हणतात. जसें असतें तसें नसतें, " नामदेव म्हणाला.

" आपण मंगलच चिंतावें. सदिच्छा वाढवावी. स्वतःचा अपमान. आत्म्याचा अपमान कां करावा ? " स्वामी म्हणाले.

छात्रालयांतील दिवे दिसूं लागले. गाडीचा आवाज ऐकून मुलें दरवाजा-जवळ आलीं. स्वामींच्या खोलीशीं गाडी थांबली. खोलींत गोपाळरावांनीं स्वच्छ अंथरुण घातलें होतें. उदबत्ती लावलेली होती. रामाच्या तसबिरीला फुलाचा हार घातलेला होता. प्रसन्न होतें वातावरण ! स्वामी अंथरुणावर पडले.

" आतां तुम्ही सारे जा; मी शांत पडून राहातों, " स्वामी म्हणाले.

" ताक, दूध कांहीं हवें ? " गोपाळरावांनीं विचारलें.

" आज कांहीं नको, " ते म्हणाले.

" ताप किती आहे पाहूं ? नामदेव, तापनळी घेऊन ये रे, " गोपाळराव म्हणाले. तापनळी नामदेव घेऊन आला. स्वामींनीं ती लावून पाहिली.

" किती आहे ताप ? " स्वामींनीं विचारलें.

" १०३° " नामदेव म्हणाला.

" बराच आहे, " गोपाळराव म्हणाले.

" साधा ताप आहे. कपाळ दुखत नाहीं. कांहीं नाहीं. सकाळला मी मोकळा होईन. जा आतां सारे. नामदेव, रघुनाथ, तुम्हांला अद्याप जेवायचें आहे. जा, अभ्यास करा. येथें विहिरीच्या पाण्याचा तांब्या भरून ठेवा म्हणजे झालें, " स्वामी म्हणाले.

सारे निघून गेले. स्वामी पडून राहिले. ते रामराम म्हणत होते. मध्येंच त्यांचा डोळा लागे, झांपड येई, पुन्हा जागे होत. दहाचें बिगूल झालें.

" स्वामी, कसें काय वाटतें ? " गोपाळरावांनीं विचारलें.

" बरें वाटतें. तुम्ही आतां झोपा, " स्वामींनीं सांगितलें.

गोपाळराव गेले. मुलें निजलीं कीं नाहीं तें पाहात पाहात गेले.

सारीं मुलें झोपलीं. सर्वत्र स्तब्धता होती. स्वामी अंथरुणावर जागे होते. नाना विचार त्यांच्या डोक्यांत घोळत होते. विचारांची वेदना सहन झाली नाहीं म्हणजे ते रामराम म्हणत. अभंग गुणगुणत.

ते पाहा नामदेव व रघुनाथ दोघे येत आहेत. स्वामींच्या खोलीचें दार उघडलें गेलें.

" कोण ? गोपाळराव ? " स्वामींनीं विचारलें.

" आम्ही आहोंत, " ते मुलगे म्हणाले.

" तुम्ही अद्याप झोपलां नाहींत ? बिगूल झालें ना ? जा झोपा. शिस्त पाळली पाहिजे, " स्वामी म्हणाले.

" तुमचे जरा पाय चेपूं ? " नामदेवानें विचारलें.

" म्हणजे तुम्हांला झोप लागेल, " रघुनाथ म्हणाला.

" नको, माझे पाय चेपायला नकोत ; तुम्ही जा, " स्वामी म्हणाले.

ते दोघे मुलगे निघून गेले. स्वामींना ज्यामुळें वाईट वाटेल तें कां म्हणून करा ? त्यांचें समाधान, त्यांतच आपलें समाधान ! असें म्हणत ते गेले. दोघे विचार करीत करीत अंथरुणावर पडले.

पहाटेच्या वेळेला स्वामींचा जरा डोळा लागला होता. नामदेव त्यांच्या खोलींत येऊन गेला. तो हळूच आला व हळूच गेला. मुलांची प्रार्थना झाली. गोपाळराव स्वामींच्या खोलींत आले. तों स्वामी अंथरुणावर बसलेले होते. ते प्रार्थना म्हणत होते. गोपाळराव तेथेंच उभे होते. स्वामींनीं डोळे उघडले.

" कसें काय वाटतें ? " गोपाळरावांनीं विचारलें.

" जरा बरें वाटतें, हुशारी वाटते आहे, " स्वामी म्हणाले.

" ताप किती आहे पाहा, " गोपाळरावांनीं सांगितलें.

स्वामींनीं तापनळी लावून पाहिली. १०२° ताप होता. ताप उतरला नव्हता.

" डॉक्टरला बोलावूं का, " गोपाळरावांनीं विचारलें.

" आजच नको, " स्वामी म्हणाले.

" वेळींच आणलेला बरा, " गोपाळराव पुन्हा म्हणाले.

" तुम्हांला बरें दिसेल तसें करा. मी तुमच्या हातांतील आहें. तुमच्या संस्थेंत असेपर्यंत तुमच्या स्वाधीन मी आहें, " स्वामी म्हणाले.

" पण येथून तुम्ही जाऊंच नका, " गोपाळराव म्हणाले.

" आणि बोलावणें आलें तर, " स्वामींनीं विचारलें.

" बोलावणें इतक्यांत येणार नाहीं, " गोपाळरावांनीं सांगितलें.

" कोणाचें बोलावणें तुम्ही समजलेत ? " स्वामींनीं हसून प्रश्न केला.

" देवाघरचें, होय ना ? "

" नाहीं, भारतमातेचें. देश केव्हां पेटेल ह्याचा नेम नाहीं. महात्माजी केव्हां रणशिंग फुंकतील तें सांगतां येणार नाहीं, " स्वामी म्हणाले.

" तें पाहातां येईल पुढें. देशाची व देवाची हाक आमच्या हाकेपेक्षां थोर आहे. तोंपर्यंत तर येथें राहा. देशाची हाक दुसऱ्यांच्याही कानांत घुसेल, हृदयांत शिरेल असें करा. मग मी डॉक्टर आणतोंच, " असें म्हणून गोपाळराव गेले. त्यांनीं एका मुलाला सायकलवरून डॉक्टरांकडे पाठविलें.

नामदेव आला.

" तुम्हीं तोंड धुतलेंत ? " त्यानें विचारलें.

" नाहीं. धुतों, मी बाहेरच जाऊन धुतों. तूं माझ्याबरोबर अस म्हणजे झालें, " असें म्हणून ते उठले.

बाहेर येऊन त्यांनीं तोंड धुतलें. स्वच्छ पुसलें. नामदेवाचा हात धरून ते खोलींत आले व अंथरुणावर पडून राहिले.

" नामदेव, येथेंच वाचीत बैस. तुझा वेळ नको गमावूं. आजचें दैनिक बंद ! कितीतरी दिवसांत दैनिकाला खंड पडला, " स्वामी खेदानें म्हणाले.

" रघुनाथनें दैनिक लिहिलें आहे. पहाटे उठून त्यानें लिहिलें, " नामदेव म्हणाला.

" खरेंच ? जा घेऊन ये. मला पाहूं दे, " स्वामी आनंदानें म्हणाले.

नामदेव वाचनालयांतून अंक घेऊन आला. स्वामींनीं तो पाहिला. सारा अंक त्यांनीं वाचून काढिला. त्यांना कृतार्थ वाटलें.

" सुरेख लिहिलें आहे. जणुं मींच लिहिल्यासारखें वाटत आहे, " स्वामी म्हणाले.

" आम्ही तुमचेच आहोंत, " नामदेव म्हणाला.

" आपण भारतमातेचे आहोंत. कोट्यवधि कष्टी बंधुभगिनींचे आहोंत, " स्वामी म्हणाले.

डॉक्टर आले. ताप वाढत होता. डॉक्टरांनीं तपासलें. डोक्यावर बर्फाची पिशवी धरण्यास त्यांनीं सांगितलें. उठूं देऊं नका असेंही त्यांनीं बजाविलें. डॉक्टर गेले. औषधोपचार सुरू झाले. पाळीपाळीनें मुलें तेथें बसत होतीं. दिवस गेला. दिवे लागले. छात्रालयांतील जेवणें झालीं. मुलें आपापल्या खोल्यांतून

अभ्यास करीत होतीं. रात्रीं स्वामींजवळ कोणीं बसावयाचें त्याच्या पाळ्या ठरविण्यांत आल्या.

गोपाळरावांनीं स्वामींना थोडा मोसंब्याचा रस दिला. थोडा वेळ तेथें ते बसले व मग निघून गेले. मुलांच्या खोल्यांतून ते हिंडले. स्वामींच्याजवळ नामदेव व रघुनाथ बसले होते. ते त्यांचे पाय चेपीत होते. हिंदुस्थानभर ते पाय भटकले होते. त्या पायांना विश्रांति माहीत नव्हती. ते पाय चुरतांना त्या दोन मुलांचीं मनें भरून आलीं होतीं. ते पाय हृदयाशीं धरावे, अश्रूंनीं न्हाणाव असें त्यांना वाटत होतें.

हें काय ? एकदम स्वामीजी रडूं लागले.

" काय होतें ? " मुलें विचारूं लागलीं.

काय बोलणार ? तो भरलेला सागर काय उत्तर देणार ?

" अरे नामदेव, माझी सेवा करतां, परंतु गरिबांची सेवा करावयास कोण जाईल ? त्या दिवशींची ती धर्माची स्थिति माझ्या डोळ्यांसमोर येत आहे. कोण आहे त्यांची काळजी घ्यायला ? ना दवा, ना हवा. ना मोसंबें ना डाळिंब. ना अंथरुण ना पांघरुण. ना डोकें चेपायला कुणी, ना पाय दाबायला कुणी. तुम्हीं माझ्यासाठीं गाद्या पसरल्या, डॉक्टर आणलेत, धावाधाव केलीत. त्यांच्यासाठीं कोण ? कोण त्यांचे डोळे पुशील, कोण त्यांची चौकशी करील ? कोण गोड बोलेल, कोण गोड हसेल ? नामदेव, मी रडूं नको तर काय करूं ? कोट्यवधि लोकांची पशूंहून हीन स्थिति आपण केली आहे आणि पुन्हा संस्कृतीच्या गप्पा मारतात ! बेशरम लोक ! तोंडानें ' सर्वेऽत्र सुखिनः सन्तु । सर्वे सन्तु निरामयः ॥ ' असें पुटपुटतात व हातांनीं दगड मारतात, पायांनीं लाथा मारतात ! दांभिक बगळे बेटे ! लाखों मुलांचीं सुकलेलीं तोंडें, त्यांच्या हातापायांच्या काड्या, त्यांच्या भुकेसाठीं किंकाळ्या मला ऐकूं येत आहेत आणि मी हीं मोसंबीं खाऊं ? कोल्हाकुत्रा बरा, अशी हरिजनांची स्थिति आहे, अशी मजुरांची दशा आहे. मला हें नाहीं सहन होत ! "

स्वामी जरा शांत झाले. त्यांनीं डोळे पुसले. त्यांना लाज वाटली. ते गंभीर झाले. अंथरुणावर शांत पडून राहिले. थोड्या वेळान पुन्हा म्हणाले, " नामदेव, रघुनाथ, तुम्ही पुढें देशाच्या कामाला वाहून घ्या. पेटवा खानदेश, उठवा खानदेश. मी तुमच्या आशेवर जगत आहें. तुम्हीं मला येथें धरून ठेविलें आहे.

महाराष्ट्रांत मला कुठेंही आशा दिसत नव्हती. निराशेनें मी झगडत होतों, भटकत होतों. थोडी फार जिवंत जागा येथें मिळाली. मऊ जागा मिळाली. येथें मला नवजीवन मिळालें. तुमच्यासारखीं सोन्यासारखीं भावगंभीर मुलें येथें पाहून मी मनांत मनोरथांचे मनोरे बांधूं लागलों. तुम्ही माझे पाय, तुम्ही माझे हात, तुम्ही माझें हृदय, तुम्ही माझे प्राण, तुम्ही माझी आशा, तुम्ही माझें सारें कांहीं. मारुतीच्या हृदयांत प्रभु रामचंद्र होते, म्हणून मारुति जगत होता. माझ्या हृदयांत तुम्हांला कोण दिसेल ? माझ्या हृदयांत मध्यभागीं तुम्हांला भारतमाता दिसेल. तिच्याभोवतीं नामदेव, रघुनाथ, यशवंत, मुकुंद, किसन, जनार्दन, राम, राजा, सुभान, रामदास सारे बसलेले आहेत. आपलीं जीवनफुलें भारतमातेला ते वाहात आहेत. मला हें दिसत आहे. तुम्ही जर मला दगा द्याल, तर माझें हृदय शतभंग होईल. मुळें तोडलेल्या तरूप्रमाणें मी उन्मळून पडेन." असें म्हणून स्वामींनीं नामदेव व रघुनाथ ह्यांचे हात हातांत घेतले. त्यांनीं त्या दोन्ही मुलांचे हात हृदयावर ठेवले.

"पाहा, माझ्या हृदयांतील आईभोवतीं जमलेलीं मुलें पाहा," असें ते पुन्हा म्हणाले व ते हात जणुं हृदयांत घुसवूं लागले. ते दोघे तरुण रडूं लागले. त्या तिघांच्या अश्रूंत नवभारताचा जन्म होता, नवखानदेशाचा जन्म होता. त्या तिघांच्या अश्रूंतून कर्तव्याचें व सेवेचें कमळपुष्प फुलावयाचें होतें.

इतक्यांत गोपाळराव आले. ते म्हणाले, "रघुनाथ, नामदेव, तुम्ही आतां जा. तुम्ही निजा. तुमच्या परीक्षा आहेत. जा हो."

नामदेव म्हणाला, "आम्हांला सेवा करूं दे. आमचें अभ्यासांत थोडेंच लक्ष लागणार आहे ? आम्हांला नाहीं म्हणूं नका."

परंतु स्वामीजीच त्यांना म्हणाले, "रघुनाथ, नामदेव, तुम्ही जा. एकसारखें तुम्हीच श्रमणें योग्य नाहीं. आपणांस सहकार्य शिकावयाचें आहे. तुम्ही जा. दुसरीं दोन मुलें येऊन बसतील."

नामदेव व रघुनाथ जड अंतःकरणानें निघून गेले. हातांत हात घालून ते गेले. छात्रालयाच्या गच्चीवर ते गेले व त्या दोघांनीं एकदम एकमेकांस मिठी मारली. परस्परांस मिठी मारून ते रडले. ते एकमेकांच्या हृदयांतील विचार एकमेकांस देत होते का ? ते भावी सेवेचा निश्चय करीत होते का ? ते भावी सेवेचा संकल्प आकाशांतील अनंत ताऱ्यांना साक्षी ठेवून त्या अश्रुजलानें

सोडीत होते का? त्या त्यांच्या मीलनांत भविष्यकाळाचें बीज होतें. भावी मनोरथांच्या लहान लहान कळ्या जन्मल्या होत्या. ते दोघे आपापल्या खोलींत गेले व वाचीत बसले.

रघुनाथ रोज दैनिक लिही. स्वामींची परंपरा तो पुढें चालवीत होता. परंपरा चालविणें कठीण आहे. इंग्लंडमध्यें चारशें-चारशें वर्षें चालत असलेल्या संस्था आहेत. आपल्याकडेही आहेत, परंतु त्यांत तेज नाहीं. शंकराचार्यांची गादी अकराशें वर्षें चालू आहे. परंतु हे गादीबहादूर शंकराचार्य समाजाची सेवा करतील तर शपथ! जगांतील ज्ञान किंवा अद्वैतज्ञान अनुभवतील तर शपथ! समर्थांची गादी चाललेली आहे. परंतु ज्या समर्थांनीं स्वराज्याला पूजिलें, त्यांच्याच गादीवरचे महाराज काय दिवे लावीत आहेत? नामदार गोखले ह्यांची परंपरा कितीशी पुढें चालली! करबंदीची चळवळ सुद्धां न्याय्य आहे असें नामदार गोखले १९०५ मध्येंच म्हणाले होते. हिंदुस्थानांतील आयाबहिणींवर लाठीमार होत असतां त्या गोखल्यांनीं काय केलें असतें? लोकमान्य टिळकांनीं राष्ट्र त्यागानें तळपत आहे असें पाहून काय केलें असतें? परंतु अनुयायी जे असतात, ते आपल्या गुरूच्या ध्येयाची वाढ करीत नाहींत. भारतसेवकसमाजानें नामदार गोखल्यांना ४९ वर्षांचेंच ठेवलें आहे. एक हजार लोक द्या, मी बंड पुकारतों असें म्हणणाऱ्या लोकमान्यांना लोकशाही पक्षाच्या क्षुद्र पोतडींत त्यांच्या अनुयायांनीं डांबून ठेविलें आहे.

स्वामीजी अशा गोष्टी मुलांजवळ नेहमीं बोलत असत. रघुनाथानें ते शब्द लक्षांत ठेवले होते. रघुनाथ सुंदर लिही. नामदेव, मुकुंदा त्याला मदत करीत. भावी संपादकाची तालीम रघुनाथ घेत होता. स्वामींच्या प्रकृतीबद्दल यशवंताचें आलेलें पत्र दैनिकांत आलें होतें. तें स्वामींना वाचून दाखविण्यांत आलें. दैनिकांतील आवेश, सरलता व सहृदयता पाहून स्वामींस परमानंद होई.

स्वामींच्या दुखण्याचा पाय मागें पडेना. ते आतां वातांतच राहात. 'तीं पाहा हरिजनांचीं मुलें. ये, हरणे ये. तुला गाणें शिकवतों. अस्पृश्यांच्या मुली. देवता आहेत त्या,' असें बडबडत. मध्येंच एकदम उठून म्हणत, 'चला आपण आश्रम काढूं, वर्तमानपत्र काढूं. नामदेव, चाललास कुठें? वडील बोलावतात? बोलावूं दे. भारतमाता बोलावीत आहे. तोड घरचे बंध. काय,

येत नाहींस? तुला खेंचून नेईन.' असेंच सारखें चाले. त्यांना दोघे चौघे धरून ठेवीत.

ते शब्द ऐकतांना एखादे वेळेस नामदेव जवळ असे. नामदेवाचें हृदय खालींवर येई. 'आपले वडील आपणांस अडथळा करतील, हें का स्वामींना दिसत आहे? किती बरोबर त्यांनीं ओळखलें. बंधन तोडून टाक! स्वामी, कसें तोडवेल हें बंधन? ज्या पित्यानें बाळपणापासून तळहाताच्या फोडाप्रमाणें वाढविलें, त्याचा प्रेमबंध कसा मी तोडूं? कोठून येईल ह्या दुबळ्या नामदेवाला तें धैर्य?'

एखादे वेळेस हातांचीं बोटें विचित्र रीतीनें स्वामी फिरवीत असत. भिंतीवर बोटांची सावली पडे, तीच धरीत, पकडीत. मध्येंच हसत व मध्येंच रडत!

दुपारच्या वेळीं गोदूताई शुश्रूषा करीत. मोसंब्यांचा रस, अदमुरें ताक, सारें त्या मनापासून करीत. नामदेव स्वामींचे कपडे धुवी. त्यांच्या अंथरुणावरची चादर वगैरे तो बदली. हलक्या हातानें त्यांच्या अंगांतील काढी व नवें घाली. नामदेव व रघुनाथ कधीं कधीं स्वामींचें अंग स्पंजानें धुवून काढीत. सेवा चालली होती.

तो एकविसावा दिवस होता. आजची रात्र संभाळली पाहिजे असें डॉक्टर म्हणाले. स्वामींच्या दोहों बाजूंस नामदेव व रघुनाथ बसले होते.

'नामदेव, रघुनाथ, सेवेच्या शपथा घ्या. तरच मी जगेन. काय? नाहीं घेववत शपथा? घरचे मोह नाहीं सोडवत, नाहीं मोडवत? मग मी कशाला जगूं? तुम्ही तर माझे प्राण. तुम्ही माझ्याबरोबर येणार नसाल तर कशाला मी जगूं?'

स्वामींचे शब्द त्या दोघा तरुणांच्या हृदयांना विरघळवीत होते. त्यांनीं एकमेकांकडे पाहिलें. दोघांनीं परस्परांचे हात हातांत घेतले. स्वामींच्या खालींवर होणाऱ्या छातीवर ते हात त्यांनीं ठेविले. नामदेव व रघुनाथ ह्यांनीं स्वामींच्या हृदयाला साक्षी ठेवून सेवेला जीवनें देण्याचा संकल्प सोडला. त्या मध्यरात्रीं त्या संकल्पाचा त्यांनीं उच्चार केला, 'देवा, आमचीं जीवनें आम्ही सेवेस देऊं. आमचे स्वामी आम्हांस दे. आमचे प्राण ते व त्यांचे आम्ही प्राण!'

पहाटेची वेळ होत आली. स्वामींच्या अंगाला एकदम घाम सुटला. ताप उतरणार! परंतु ताप फारच कमी झाला तर? तरीही थंडगारच होणार!

नामदेव व रघुनाथ घाबरले. गोपाळराव उठले. गोदूताईनीं कौलावर सुंठ घासून दिली. ती सुंठ अंगाला, पायाला चोळण्यांत येत होती. पुन्हा पुन्हा घाम येत होता. घाम पुसून सुंठ लावण्यांत येत होती. स्वामींना शतपाझर फुटले होते. जणुं हिमालय झिरपत होता. त्या तरुणांच्या निश्चयानें स्वामीजी पाझरले. त्यांचा ताप हटला, संताप संपला.

थोडी गरम गरम कॉफी स्वामींस देण्यांत आली. स्वामीजी शांत पडून राहिले. इतक्यांत छात्रालयाचें प्रार्थनेचें बिगुल वाजलें. स्वामीजी एकदम उठले व म्हणाले,

"प्रार्थना!"

"पडून राहा हां. उठायचें नाहीं," नामदेव म्हणाला.

"परंतु तुम्ही प्रार्थनेला जा," स्वामी म्हणाले.

स्वामी शुद्धीवर आले. ताप मर्यादित झाला. नामदेव व रघुनाथ ओथंबलेल्या हृदयानें प्रार्थनामंदिरांत गेले. नामदेवानें आज प्रार्थना सांगितली.

**'हे जगत्राता विश्वविधाता हे सुखशांतिनिकेतन हे ॥'**

हें पद नामदेव म्हणाला. प्रार्थना संपल्यावर नामदेव मुलांना म्हणाला,

"स्वामीजी शुद्धीवर आले आहेत."

स्वामीजी बरे होऊं लागले. हळुहळू ताप थांबला. त्यांना फार अशक्तता आली होती. हिंडण्याफिरण्याची, उठण्याबसण्याची अद्याप परवानगी नव्हती. ते चालतांना थरथरत. नामदेव व रघुनाथ त्यांना हात धरून चालवीत.

**'जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती ।**
**चालविशी हातीं धरूनियां ॥'**

हा अभंग स्वामीजी हसत हसत म्हणत व नामदेव व रघुनाथ लाजत. सायंकाळीं शाळा सुटली म्हणजे दोघे मित्र स्वामींजवळ येऊन बसत.

एके दिवशीं बोलतां बोलतां स्वामी म्हणाले, "नामदेव, मला माझ्या विकारांशीं किती झगडावें लागलें आहे! हल्लीं माझ्या तोंडावर जें हास्य असतें तें मुलांना आवडतें. 'स्वामी, तुम्ही कसे गोड हसतां,' असें लोक म्हणतात. परंतु तें हास्य लाभावें म्हणून मी किती रडलों आहें! एक फूल फुलावें म्हणून झाड रात्रंदिवस धडपडत असतें. त्याचीं मुळें खालीं भूगर्भात अंधारांत चांचपडत असतात! ओलावा शोधीत असतात. लोकांना तें गोड फुललेलें फूल दिसतें. परंतु वर्षानुवर्षे

अविरत केलेली धडपड दिसत नाहीं! नामदेव, रामतीर्थांनीं एके ठिकाणीं लिहिलें आहे, 'पावित्र्य ही सर्वांत महत्त्वाची वस्तु होय! पावित्र्याचा कायदा पाळला गेलाच पाहिजे. ज्याला आपले विचार ताब्यांत घेतां येत नाहींत, त्यानें मरून जावें!' मला वाटे कीं आपण मरावें. मी आगगाडीच्या रुळावर पडून राहावें. परंतु आगगाडीचा जवळजवळ आवाज आला कीं हें शरीर उठे! मी विहिरीच्या कांठीं जात असें व डोकावत असें! परंतु उडी घेण्यास धीर होत नसे. जीवनाची आसक्ति कोठें सुटली होती? मी मरूं इच्छित होतों, परंतु देव जगवूं पाहात होता. नामदेव, एक वाक्य लक्षांत ठेव; आपलें हृदय आपणांस तुच्छ समजत असेल, परंतु देव नाहीं आपणांस तुच्छ समजत; आपण स्वतःच्या जीवनाला शिव्या देत असूं, परंतु देव नाहीं त्याला शिव्याशाप देत. मी धडपडत होतों. आपण मनानें निर्मळ व स्वच्छ व्हावें ह्यासाठीं मी जितका रडलों आहें, तितका ह्या महाराष्ट्रांत कोण रडला असेल? अरे, प्रत्येक गोष्टीसाठीं आपल्याजवळ अश्रु आहेत. आपण गरीब आहोंत, आपल्याला कोणी नाहीं, आपलें कोणी मेलें, आपला कोणीं अपमान केला, आपणांस अपयश आलें, आपल्यावर टीका आली, आपण परीक्षेंत नापास झालों, तर आपण किती रडतों? ह्या सर्व गोष्टींसाठीं अश्रूंचे हौद डोळ्यांजवळ भरलेले आहेत, परंतु आपण निर्मळ व स्वच्छ व्हावें म्हणून कोण रडतो? दुसऱ्याचे अश्रु आपणांस पुसतां येत नाहींत ह्या तळमळीनें कोण रडतो, कोण धडपडतो? मी रात्रीच्या रात्री आई, आई म्हणत असें. 'ये, माझें घर झाड, ये माझ्या घराचा कबजा घे. येथील सारे कामक्रोध घालव. माझें घर मी तुला लिहून देतों. ये, आई ये,' असें मी म्हणत बसें. वारा सळसळला कीं वाटे तो आला. झाडाचीं पानें हाललीं कीं वाटे तो आला. नामदेव, अशी ही धुमश्चक्री चालायची. परंतु हळुहळू मन शांत होत चाललें. थोडीथोडी प्रसन्नता मिळत चालली! चंद्राची कोर एकदां उगवली म्हणजे ती वाढत जाईलच. एकदां ती कोर दिसूं लागणें हेंच महत्त्वाचें असतें. विकारांच्या वादळांत माझ्या मनश्चंद्राची कोर कित्येक दिवस मला दिसत नव्हती! कित्येक वर्षें मला दिसत नव्हती! परंतु एकदां दिसली लहानशी! नामदेव, भगवान् शंकराच्या डोक्यांतून निर्मळ विचारांची गंगा वाहाते व शीलाचा चंद्र तेथें मिरवत असतो! कारण संयमाचा तिसरा डोळा त्याच्याजवळ असतो! अपवित्र भाव जवळ येऊं लागतांच संयमाचा प्रखर असा तृतीय नेत्र ते उघडतात व

त्या विचारांचें भस्म करतात! आणि होळींतलें तें भस्म मग अंगाला लावतात. विलायती मालाची होळी करून यशवंतानें त्या दिवशीं ती राख कपाळाला लावली होती! परंतु दुसरीं विलायती वस्त्रें आपल्याजवळ किती तरी आहेत! आत्म्याच्या मांगल्याला, दिव्यतेला, पावनत्वाला, सत्यंशिवंसुंदरत्वाला न शोभणारीं अशीं वासनाविकारांचीं विदेशी वस्त्रें आत्म्याच्या राजधानींत शिरत असतात! मन, बुद्धि, हृदय ह्यांना बाटवीत असतात! हीं कोण जाळतो, कोण फेंकतो?

"स्वतःशीं कठोर व्हावें लागतें. दया दुसऱ्याच्या दोषांसाठीं व क्रोध स्वतःच्या दोषांसाठीं आपणांजवळ आहे. नामदेव, प्रयत्न करावेत. धडपड करावी. धणे असतात ना? ते पेरण्यापूर्वी चुरडावे लागतात! जगन्नाथपुरीला जगन्नाथाच्या रथाखालीं जो चुरडला जाईल तो उद्धरला जाईल असें म्हणतात! हसण्यापूर्वी रडावें लागतें, उठण्यासाठीं पडावें लागतें. अमर अत्तर निघावें म्हणून फुलांना आधणांत उकळून घ्यावें लागतें. मातीचा पेला ओंठाला लागतो, परंतु आधीं त्याला आगींतून जावें लागतें. लाकडाचा तुकडा तुमचे सुंदर केंस विंचरतो, परंतु तुमच्या डोक्यावर नाचतां यावें म्हणून त्याला करवतून घ्यावें लागलें आहे! टोंचून घेतल्याशिवाय मुरावळा नाहीं! भाजून दळून घेतल्याशिवाय पोळी नाहीं! जमिनींत गाडून घेतल्याशिवाय अंकूर नाहीं! गर्भवासांत राहिल्याशिवाय जन्म नाहीं! नामदेव, सर्वत्र त्यागानें महत्त्व व विकास झाला आहे, कष्टानें तेज चढलें आहे, मोल वाढलें आहे असें तुम्हांस दिसेल.

"सेवा करीत करीत निर्मळ होत जाऊं. 'कर्मणा शुद्धिः' असें म्हणतात. कर्मांमुळे आपले गुणदोष दिसतात. दुसऱ्यांशीं संबंध येईल तेव्हांच आपली शांति, सहनशीलता ह्यांची कसोटी असते. सहनशीलता ही गुणांची कसोटी आहे. अंथरूण उन्हांत टाकलें कीं लपलेले ढेकूण बाहेर पडतात! त्याप्रमाणें हृदयांत दडलेले विकार संसारांत कर्में करूं लागलों म्हणजे प्रगट होतात. एकान्तांतील शांतीची परीक्षा ह्या जगांतील संसारांत येऊन घ्यावी लागते. सकाळ, सायंकाळ प्रार्थना व दिवसा सेवा. प्रार्थनेचा प्रकाश घेऊन दिवस सुरू होऊं दे. प्रार्थनेचा प्रकाश घेऊन झोपीं जाऊं दे. प्रार्थनेचा प्रकाश सदैव आत्म्याभोवतीं फिरत राहो.

" नामदेव, रघुनाथ, किती सांगूं, किती बोलूं ! हें हृदयमंथन आहे. अमृत-सिद्धी होईपर्यंत हें मंथन सुरू ठेवावयाचें. दैवी व आसुरी वृत्ति ह्या हृदयसिंधूचें मंथन करीत असतात. कधीं विष बाहेर पडतें; कधीं मदिरा, कधीं मदिराक्षी; कधीं लक्ष्मी तर कधीं शंख; कधीं कौस्तुभ तर कधीं चाबूक ! परंतु घाबरूं नये. शेवटीं अमृत बाहेर पडेल. मातींतून आपणांस अमरता मिळवावयाची आहे, अंधारांतून प्रकाश मिळवावयाचा आहे, नरकांतून स्वर्ग निर्मावयाचा आहे ! हें मानवी भाग्य आहे ! देवानें मानवाला हें महान् कर्म दिलें आहे ! एक दिवस हें कर्म साधेल. जीवनाची कळी फुलेल, फुलेल ! "

असें म्हणून स्वामींनीं एक गोड अभंग म्हटला.

**संपोनिया निशा, उजळते प्रभा,**
**दिनमणी उभा, नभोभागीं**
**लाखों मुक्या कळ्या, त्या तदा हासती,**
**खुलती डुलती, आनंदानें**
**ऊर्ध्वमुख होती, देव पाहाताती,**
**गंधधूपारती, ओंवाळीती**
**तैसें माझें मन, येतांचि प्रकाश,**
**पावेल विकास, अभिनव**
**तोंवरि तोंवरि, अंधारीं राहीन,**
**दिन हे नेईन, आयुष्याचे**
**जीवनाची कळी, फुले केव्हां तरी**
**आशा ही अंतरीं, बाळगीतों**

सूर्य मावळत होता. पांखरें घरट्यांत जात होतीं, इतरांना 'चला, चला' हाका मारीत होतीं. क्रीडांगणावर मुलें हसत होतीं, खेळत होतीं. विहिरीला हल्या जोडण्यांत आला. म्हशींचीं दुधें छात्रालयाचे गडी काढूं लागले. नामदेव व रघुनाथ स्वामींजवळ आहेत. दूध पीत आहेत, अमृत पीत आहेत. अभंग म्हणतां म्हणतां स्वामींनीं डोळे मिटले होते. नामदेव व रघुनाथ त्यांच्याकडे पाहात होते. संध्यासमयींचा रक्तिमा खिडकींतून आंत आला होता ! पवित्र प्रकाश तेथें पसरला होता !

छात्रालयाची भोजनघंटा झाली. मुके, परंतु हृदयें भरून आलेले नामदेव व रघुनाथ उठून गेले.

अंथरुणांत पडल्या पडल्या स्वामी वाचीत असत. त्यांचीं आवडतीं पुस्तकें त्यांच्या आजूबाजूला असत. ज्ञानेश्वरी, व्हिटमनचीं तृणपर्णें, गटेचें फौस्ट, मॅझिनीचीं कर्तव्यें तेथें पडलेलीं होतीं. नामदेव व रघुनाथ आले म्हणजे त्यांना चांगले उतारे वाचून दाखवीत. 'नमः पुरस्तात् अथ पृष्ठतस्ते' ह्या गीतेंतील अकराव्या अध्यायांतील श्लोकावरील ओंव्या ते वाचून दाखवीत व तन्मय होत. किंवा नवव्या अध्यायांतील 'महात्मानस्तु मां पार्थ' ह्या श्लोकावरील ओंव्या वाचीत !

एके दिवशीं नामदेवानें विचारलें, "तुमच्या कविता कोठें आहेत ? परवांचा अभंग तुमचाच आहे. होय ना ?

"मीं एका वहींत लिहिल्या आहेत माझ्या कविता. त्या कोठेंही मीं प्रसिद्धीसाठीं पाठविल्या नाहींत. माझ्या पेटींत वही आहे. तुम्हांला पाहायच्या आहेत ? जा. घेऊन ये वही. पेटींत खालीं असेल," स्वामी म्हणाले.

तो पाहा नामदेव पेटी शोधीत आहे. सांपडली वाटतें वही ? होय. तीच ती. नामदेवानें उघडली. स्वच्छ, सुंदर अक्षर. नामदेवानें ती वही हृदयाशीं धरली. तें स्वामींचें हृदय, ते स्वामींचे अश्रु, ती त्यांची धडपड—सारें त्या वहींत होतें. तें सारें जीवन नामदेवानें दोन्ही हातांनीं घट्ट हृदयाशीं धरलें. शेवटीं तो उठला व स्वामींजवळ आला.

"तुम्हीच ह्यांतील कांहीं म्हणून दाखवा," तो त्यांना म्हणाला.

स्वामींनीं कांहीं कविता म्हटल्या.

"तुम्हीं देशावर नाहीं लिहिल्यात कविता ?" रघुनाथनें विचारलें.

"तेथें दुसरी एक वही होती. तिच्यांत त्या आहेत. नामदेव, ती रे कां नाहीं आणलीस ? पेटींत धुंडाळून सारें आणावयाचें होतेंस कीं नाहीं ? संकोच कसला ? मी आणि तुम्ही आतां का निराळे आहोंत ? माझ्या धडपडी तुमच्याच आहेत. माझें सारें तुमचेंच आहे. आपल्या सर्वांच्या जीवनांचा एक संयुक्त प्रवाह होऊन देवाकडे वाहात जाणार आहे. आपल्या सर्वांची धडपड एकत्र व्हावयाची आहे. नाहीं का ? मला तापांतील वातांत दिसे कीं आपण सारे एकत्र धडपडत आहोंत. तुम्ही माझ्याबरोबर धडपडावयास, माझ्याबरोबर हसारडावयास

येणार कीं नाहीं ? दोन तुकडे तापवून एकजीव होतात. मी एकवीस दिवस तापलों. तुम्ही तापले होतेत कीं नाहीं ? ह्या तापांत तापून आपल्या जीवनांचे तुकडे एकत्र, एकजीव झाले कीं नाहींत ?

नामदेव, रघुनाथ, मी आतां तुमच्यापेक्षां निराळा नाहीं. मी कोठेंही गेलों, भेलों, तरी तुमच्यांत आहें. देव हरवला तर भक्तांजवळ शोधावा. स्वामी हरवले तर नामदेव, रघुनाथ, यशवंत ह्यांच्या हृदयांत शोधावेत, ह्यांच्या जीवनांत, ह्यांच्या कृतींत शोधावेत. पृथ्वीचा गंध फुलांतून बाहेर येतो. माझें सारें चांगलें तुमच्यांतून प्रगट होवो. माझ्या सदिच्छा तुम्ही मूर्त करा. नाहीं का ? तुम्ही बोलत कां नाहीं ? आपला तिघांचा त्रिवेणीसंगम झाला आहे नाहीं ? त्रिवेणीसंगम म्हणजे तीर्थराज होय ! ”

नामदेव व रघुनाथ ह्यांना स्वामींचे वातांतील शब्द आठवले; स्वतःची प्रतिज्ञा आठवली; गच्चीमधील तें मिठी मारून रडणें आठवलें. होय, ते दोघे स्वामींत मिळून गेले होते. स्वामी त्यांच्यांत मिळून गेले होते. एकमेकांत मिळून ते पुढें जाणार होते. सारीं धडपडणारीं मुलें ! छोटीं, मोठीं धडपडणारीं मुलें ! हसणारीं, रडणारीं, चढणारीं, पडणारीं मुलें !



## ७

# देवपूर

नामदेव व रघुनाथ मॅट्रिकच्या परीक्षेसाठीं जाणार होते. परीक्षा झाल्यावर नामदेव आपल्या गांवीं गेला असता, रघुनाथ आपल्या गांवीं गेला असता. ते पुन्हा केव्हां एकत्र येणार, केव्हां भेटणार ?

“ नामदेव, माझ्या घरीं येतोस ? आपण दोघे जाऊं. एक दिवस राहूं व येथें परत येऊं. तूं माझी आई पाहाशील, माझीं भावंडें पाहाशील. येशील का ? ” रघुनाथानें एके दिवशीं विचारलें.

“ जाऊं. स्वामींनाही आपण बरोबर घेऊं. त्यांना विचारलें तर ते आनंदानें येतील. विचारायचें का त्यांना ? ” नामदेवानें विचारलें.

" स्वामींना चालण्याचा त्रास होईल. अजून त्यांना इतकी ताकद आली नाहीं. गाडींत बसून ते येणार नाहींत, " रघुनाथ म्हणाला.

" चार कोस तर आहे. येतील स्वामी चालत. आपण बरोबर असलों म्हणजे त्यांना त्रास होणार नाहीं. वासराबरोबर चालतांना गाय थकणार नाहीं व गायीबरोबर चालतांना वासरूं थकणार नाहीं, " नामदेव म्हणाला.

" चल, त्यांना विचारूं, " रघुनाथ म्हणाला.

दोघे मित्र स्वामींच्या खोलींत गेले.

" काय पाहिजे नामदेव ? आतां तुम्ही लौकरच जाणार. उडून जाणार. जुने जाणार, नवे येणार. छात्रालय सदैव आहेच. जुनें पाणी जातें, नवीन येतें. प्रवाह आहे तो आहे. माणसें जन्मतात, मरतात. समाज अमर आहे. कांहींतरी अक्षय व अमर आहेच आहे. नाहीं का ? " स्वामी म्हणाले.

" आम्ही कोठेंही गेलों तरी तुम्हांला विसरणार नाहीं. मनांत तुम्ही जवळच आहांत, " नामदेव म्हणाला.

" आम्ही तुमच्या कामाला येऊन मिळूं. आपण एकत्रच राहूं, " रघुनाथ म्हणाला.

" अभ्यास कसा काय आहे ? नामदेव, आतां लक्ष लागतें का अभ्यासांत ? मन एकाग्र होतें का ? एकाग्रता ही मुख्य वस्तु आहे, सर्व सिद्धीची किल्ली एकाग्रतेंत आहे. आपल्या प्राचीन शिक्षणपद्धतींत एकाग्रतेवर भर असे. हिंदु संस्कृतींत एकाग्रतेला फार महत्त्व दिलें आहे, " स्वामी म्हणाले.

" हो. चित्त लागतें. भटकणाऱ्या चित्ताला ओढून आणून लावतों. पास होईन असें वाटतें, " नामदेवानें सांगितलें.

" अभ्यास सोडून आतां कां आलेत ? " स्वामींनीं विचारलें.

" तुम्हांला एक विचारायला आलों आहोंत, " नामदेव म्हणाला.

" गणित, शास्त्र वगैरे गोपाळरावांना विचारा. कांहीं मराठी इंग्रजी असेल तर मला विचारा, " स्वामी म्हणाले.

" आम्हांला अभ्यासाचें नाहीं विचारावयाचें. दुसरीच एक गंमत आहे, " रघुनाथ म्हणाला.

" विचार लौकर, " स्वामी म्हणाले.

" तुम्ही आमच्याबरोबर याल ? " नामदेवानें विचारलें.

" कोठें ? " स्वामींनीं प्रश्न केला.

" रघुनाथाच्या घरीं. आपण तिघे जाऊं. एक दिवस राहून परत येऊं, " नामदेव म्हणाला.

" जाऊं. केव्हां जायचें ? उद्यांच सकाळीं जाऊं. प्रार्थना झाल्याबरोबर निघूं. परंतु गोपाळरावांची परवानगी घेतलीत का ? " स्वामींनीं विचारलें.

" आमच्या दोघांची परवानगी आम्ही मिळवूं. परंतु तुमची कशी मिळेल ? ते तुम्हांला पायीं येऊं देणार नाहींत, " रघुनाथ म्हणाला.

" मी त्यांची परवानगी मिळवून ठेवीन. " स्वामी म्हणाले.

" तर मग ठरलें हां. " असें म्हणून नामदेव व रघुनाथ गेले.

स्वामी गोपाळरावांकडे गेले. गोपाळराव मुलांचे हिशेब करीत होते.

" चालूं द्या तुमची आंकडेमोड, " स्वामी हसत म्हणाले.

" सारे संत उत्कृष्ट हिशेब करणारे होते. जो हिशेब करीत नाहीं, नीट जमाखर्च ठेवीत नाहीं, त्याला ना संसार, ना परमार्थ, " गोपाळराव म्हणाले.

" रामकृष्ण परमहंस असेंच म्हणत. एकदां एका माणसाला त्यांनीं भाजी आणावयास सांगितली. तो मनुष्य गेला व भाजी घेऊन आला. रामकृष्णांनीं विचारलें, ' काय दिलेंस ? ' तो म्हणाला, ' चार आणे. ' रामकृष्ण रागावले. ' अरे, ही चार पैशांची भाजी आणि चार आणे दिलेस ? हा बावळ्या. तुला व्यवहार समजत नाहीं आणि म्हणे मला साधू व्हायचें आहे ! परमार्थ म्हणजे का बावळटपणा, अजागळपणा समजलास ? परमार्थ म्हणजे मोलाचें नाणें देऊन कचरा पदरांत बांधणें नव्हे. परमार्थ म्हणजे माती देऊन सोनें मिळवावयाचें. हा मातीचा देह देऊन तो सच्चिदानंद मिळवावयाचा ', " स्वामी सांगूं लागले.

" मग तुम्ही घेतां का हें हिशेबाचें काम ? " गोपाळरावांनीं विचारलें.

" हा हिशेब मला नको. मी दुसरे हिशेब व दुसरे जमाखर्च करीतच असतों, " स्वामी म्हणाले.

" कोणते ? " गोपाळरावांनीं विचारलें.

" आयुष्याला चाळीस वर्षें झालीं. चाळीस वर्षें हें दुकान चालविलें. नफातोटा काय झाला, ह्याचा रोज आढावा घेत असतों, " स्वामी म्हणाले.

" आपण मरेपावेतों लाखों कर्में करतों. परंतु ह्या सर्वांचें उत्तर एका शब्दांत द्यावयाचें असतें. नफा कीं तोटा ?" गोपाळराव म्हणाले.

" ज्याप्रमाणें अपूर्णांकाच्या उदाहरणांत मोठमोठे आंकडे दिसतात, परंतु छेद देतां शेवटीं एक किंवा शून्य उत्तर निघतें, तसेंच हें," स्वामी म्हणाले.

" तुम्ही इकडे कोठें आलांत ? जरा प्रसन्न दिसतें आहे तुमचें मन," गोपाळरावांनीं विचारलें.

" पक्षी जरा उडून येणार आहे," स्वामी गंमतीनें म्हणाले.

" उडून परत येवो म्हणजे झालें. नाहीं तर निळें निळें आकाश पाहून जायचा कोठें दूर व मग बसायचा पुन्हा रडत," गोपाळराव म्हणाले.

" जवळच जाणार आहे. धन्याची परवानगी घ्यावयास पक्षी आला आहे." स्वामी म्हणाले.

" माझी अनुज्ञा आहे. परंतु कोठें जाणार ?" गोपाळरावांनीं प्रश्न केला.

" मी रघुनाथाच्या देवपूरला जाऊन येतों," स्वामींनीं सांगितलें.

" आणखी कोण आहे बरोबर ?"

" नामदेव व रघुनाथ."

" पायीं जाणार ?"

" हो."

" पाहा बरें. नाहीं तर थकवा येईल. छात्रालयांची गाडी देऊं ?" गोपाळरावांनीं विचारलें.

" नको. मला गाडी फारशी आवडत नाहीं. पायीं जाण्यांत स्वातंत्र्य आहे. मला उत्साह वाटत आहे. उद्यां प्रातःकाळची प्रार्थना झाली म्हणजे निघूं. म्हणजे फार ऊन होणार नाहीं," स्वामी म्हणाले.

" बरें," असें म्हणून गोपाळराव जमाखर्चाकडे वळले.

स्वामी आपल्या खोलींत गेले.

दुसऱ्या दिवशीं छात्रालयाची प्रभातप्रार्थना झाल्याबरोबर स्वामी, नामदेव व रघुनाथ निघाले. अजून स्वच्छ उजेड पडला नव्हता. झाडांच्या आकृति एकरूप दिसत होत्या.

" अज्ञानांत ऐक्य आहे, अंधारांत ऐक्य आहे, मरणांत ऐक्य आहे," स्वामी म्हणाले.

" प्रकाश म्हणजे पृथक्करण, " नामदेव म्हणाला.

" जीवन म्हणजे विविधता व मरण म्हणजे एकता, " रघुनाथ म्हणाला.

" कोणतें चांगलें ? " स्वामींनीं प्रश्न केला.

" आपणांस समन्वय करावयाचा आहे, " रघुनाथ म्हणाला.

" बुद्धि पृथक्करण करते व हृदय जोडतें, " नामदेव म्हणाला.

" असेंच केवळ म्हणतां येणार नाहीं. हृदय एकाशीं जोडील तर दुसऱ्याशीं तोडील. पृथक्करण करणारी बुद्धीची एक शक्ति आहे. बुद्धीसुद्धा जोडते. माणसें निरनिराळीं दिसलीं तरी त्यांच्यांतील चैतन्य एकच आहे हें बुद्धीच सांगते. बुद्धि ठरविते व हृदय ठरविलेलें जीवनांत मिळवून टाकतें असें नाहीं का ? " स्वामींनीं विचारलें.

" प्रकाश जोडतो, उलट अंधारच तोडतो, " नामदेव एकदम म्हणाला.

" तें कसें काय ? " रघुनाथनें विचारलें.

" अंधारांत चक्रवाक पक्ष्याचें जोडपें वियोगानें ओरडत असतें. प्रकाश येतांच तीं भेटतात. अंधारांत जवळ असूनही आपण भेटत नाहीं. प्रकाशांत दूर असलेले जवळ येतों, " नामदेव म्हणाला.

" प्रत्येक वस्तूचीं हीं दोन स्वरूपें आहेत. तर अंधारही जोडतो व तोडतो. प्रकाशांतही जोडणें व तोडणें आहेच, " स्वामी म्हणाले.

" सृष्टीचें हें स्वरूपच आहे. जन्मणें, मरणें; हसणें, रडणें; येणें, जाणें; असें हें सर्वत्र द्वंद्व आहे, " नामदेव म्हणाला.

" परंतु द्वंद्वांतील म्हणून कांहींतरी असलेंच पाहिजे. द्वंद्वाच्या पाठीमागें जर कोणी नसेल तर हें द्वंद्व कोण अनुभविणार ? हीं सारीं चित्रें कोणत्या फळ्यावर काढावयाचीं ? हीं सारीं फुलें कोणत्या सूत्रांत ओंवावयाचीं ? " रघुनाथ बोलला.

" त्यालाच आत्मतत्त्व म्हणतात. त्या आत्मदेवाच्या समोर हे सारे खेळ चालले आहेत. हीं शोकान्त व सुखान्त नाटकें चाललीं आहेत. " स्वामी म्हणाले.

" तो पक्षी पाहा ! कशी आहे ऐट त्याची ? " नामदेव पक्ष्याकडे पाहात म्हणाला.

" तो निळ्या नभाचा राजा आहे, हिरव्या सृष्टीचा स्वामी आहे, " स्वामी म्हणाले.

" गेला. उडाला. आपल्या आवाजानें भ्याला. सारी सृष्टि भित्री आहे," रघुनाथ म्हणाला.

" हिंसा भित्रीच असते," स्वामी म्हणाले.

" जगांत प्रेमच निर्भय असतें," नामदेव म्हणाला.

" प्रेमामुळें भगवान् बुद्ध निर्भय झाले, प्रेमामुळें भगवान् वसिष्ठ निर्भय झाले. प्रेमामुळें रामतीर्थ सर्वांना वश करून घेत. प्रेम हें महात्माजींचें बळ आहे," स्वामी म्हणाले.

" परंतु जग तर तोफा, तलवारी, बॉंब, बंदुका ह्यांनीं निर्भय होऊं पाहात आहे," रघुनाथ म्हणाला.

" मृगजळांतून जळ मिळविण्याप्रमाणें तें आहे," स्वामी म्हणाले.

" जर्मनी, जपान, इटॅली, फ्रान्स हीं निर्भय राष्ट्रें नाहींत ?" रघुनाथानें प्रश्न केला.

" कोण म्हणतों निर्भय ? सर्वांच्या पोटांत बागबुग होत असतें. अरे, एवढा रानचा राजा सिंह, परंतु तोही सारखें मागें पाहात असतो. आपण सिंहावलोकन शब्दच बनविला आहे. हरणें, हत्ती ह्यांचा संहार करणाऱ्या सिंहाला सारखें वाटत असतें, माझ्यावर हल्ला करावयास नाहीं ना कोणी येत ? जपानला वाटतें रशिया नाहीं ना स्वारी करणार, रशियाला वाटतें, जर्मनी नाहीं ना झडप घालणार ? इंग्लंडला वाटतें इटली आपलें साम्राज्य धुळींत मिळविणार कीं काय ? पांखरांच्या माना सारख्या नाचत असतात. किडे खाणाऱ्या पांखरांना वाटतें मला खायला दुसरें नाहीं ना कोण येत ? सर्वांच्या माना नाचत आहेत. पुढें, मागें होत आहेत. बॉंब, बंदुकांवर हात ठेवून घांस गिळीत आहेत. ह्याला निर्भयपणा म्हणतां येईल ? नामदेव ! जगांत अजून स्वतंत्र कोणीही नाहीं." स्वामींनीं सिद्धान्त मांडला.

" काय ? कोणीही स्वतंत्र नाहीं ?" रघुनाथानें प्रश्न विचारला.

" आम्ही स्वतंत्र राष्ट्रें म्हणून टेंभा तर पुष्कळ राष्ट्रें मिरवितात," नामदेव म्हणाला.

" ज्याला स्वतंत्र व्हावयाचें आहे, तो दुसऱ्याला स्वतंत्र करील. सारे स्वतंत्र झाल्याशिवाय कोणालाही स्वातंत्र्य मिळणार नाहीं. इंग्लंडला वाटत असेल कीं आपण स्वतंत्र आहोंत. परंतु इंग्लंड हिंदुस्थानवर अवलंबून आहे. श्रीमंत हजारों

नोकरांवर विसंबून असतो. हजारों टेके व आधार दिलेले असतात. ते आधार जरा काढा कीं गडगडलें श्रीमंताचें सिंहासन. हिंदुस्थान ईंग्लंडचा गुलाम व ईंग्लंड हिंदुस्थानचा गुलाम. एक विलासी गुलामगिरी व एक दरिद्री गुलामगिरी. परंतु दोन्ही गुलामगिऱ्याच. बेडी सोन्याची काय व लोखंडाची काय बेडी ती बेडीच," स्वामी म्हणाले.

**'सोन्याची लोखंडाची**
**बेडी ती बेडीच साची ॥ बंधनीं ॥**

नामदेवानें चरण म्हटला.

"रामतीर्थांचें हें गाणें आहे," स्वामी म्हणाले.

"ॐतत्सत्‌ची ललकारी," रघुनाथनें खड्या आवाजांत ललकारी मारली.

"होय. ही ललकारी खरें स्वातंत्र्य आणील. मग तें केव्हां यायचें असेल तेव्हां येवो. तोंपर्यंत मानवी समाज धडपडणार. पुन्हा पुन्हा चुका करणार. रणाविण स्वातंत्र्य कोणा मिळालें असेंच म्हणणार," स्वामी म्हणाले.

"मग रणाशिवाय स्वातंत्र्य मिळेल? आजपर्यंत असें इतिहासांत एक तरी उदाहरण दाखवा," रघुनाथ तीव्रतेनें म्हणाला.

"युद्धानें युद्ध थांबल्याचें तरी एक उदाहरण दाखवा. द्वेषानें द्वेष शमल्याचें उदाहरण आहे का? १८७० मध्यें जर्मनीनें फ्रान्सचा नक्षा उतरला. फ्रान्स मनांत तडफडत होता, जळत होता. तलवारींच्या तेजाखालीं तह झाले. शांतीचे तह झाले. परंतु त्या शांतीच्या पोटांत कालकूट होतें. १९१४ मध्यें तें कालकूट बाहेर पडलें. फ्रान्सनें जर्मनीचे लचके तोडले. पुन्हा शांति आली. आतां पुन्हा ती शांति काय करणार आहे तें दिसतच आहे. रामरावणाच्या वेळेपासून लढाया होत आहेत. ह्याचा अर्थ असा करावयास हवा कीं मनुष्याचा हा प्रयोग फसला. लढाइनें लढाई बंद करण्याचा प्रयोग दहा हजार वर्षे झाला. परंतु जगांतील लढाई संपत नाहीं. ह्यावरून शहाणें होऊन मनुष्यानें नवीन मार्ग शोधून काढायला हवा. दगडांच्याऐवजीं बाण, बाणांच्याऐवजीं बंदुका, बंदुकां-ऐवजीं बॉंब, बॉंबच्याऐवजीं विषारी धूर, त्या विषारी धुराऐवजीं मारक किरण; अशा रीतीनें हिंसक साधनांत फरक करून संस्कृति येत नसते. आपण वृक, व्याघ्र, रीसच राहिलों. मनुष्याला जिंकण्याचीं नवीन साधनें हवींत. वाघ नखांनीं जिंकील. मनुष्यानेंही का तसेंच करावयाचें? मग मानवाचा मोठेपणा कशांत

राहिला ? मोठा वाघ होणें ही का उत्क्रांति ? वाघाला दोन इंची नखें आहेत, मानवानें पांच फूट लांबीच्या बंदुकांचीं नखें लावून घेतलीं म्हणजे का उत्क्रांति ?

"प्रेम, सहानुभूति, दया हींच शस्त्रें मानवाला शोभतात. ह्यांचे कारखाने मानवी हृदयांत निघाले पाहिजेत. थोड्या प्रमाणांत ते आहेत. मोठ्या प्रमाणांत निघाले पाहिजेत." स्वामींना जणुं किती बोलावें, काय बोलावें असें झालें होतें.

"परंतु प्रेम करणाऱ्याला दुसरा मारील. मी प्रेम करतों म्हणून दुसरा करीलच असें नाहीं," रघुनाथ म्हणाला.

"ध्येयासाठींच मरावें कीं नाहीं ?" स्वामींनीं प्रश्न केला.

"ध्येयासाठींच जीवन आहे," नामदेव म्हणाला.

"काय रघुनाथ ? जीवन मोठें का जीवनाहून कांहीं मोठें आहे ?" स्वामींनीं पुन्हा प्रश्न केला.

"जीवन हें देण्यासाठीं आहे. जीवनाहून महत्तर अशा कोणत्यातरी गोष्टी-साठीं हें जीवन अर्पावयाचें असतें," रघुनाथ म्हणाला.

"मग प्रेमाच्या ध्येयाची पूजा करतांना मला मरण आलें तर त्यांत काय वाईट ? माझ्या ध्येयासाठीं मी मेलों असें प्रेमोपासक म्हणेल. तें मरणें व्यर्थ जात नाहीं. त्या मरणानें तें ध्येय वाढलेंच. त्या मरणाचा परिणाम झालाच असला पाहिजे. त्या मरणाऱ्याच्याही मनावर संस्कार झालाच असला पाहिजे. अशीं हजारों मरणें तो पाहील तेव्हां तो संस्कार दृढ होईल. हाच मार्ग मानवाला शोभतो ; परंतु हजारों वर्षांचे रक्ताचे संस्कार एकाएकीं कसे जाणार ? ध्येयवादी पुरुष आशेनेंच धडपडेल," स्वामी म्हणाले.

"तुम्ही कोणाला मारणार नाहीं ?" रघुनाथनें प्रश्न केला.

"रघुनाथ, मी काय करीन ह्याचा हा प्रश्न नाहीं. मला कोणी मारावयास आला तर मीही त्याला मारण्याचा प्रयत्न करीन किंवा भागूबाईसारखा पळूनही जाईन. परंतु त्या दोन्ही गोष्टींबद्दल मला वाईट वाटेल. मी दुबळा आहें म्हणून मीं दुसऱ्याला मारण्याचा प्रयत्न केला. फारच दुबळा आहें म्हणून पळून गेलों. त्याच्यासमोर उभें राहून, 'गड्या ! मार मला. मला मारायचेंच असेल तर मार. पण मी तुला मारणार नाहीं. तूं मला मारलेंस तरी मी तुला प्रेमच देईन,' असें चैतन्यप्रभूप्रमाणें मला म्हणतां येत नाहीं म्हणून मी रडेन. मी माझ्या दुबळेपणाचें तत्त्वज्ञान निर्माण करणार नाहीं. तोफाबंदुकांचें, हिंसेचें

परब्रह्म करणार नाहीं. आज तोफाबंदुकांचें समर्थन करणारें तत्त्वज्ञानच निर्माण होत आहे. तें ध्येय मानलें जात आहे. प्रेम शक्यच नाहीं असें म्हणण्यांत येत आहे. ही मोठी दुःखाची गोष्ट आहे. बळी तो कान पिळी ही का शेवटीं मानवाची महती ? जो समर्थ असेल तो जगेल, तो जिंकील, दुबळयांचें काम काय, असें का मानव म्हणणार ? दुबळेपणा त्याज्य ही गोष्ट खरी; परंतु दुबळयाला चिरडून हें दाखवायचें नसतें. दुबळयाला हात देऊन आपण त्याला समर्थ करूं. दुबळयाला सांगूं, 'मी तुला मदत करीन. ऊठ, असा पडूं नकोस' मी समर्थ होईन व दुसऱ्यालाही साहाय्य देऊन समर्थ व स्वतंत्र करीन. आई मुलापेक्षां बळवान् असते. त्या दुबळया पोराला तिनें कां वाढवावें ? द्यावें फेंकून गटारांत, नाहींतर कचऱ्याच्या पेटींत ! नित्शेच्या तत्त्वज्ञानाच्या उपासकांनीं हेंच केलें पाहिजे. परंतु माता तसें करीत नाहीं. ती मुलाला वाढविते. त्याचें बोट धरते, त्याला बोलायला शिकविते, त्याला समर्थ करते, पायांवर उभें राहावयास शिकविते. शेवटीं सहकार्य, साहाय्य, सहानुभूति, प्रेम हाच मानवजातीचा अखेरचा संदेश हवा. त्या ध्येयाच्या ध्रुवावर आपले डोळे हवेत. सध्यां तोफा, बंदुका बाळगूं या. परंतु त्यांची शरम वाटूं दे. खंत वाटूं दे. केव्हां बरें हीं पशुत्वाचीं चिन्हें फेंकतां येतील ह्याची मानवी समाजांना तळमळ लागूं दे."

बोलतां बोलतां स्वामी भावनावश झाले. ते थरथरत होते.

"वाटेंत धर्माच्या घरीं जायचें का ? रघुनाथनें विचारलें.

"हो. डोकावून जाऊं," स्वामी म्हणाले.

"त्याला द्यायला कांहीं नाहीं बरोबर," रघुनाथ म्हणाला.

"माझ्या पिशवींत बिस्किटांचा पुडा आहे. साठे बंधु बिस्किटें. स्वदेशी," नामदेव म्हणाला.

"कशाला रे आणलीं होतींस ?" रघुनाथनें विचारलें.

"स्वामींना भूक लागेल म्हणून, होय ना ? मला तुम्ही कुकुलें बाळच समजतां." स्वामी मंद हसले.

"तसें नाहीं. रघुनाथच्या लहान भावंडांस खाऊ म्हणून मीं दोन पुडे आणले आहेत. एक धर्माला देऊं," नामदेव म्हणाला.

" नामदेव, तुला सारें सुचतें. आम्हांला रे कां नाहीं सुचत ? " स्वामींनीं विचारलें.

" परंतु तुमच्यामुळेंच हें सारें सुचूं लागलें, रुचूं लागलें, पचूं लागलें, " नामदेव म्हणाला.

" मीं म्हटलें तुझे ' चूं ' थांबतात कीं नाहीं ? " रघुनाथ थट्टेनें म्हणाला.

वादविवाद करीत करीत तिघे मारवडपर्यंत आले. मारवडपासून देवपूर जवळ होतें. धर्मा झोंपडीच्या दारांतच उभा होता.

" स्वामी, " त्यानें टाळी पिटली.

त्याची आई बाहेर आली.

" कसें आहे, बरें आहे ना धर्मा ? " स्वामींनीं विचारलें.

" आज तुम्ही एकटे नाहीं, आज तिघे, " धर्मा हसत म्हणाला.

" तिघांचा दत्तात्रेय, " स्वामी म्हणाले.

" हा घे तुला खाऊ, " नामदेव म्हणाला.

" मला खाऊ ? मी का तुमचा भाऊ ? " धर्मानें विचारलें.

" होय. आपण सारे भाऊ, " नामदेव म्हणाला.

" जातों, धर्माची आई. देवपूरला जायचें आहे, " स्वामी म्हणाले.

" किती तुमचा लोभ, किती दया, " म्हातारी म्हणाली.

मगन, तुकाराम मास्तर रस्त्यांत भेटलेच.

" जातांना येथेंच थांबून जा. दोन शब्द सांगून जा. " ते म्हणाले.

" बघूं, " स्वामी म्हणाले.

देवपूर जवळ आलें. देवपूरची नदी दिसूं लागली. देवपूरपासून मैल दीड-मैलावर तापी व अमळनेरची बोरी ह्यांचा संगम आहे. देवपूरला नदीला बारा महिने पाणी असे. रघुनाथ त्याच नदींत लहानपणीं पोहावयास शिकला. त्या नदीच्या वाळवंटांतच खेळला, कुदला.

" आलें माझें देवपूर " रघुनाथ म्हणाला.

" गांवाचें नांव तर गोड आहे, " स्वामी म्हणाले.

" गांवही गोड आहे, " रघुनाथ म्हणाला.

" आतां चव घेऊंच, " स्वामी म्हणाले.

तिघे गांवांत शिरले. गांवची मंडळी रामराम करूं लागली. स्वामी सर्वांना प्रेमानें प्रणाम करीत होते. बरोबरचीं मुलें रघुनाथच्या हाताला येऊन झोंबलीं. रघुनाथही त्यांच्याजवळ बोलूं लागला.

आलें. रघुनाथचें छोटें घर आलें.

"आई," रघुनाथनें हाक मारली.

रघुनाथची आई विनयानें जरा दारांत डोकावली.

"आई, हे स्वामी हो." रघुनाथ म्हणाला.

"हे तुझे नामदेव, होय ना?" वेणूनें विचारलें.

"होय," रघुनाथ म्हणाला.

"नामदेवाचें नांव तुला काय माहीत, वेणू?" स्वामींनीं विचारलें.

"रघुनाथभाऊ त्यांच्या तुमच्या कितीतरी गोष्टी आला म्हणजे सांगतो. यांनीं कंदिलावर हात भाजून घेतला होता—आणि किती किती तरी गोष्टी. नाहीं का रे भाऊ?" वेणू गोड बोलत होती.

"तूं आपली गोड वेणूच आहेस," स्वामी म्हणाले.

"पण बांबूची नाहीं हो," वेणू म्हणाली.

"आई, आम्ही नदीवर आंघोळ करून येतों हां," रघुनाथ म्हणाला.

"रघुनाथ! थोडें गूळपाणी दे ना. वेणू, दुकानावरून थोडा गूळ घेऊन ये जा," आई म्हणाली.

वेणू पळत गेली व आली.

"वेणू, तुझी सारी धावपळ. पडशील हो," स्वामी म्हणाले.

"मी नाहीं पडत. मी डोळे मिटून सरळ चालतें. डोळे मिटून जात्यांत वैरण घालतें. डोळे मिटून सरळ जातां येतें कीं नाहीं तें मी पाहातें. परवां मी वाळवंटांत डोळे मिटून जात होतें तर तिकडून आली गाय! मी एकदम डोळे उघडले म्हणून. नाहींतर शिंगच डोळ्यांत जाऊन कायमचाच मिटला असता डोळा," वेणू हकीकत सांगत होती.

"नामदेव, तूंही घे तो खडा. मीच एकटा खाऊं वाटतें? वेणू मला हांवरा म्हणेल," स्वामी म्हणाले.

"त्यांना नसेल आवडत गूळ! आमच्या गांवांत तो श्रीपति आहे. तो इंग्रजी शिकतो धुळ्याला. त्याला गूळ नाहीं आवडत. त्याला साखर लागते," वेणू म्हणाली.

"वेणू, तुझी ह्यांची ओळख नाहीं तर तूं कशी बोलतेस?" स्वामी म्हणाले.

"रघुनाथ सांगे म्हणून ओळख आहेच. तुम्ही बोलतां, परंतु हे कां बोलत नाहींत?" वेणूनें विचारलें.

"ते मुके आहेत," स्वामी म्हणाले.

"ते पाहा हसले. मुके नाहींत. जे मुके असतात ते बहिरे पण असतात. बोला ना हो तुम्ही कांहींतरी," वेणू म्हणाली.

"त्यांना कांहींतरी बोलायला नाहीं आवडत. मुद्द्याचें, जरूरीचें बोलायला आवडतें," रघुनाथ म्हणाला.

"त्याला बोलतां येत नाहीं. बांसरी वाजवितां येते," स्वामी म्हणाले.

"बांबूची?" वेणूनें विचारलें.

"नाहीं. ब्रासची," नामदेव म्हणाला.

"बघूं दे," वेणूनें सांगितलें.

नामदेवानें पिशवींतून बांसरी काढली व वेणूच्या हातांत दिली.

"किती लांब व लकलकीत आहे. ही देशी आहे?" वेणूनें विचारलें.

"हो. आतां देशी मिळतात. अमळनेरच्या खादी भांडारांत मिळतात," नामदेव म्हणाला.

"वेणू! आतां तुझी बांसरी बंद कर," रघुनाथ म्हणाला.

"माझी कोठली?" वेणूनें विचारलें.

"म्हणजे तुझी टकळी," स्वामी हसत म्हणाले.

"माझी टकळी म्हणजे वाटतें बांसरी! मी का इतकें गोड बोलतें?" वेणूनें विचारलें.

"आज तरी गोड वाटतें आहे," रघुनाथ म्हणाला.

"नामदेवाला ब्रासची बांसरी वाजवतां येते व वेणूची बांसरी पण वाजवितां येते," स्वामी म्हणाले.

"वेणू, घागर दे. येतांना नदींतून भरून आणूं," रघुनाथ म्हणाला.

"एकच देऊं?" तिनें विचारलें.

"एकच दे. ते पाहुणे आहेत," रघुनाथ म्हणाला.

" मुळींच नाहीं. ते आपलेच आहेत. होय ना हो? म्हणून तुम्हीं खाऊ आणलात. बाबा कधीं आणीत नाहींत. कोणी आणीत नाहींत. रघुनाथभाऊ एकादे वेळेस येतांना आणतो," वेणू म्हणाली.

" बरें आम्ही जातों स्नानाला आतां, वेणूबाई," स्वामी म्हणाले.

" मी कांहीं बाई नाहीं," वेणू म्हणाली.

" मग काय बुवा वाटतें?" रघुनाथ हसत व चिडवीत म्हणाला.

" मी नाहीं बोलत जा," असें म्हणून वेणू रागावून घरांत गेली.

स्वामी, नामदेव व रघुनाथ नदीवर गेले.

पाणी फार नव्हतें. पोहण्यासारखें नव्हतें.

" डोह लांब आहे," रघुनाथ म्हणाला.

" येथेंच करूं आंघोळ," स्वामी म्हणाले.

" तुम्ही चालून थकलां असाल," नामदेव म्हणाला.

" आणि आपले वादविवाद?" रघुनाथ म्हणाला.

" मला शांतपणें सावकाश बोलतांच येत नाहीं," स्वामी म्हणाले.

नामदेव व रघुनाथ ह्यांनीं एकमेकांच्या पाठी चोळल्या.

" आणि माझी रे कोण चोळील?" स्वामींनीं विचारलें.

" तुमची घेऊं चोळून?" नामदेवानें विचारलें.

" चोळ. सारा मळ काढ," स्वामी म्हणाले.

" दगड घेऊं का एक?" नामदेवानें विचारलें.

" दगडानें तर सालेंच काढशील," स्वामी हसत म्हणाले.

" आम्ही शेतकरी लोक दगडानेंच अंग घासतों. तोच आमचा साबण," रघुनाथ म्हणाला.

" आईच्या प्रेमप्रवाहानें गुळगुळीत झालेले दगड. काळेकाळे साबण," नामदेव म्हणाला.

" बरें, दगडानें घास पाठ, स्वामी म्हणाले.

शेवटीं स्नानें झालीं.

" येथें दगड नाहीं का रे धुवायला?" स्वामींनीं विचारलें.

" खानदेशांत दगड कमी," नामदेव म्हणाला.

" सारा भुसभुशीतपणा. कणखरपणा कोठेंच नाहीं," स्वामी म्हणाले.

" परंतु मातीच अशी चिकट असते कीं पायाला चिकटली तर लवकर सुटत नाहीं. काळ्या मातीचीं ढिपळें दगडापेक्षां टणक होतात. पायाच्या बोटाला लागलें तर रक्त येतें. परंतु मातीच्या भिंती अभंग असतात. भरतपूरचा किल्ला मातीचाच होता, पण अजिंक्य होता, " नामदेव म्हणाला.

कपडे धुवून मंडळी निघाली. घरीं आली. स्वयंपाक तयार झाला होता. केळीचीं पानें होतीं. बोरीच्या कांठीं देवपूरला पुष्कळ केळींचे मळे होते. वेणूनें स्वच्छ लोटे भरून ठेविले.

बाजरीची भाकर व बेसन होतें.

" कशी खुसखुशीत आहे भाकरी, " स्वामी म्हणाले.

" माझी आई हातावर भाजते, " रघुनाथ म्हणाला.

" हातावर भाजीत नाहीं कांहीं, हातावर करते, " वेणू म्हणाली.

" हाताच्या वर नाहीं करीत, हातांत करते, " स्वामी म्हणाले.

" आपण सगळे बोललों, परंतु हे बोलतच नाहींत, " वेणू म्हणाली.

" त्याची मुद्द्याशीं गांठ असते, " स्वामी म्हणाले.

" म्हणजे बेसनभाकरीशीं ना ? " वेणूनें विचारलें.

इतक्यांत ओसरीवर एक मुलगा आला.

" काय रे भिका ? " रघुनाथनें विचारलें.

" मीं शेवया आणल्या आहेत, " भिका म्हणाला.

" आण आंत, " रघुनाथ म्हणाला.

भिका निघून गेला. तो रघुनाथचा मित्र होता. त्याला स्वामी, नामदेव सर्वांची माहिती होती. रघुनाथ सारें सांगायचा.

" वेणू, वाढ त्या शेवया, " रघुनाथ म्हणाला.

" ह्या तुझ्या मित्रांना वाढतें. त्यांना भाकर नसावी आवडत बहुतकरून. त्यांची पहिली अजून संपतच नाहीं. " असें म्हणून वेणूनें नामदेवाला आधीं शेवया वाढल्या.

" मला फार नको वाढूं. सोसायच्या नाहींत, " स्वामी म्हणाले.

" असें आपलें मोठ्यांना म्हणावेंच लागतें, " वेणू म्हणाली. साऱ्यांना हसूं आलें.

" वेण्ये, असें बोलूं नये, " आई चुलीजवळून म्हणाली.

" मी माझें तोंड शिवूनच टाकतें, " ती म्हणाली.

" टाक शिवून, " रघुनाथ म्हणाला.

" हो, टाकतें हो शिवून, " वेणू म्हणाली.

" बोललीस. शिवून ना टाकीत होतीस ? " रघुनाथनें चिडविलें.

" तूं अगदीं चिडविणारा, रडविणारा आहेस, " वेणू म्हणाली.

" आणि गोष्टी कोण सांगतो, पुस्तकें आणून कोण देतो ? " त्यानें विचारलें.

" मग तेव्हां तूं चांगला असतोस, " वेणू म्हणाली.

" आपण सारींच कधीं चांगलीं, कधीं वाईट असतों ; कधीं कृष्णपक्ष, कधीं शुक्लपक्ष. " स्वामी म्हणाले.

" कधीं हसतों, कधीं रडतों, नाहीं का ? " वेणूनें विचारलें.

रघुनाथच्या आईनें स्वतः भाकर वाढावयास आणली.

" माझ्या हातची एवढी घ्या, " असें म्हणून तिनें स्वामींना, नामदेवास व रघुनाथला चतकोर, चतकोर वाढली.

जेवणें झालीं. ओसरींत घोंगडी टाकून स्वामी पडले. जवळ नामदेवही जरा झोपला. रघुनाथ आंत आईजवळ बोलत होता. सुखदुःखाच्या गोष्टी ऐकत होता. घरांत काय आहे नाहीं विचारीत होता.

थोड्या वेळानें स्वामी उठले. त्यांनीं चूळ भरली. ते आपल्या टकळीवर सूत कांतूं लागले. वेणू पाहात होती.

" मला येईल का काढायला सूत ? " तिनें विचारलें.

" तुला हात आहेत का ? "

" हो. "

" मग येईल, " स्वामी म्हणाले.

" परंतु शिकवील कोण ? " वेणूनें विचारलें.

" रघुनाथ, " स्वामींनीं सांगितलें.

" तुला येतें रे भाऊ ? " वेणूनें पुसलें.

" हो. "

" मग मला रे कां नाहीं शिकविलेंस ? " तिनें लडिवाळपणें विचारलें. इतक्यांत गांवांतील भिका, जानकू वगैरे मंडळी तेथें आली.

" या, असे बसा, " स्वामी त्यांना म्हणाले. नामदेवही उठून बसला.

" तुम्हांला पाणी पाहिजे चूळ भरायला ?" वेणूनें विचारलें.

" हो," नामदेव म्हणाला.

" बोलले, बोलले," वेणू टाळ्या वाजवीत म्हणाली.

" हा माझा मित्र भिका आणि हे जानकूभाऊ. जानकूभाऊ व भिका ह्यांनीं गांधी-जयंतीला हा गांव झाडला. लोकांनीं त्यांना नांवें ठेवलीं," रघुनाथ सांगत होता.

" लोकांनीं कां नांवें ठेवलीं ?" स्वामींनीं विचारलें.

" ते म्हणत तुम्ही का झाडू आहांत, भंगी आहांत ? कोणीं सांगितल्या ह्या उठाठेवी ? मीं म्हटलें आम्हांला महात्मा गांधी सांगतात. आम्ही गांव सफा करणार. घाण काढणार. लोक हसत होते. आम्हांला वेडे म्हणत होते," जानकू म्हणाला.

" जे आज वेडे समजले जातात, तेच उद्यां वंदनीय होतात. दूरदूरच्या खेड्यापाड्यांतून तुमच्यासारखीं माणसें निघूं लागलीं हें केवढें भाग्य! वाऱ्याबरोबर बीं पाठवून जंगलेंच्या जंगलें परमेश्वर निर्माण करतो. माणूस एखादें झाड लावतो ; त्याचाही त्याला कोण अहंकार ! आणि तें झाडही जगेल का मरेल, झडेल का फुलेल फळेल ह्याचा भरंवसा नसतो. महात्माजींचा सेवेचा संदेश वाऱ्याबरोबर दशदिशांत जात आहे. हृदयाहृदयांत पेरला जात आहे," स्वामी म्हणाले.

" देवपूर गांवांत कांहींतरी करावें असें मला वाटतें. मला विणकाम शिकून यायचें आहे. भिकाच्याही मनांत आहे. आम्ही मग आमच्या गांवांत माग लावूं. खादी काढूं," जानकू म्हणाला.

" वा जानकू, छान. तुमच्या घरीं कोण आहे ?" स्वामींनीं विचारलें.

" मी एकटा आहें. बायको मागेंच मेली. मी मजुरी करीत असतों," जानकू म्हणाला.

" कोठें जाल शिकायला ?" स्वामींनीं विचारलें.

" कापडणें, भुकटी जवळच आहेत. तेथें जाऊं. परंतु खर्च हवा ना द्यायला ?" जानकू म्हणाला.

" किती खर्च येईल ?" स्वामींनीं विचारलें.

" दोघांना दर महिन्याला कमीतकमी पंधरा रुपये तरी खर्च येईल. सहा महिने तरी राहिलें पाहिजे. जवळ जवळ शंभर रुपये हवेत. आमच्या मनांत इच्छा खूप आहे. परंतु काय करावयाचें ? " जानकू म्हणाला.

" मी ह्याचा विचार करीन. जमलें तर रघुनाथबरोबर कळवीन. नाहींतर मीच घेऊन जाईन, " स्वामी म्हणाले.

" आपला गांव चांगला करूं, " रघुनाथ म्हणाला.

" तूं शीक व आम्हांला येऊन मीळ. तूं विचारांची पुंजी घेऊन ये. तोंपर्यंत आम्ही येथें धडपडूं. तूं पुढें आलास म्हणजे शंका फेडशील. आम्ही हातपाय व तूं आमचें डोकें, " भिका म्हणाला.

" आणि हृदय रे ? " वेणूनें विचारलें.

" हृदय तूं, " भिका म्हणाला.

" ती येथें थोडीच राहील ? पळेल सासरीं. मग तोंड होईल बंद. दाराच्या बाहेरही मग जाऊं देणार नाहींत, " स्वामी म्हणाले.

" मी तेथून पळेन व उडून जाईन, " वेणू म्हणाली.

" कोठें जाशील उडून ? " स्वामींनीं विचारलें.

" जाईन आपली कोठें तरी. मला काय माहीत ? " वेणू म्हणाली.

" आमच्या गांवांतील मंदिर व मशीद पाहायला येतां ? आमच्या गांवांत पूर्वींपासून हिंदुमुसलमान सलोख्यानें राहात आले आहेत. मुसलमान आतां अगदीं गरीब झाले आहेत. मशिदीचें उत्पन्न सारें सावकारांच्या घरांत गेलें आहे. उत्तर हिंदुस्थानांतून रजपूत खानदेशांत आले व ठिकठिकाणीं राहिले. देवपुऱ्यांत रजपूतच मुख्यत्वें करून आहेत. परंतु आतां आम्ही मराठे म्हणूनच ओळखले जातों, " रघुनाथ हकीकत सांगत होता.

" भाऊ तो खंजीर दाखव त्यांना " वेणू म्हणाली.

" पूर्वजांचा खंजीर आहे घरांत. लहानपणीं मला त्याचा फार अभिमान वाटे. अजूनही वाटतो, " रघुनाथ म्हणाला.

वेणू खंजीर घेऊन आली. स्वामींनीं हातांत घेतला व त्याला प्रणाम केला.

" तुम्ही नमस्कार कसा केलात ? " वेणूनें विचारलें.

" हा खंजीर कोणीं हातांत धरला असेल कोणाला माहीत ? एखाद्या थोर वीरानें तो हातांत धरला असेल, एखाद्या सतीनें सतीत्व राखण्यासाठीं तो मुठींत

घट्ट पकडला असेल, कमरेला खोंचून ठेवला असेल! रजपुताच्या घरांतील खंजीर! त्यांत शौर्य, धैर्य, पावित्र्य, त्याग ह्यांचे सागर भरलेले असतील," स्वामी म्हणाले.

"तुम्हीही पाहाना खंजीर," वेणू नामदेवाला म्हणाली.

"खंजिराची मला भीति वाटते," नामदेव म्हणाला.

"नुसता हातांत घ्यायला भीति?" वेणूनें विचारलें.

"मग बांसरी हातांत धरणारा तो बायकी हात," रघुनाथ म्हणाला.

"कृष्ण का बायको होता? त्यानें तर कंसाला मारलें," वेणू म्हणाली.

"आणि आपला हात शांतपणें कंदिलावर भाजून घेणारा–तो का शूर नाहीं?" स्वामी म्हणाले.

"चला, आपण गांव पाहूं." रघुनाथ म्हणाला.

सारी मंडळी निघाली. बरोबर भिका व जानकूही होते. वेणूला आईनें घरांत बोलाविलें म्हणून ती घरांत गेली. आईबरोबर तिला दळायचें होतें.

"हें आमच्या गांवांतील राममंदिर," रघुनाथ म्हणाला.

रामाच्या मूर्ति पाहून स्वामी क्षणभर ध्यानस्थ झाले.

"राम ह्या नांवांत केवढें पावित्र्य, केवढा इतिहास, केवढें काव्य भरून राहिलें आहे. भारतीय संस्कृतींतील व्यक्ति आपल्या जीवनांत एकरूप झाल्या आहेत," स्वामी म्हणाले.

"येथेंच आम्ही माग लावणार आहोंत." जानकू म्हणाला.

"राममंदिरांत उद्योगमंदिर. छान. कबीर हा रामाचा उपासक होता व विणकरही होता. 'रामबिना कछु जानत नाहीं,' असें म्हणत म्हणत कबीर विणी. 'झिनीझिनी बिनी चदरिया' असें गात धोटा फेंकी. कसें दिव्य, रसमय, राममय व कर्ममय जीवन! सारे संत उद्योगी होते. कोणी विणकर, कोणी कुंभार, कोणी सोनार, कोणी चांभार, कोणी माळी, कोणी साळी. समाजाच्या उपयोगाचा धंदा प्रत्येक संत करी आणि त्या धंद्यांत सारी हृदयाची कला ओती, बुद्धीची दिव्यता ओती. कबिरानें विणलेल्या वस्त्रावर लोकांची दृष्टि ठरत नसे. गोरा कुंभार मडक्यांची माती तुडवितां तुडवितां इतका तन्मय होई कीं रांगत आलेलें मूलही तुडवलें गेलें तरी त्याला भान नाहीं! ह्या

समाजरूपी देवाला, जनताजनार्दनाला चांगलें मजबूत मडकें तो देई हीच कर्ममय पूजा," स्वामी बोलत होते.

गांवाला उंच दरवाजा होता. दरवाजाच्या आंतल्या बाजूस राममंदिर होतें व दरवाजाबाहेर ती मशीद होती.

सारीं जणें मशिदींत गेलीं. इतकीं वर्षें झालीं तरी मशीद किती गुळगुळीत होती. भिंतीमध्यें स्वतःचें प्रतिबिंब दिसे. त्या मशिदींत गंभीर, शीतल, शांत वाटत होतें.

"येथें पूर्वी वैभवाच्या काळांत कारंजीं उडत असत. हीं पाहा पडकीं कारंजीं," रघुनाथ दाखवीत होता.

"परंतु पाणी कोठून येई?" स्वामींनीं विचारलें.

"ती तिकडे विहीर आहे. तिला मोट असे. ती हत्ती ओढीत असे असें सांगतात. मोटेचें पाणी वरतीं उंच खजिन्यांत जमा होई. तेथून तें कारंज्यांत येण्याची व्यवस्था होती. हें पाहा एक जुनें भुयार आहे," रघुनाथ बारीक सारीक दाखवीत होता.

"गांवाच्या आंत राम व गांवाबाहेर रहिम. अंतर्बाह्य परमात्मा ह्या गांवाचें रक्षण करीत आहे. आंत साकार देव, बाहेर निराकार देव!" स्वामी म्हणाले.

"देवपूर नांव यथार्थ आहे," नामदेव म्हणाला.

"चांगलें आहे कीं नाहीं गांव?" रघुनाथनें विचारलें.

"गोड आहे, रमणीय आहे," नामदेव म्हणाला.

"नदी असली म्हणजे निम्में सौंदर्य आधीं गांवाला लाभतें. उरलेलें निम्में सौंदर्य माणसांनीं प्रेमानें व सहकार्यानें वागून निर्माण करावयाचें असतें," स्वामी म्हणाले,

"चला, आतां जाऊं. नदीवर येतां?" रघुनाथनें विचारलें.

"हो, चला. नदीचें दर्शन सदैव नवीनच आहे. नदीला पाहून मला कधींच कंटाळा येत नाहीं," स्वामी म्हणाले.

सारी मंडळी नदीवर आली. स्वामी चूळ भरून डोळ्यांना पाणी लावून आले. वाळवंटांत सारी मंडळी बसली. संध्याकाळ होत आली होती. सूर्याचे शेवटचे किरण पाण्यांत सायंस्नान करीत होते. सारें आकाश लाल, लाल होऊन गेलें होतें.

" नामदेव, तो बघ महान् चितारी आकाशाच्या फलकावर चित्रें काढूं लागला, " स्वामी म्हणाले.

" देवाला सायंकाळीं अधिक फुरसत असते वाटतें ? " नामदेवानें विचारलें.

" कलेचा खरा विकास विश्रांतीच्या वेळींच असतो. जेव्हां आपल्या पाठीमागें इतर भुगभुग व भुणभुण नसते, त्या वेळेसच आपल्याला आवडणाऱ्या गोष्टींत आपण रंगून जातों. मनुष्य दिवसभर पोटासाठीं उद्योग करतो. त्यांत त्याचें हृदय असतेंच असें नाहीं. परंतु तो पोटाचा उद्योग संपला म्हणजे कोणी गातो, कोणी वाजवतो, कोणी चितारतो, कोणी फुलें फुलवतो, कोणी खेळतो, कोणी कांहीं करतो. ह्या गोष्टींतूनच मनुष्याच्या हृदयांतील राम प्रकट होतो. ' पोटापुरतें व्हावें काम । परी अगत्य तो राम ॥ ' पोटाचे धंदे असूं देत. परंतु ज्यांत तुमचें हृदय रमेल, जेथें तुम्हांला रामदर्शन होईल, असें कांहींतरी प्रत्येकाजवळ असलें पाहिजे, " स्वामी म्हणाले.

इतक्यांत कोकिळेचा आवाज आला. सारखा आवाज येत राहिला होता. स्वामी कुऊ, कुऊ करूं लागले. रघुनाथ पण कुऊ करूं लागला. ती कोकिळा ओरडावयाची थांबली.

" तुम्हीं वेडावल्यानें कोकिळा थांबली, " भिका म्हणाला.

" कलेचें विडंबन खऱ्या कलावंताला कसें सहन होईल ? " स्वामी म्हणाले.

" कुऊ, कुऊ कसा उत्कट आवाज असतो ! जणुं तिचें हृदयच ओरडत असतें, " नामदेव म्हणाला.

" ती म्हणते वसंत ऋतु आला. रानें, वनें फुललीं, नवीन पल्लव फुटले, नवीन मोहोर आले, सृष्टीचें वैभव आलें. परंतु भारताचें वैभव कधीं येईल ? भारताचें भाग्य कधीं फुलणार, कधीं लाखों खेडींपाडीं भरभराटणार ? भारतांतील लोकांच्या जीवनांत सुखासमाधानाचा वसंत केव्हां येणार ? हा त्या ' कुऊंत ' अर्थ आहे असें कधीं कधीं मला वाटतें ! " स्वामी म्हणाले.

काळोख पडूं लागला. सारी मंडळी गांवांत आली. भिका आपल्या घरीं गेला. जानकूही गेला. स्वामी, रघुनाथ, नामदेव ह्यांचीं जेवणें झालीं.

" वेणू, तूं कां नाहीं आमच्याबरोबर आलीस ? " स्वामींनीं विचारलें.

" घरीं काम होतें. आईला मदत नको का ? दळायचें होतें, पाणी आणायचें होतें, " वेणू म्हणाली.

"तुला गाणीं येतात का वेणू ?" स्वामींनीं विचारलें.

"हो. रघुनाथभाऊनें मला आश्रमभजनावली आणून दिली आहे. शिवाय 'गाडी धीरे धीरे हांक' वगैरे गाणीं उतरूनही त्यानें दिलीं आहेत," वेणू म्हणाली.

"प्रार्थनेच्या वेळेस तूं पद म्हणशील ?" स्वामींनीं विचारलें.

"हो, म्हणेन. मी चांगलेंसें आठवून ठेवीन हां," वेणू म्हणाली.

"आपण राममंदिरांतच प्रार्थनेला जाऊं," रघुनाथ म्हणाला.

"हो, मी तेंच म्हणणार होतों," नामदेव म्हणाला.

"गांवांतील कांहीं मंडळींसही मीं बोलावलें आहे. स्वामी दोन शब्द सांगतील," रघुनाथ म्हणाला.

"काय रे सांगूं मी नेहमीं ?" स्वामी म्हणाले.

"ह्या खेड्यांतील लोकांना कोण काय सांगतो ? जें सांगाल तें नवीनच आहे. विचारांसाठीं भुकेलेल्या लोकांना पाहून तुम्हांला दया नाहीं येत ?" रघुनाथनें विचारलें.

स्वामी एकदम गंभीर झाले.

"रघुनाथ ! मंदिरांत बैठक घातली आहे. चलायचें ना ?" भिकानें येऊन म्हटलें.

"हो चला. वेणू चल," स्वामींनीं हाक मारली.

गांवांतील प्रमुख लोक येऊन बसले होते. स्वामींनीं सर्वांना वंदन केलें. गांवांतील तरुणही आले होते. रघुनाथची आई, भिकाची आई आणि आणखी दोनचार स्त्रिया आंत बसल्या होत्या.

> **'स्थिरावला समाधींत स्थितप्रज्ञ कसा असे ।**
> **कृष्णा सांग कसा बोले, कसा राहे, फिरे कसा ॥'**

गंभीर प्रार्थना सुरू झाली. नंतर वेणूनें सुंदर पद म्हटलें.

> **अति आनंद हृदयिं भरला**
> **प्रियकर प्रभु मम हृदयिं आला**
> **शोक पळाला, खेद गळाला**
> **पाप ताप दूरि झाला ॥ अति० ॥**
> **मम तनमनधन**
> **मम इंद्रियगण**
> **अर्पित पदकमला ॥ अति० ॥**

चिंता सरली
भीति नुरली
त्रास सकळ सरला ॥ अति० ॥
प्रेम-रज्जुनें
प्रभुला धरणें
जाइल मग कुठला ॥ अति० ॥

पद ऐकतांना सारे समरस झाले होते. वेणूचा आवाज इतका गोड व हृदयंगम असेल असें कोणाला वाटलें नव्हतें. शिवाय त्या आवाजांत हृदयाची एकतानता होती, भावना मिसळलेली होती.

प्रार्थना संपली. रघुनाथ उभा राहिला. तो हलक्या आवाजांत म्हणाला, ' माझ्या गांवांतील सर्व लहानथोर बंधूंनो ! आजचा दिवस भाग्याचा आहे. आज स्वामी येथें आले आहेत. तुम्हांला ते दोन शब्द सांगणार आहेत, ते ऐका."

स्वामी म्हणाले, "मित्रांनो ! तुम्हांला मी एकदोनच गोष्टी सांगणार आहें. तुमचा गांव मला आवडला. भिका व जानकू ह्यांच्यासारखे जीवन सेवामय करूं पाहाणारे स्वयंसेवक येथें आहेत हें पाहून तर मला अत्यंत आनंद झाला. त्यांना नांवें ठेवूं नका. घाण दूर करतो तो देव आहे. सूर्य घाण नेतो, वारा घाण नाहींशी करतो, पाणी घाण वाहून नेतें, अग्नि घाण जाळतो, पंचमहाभूतें घाण नाहींशी करतात. आपला गांव स्वच्छ राखा. स्वच्छ घरांत परमेश्वर येतो. स्वच्छ हृदयांत परमेश्वर येतो. गांवांत पंच असतात ना ? आरोग्य, उद्योग, ऐक्य, ज्ञान, प्रेम हे पांच पंच आहेत. हे पांच पंच जेथें असतील तेथें परमेश्वर असतो. पांचामुखीं परमेश्वर. हीं तीं पांच मुखें. तुमच्या गांवांत उद्योगमंदिर सुरू व्हावें म्हणून जानकू व भिका ह्यांची फार इच्छा आहे. मी त्यांची विणकाम शिकून येण्याची व्यवस्था करणार आहें. ते शिकून आले म्हणजे त्यांना ह्या मंदिरांत जागा द्या. येथें माग लावतील. गांवांत सूत कांता. उद्योग सुरू होऊं दे. तसेंच भांडण नको. प्रेम निर्माण करा. आपण भांडतों व सरकारचे मिंधे होतों. एकमेकांवर फौजदाऱ्या करतों व मग फौजदार, पोलिसांचें चांगलेंच फावतें. असत्यामुळें भित्रेपणा येतो. मोटारवाला मोटारींत पंचवीस, पंचवीस लोक बसवतो व त्यामुळें पोलिसांचा गुलाम होतो. पोलिसांचें वाटेल तें त्याला ऐकावें लागतें. आपणांस निर्भय व्हावयाचें आहे. निर्भयता नाम मोक्ष. निर्भयता हें देवाचें स्वरूप आहे.

राम असत्यासमोर, अन्यायासमोर ठाणमाण मांडून उभा आहे. तुम्ही सत्याचे, प्रेमाचे उपासक बना. म्हणजे असत्यासमोर छात्तीठोकपणें उभें राहातां येईल. जें असेल, तें दुसऱ्यास द्या. कोणास हिडिसफिडीस करूं नका. तुच्छ लेखू नका. सारें ईश्वराचें ह्या भावनेनें वागा. तुमचा गांव खरोखरच देवपूर होवो— देवाचें घर होवो अशी मी आशा करतों."

स्वामींचें भाषण संपलें. 'जागा द्यायला काय हरकत?' 'आधीं शिकून तर या म्हणावें,' 'जानकू आहे चंचल; त्याला एक नको,' असें बोलणें चाललें होतें. शेवटीं स्वामी, नामदेव वगैरे निघाले. रघुनाथच्या घरीं सर्व आले. झोपायची वेळ झाली. तेथें अंगणांत घोंगड्या टाकून सर्व मंडळी झोपली.

पहाट झाली. रघुनाथची आई व वेणू दळीत होत्या. रघुनाथची आई गोड ओंव्या म्हणत होती. किती मंगल व गंभीर वाटत होत्या त्या ओंव्या. कर्ममय प्रार्थना चालली होती. हातांत काम, ओंठांत नाम! स्वामी अंथरुणांत बसून त्या ओंव्या ऐकत होते.

नामदेव व रघुनाथही उठले. घरांतील दळणें थांबलें.

"वेणू, चल. प्रार्थनेंत गाणें म्हण," रघुनाथ म्हणाला.

प्रार्थना सुरू झाली. वेणूनें गाणें म्हटलें.

'अंतरमाथी नहि रे विसरूं हरी,' हें गाणें म्हणण्यांत आलें.

स्वामी म्हणाले, "वेणू, आणखी एक म्हण."

वेणूनें गाणें म्हटलें.

**'मुखडानी माया लागी रे। मोहन प्यारा'**

दोन्ही उत्कृष्ट भक्तिरसानें भरलेलीं पदें.

"वेणू, खरोखरच तूं देवाची वेणू आहेस. किती गोड म्हणतेस! रघुनाथनें तुला पदें तरी किती छान, छान शिकविलीं आहेत," स्वामी म्हणाले.

मंडळी परत जावयास निघाली. वेणूला वाईट वाटलें.

"आतां तुम्ही सारे कधीं परत याल?" वेणूनें विचारलें.

"वेणू बोलावील तेव्हां," स्वामी म्हणाले.

भिका व जानकू प्रार्थनेस आले होते. स्वामींनीं त्यांना उत्साह दिला व सारें नीट होईल असें आश्वासन दिलें. गांवच्या सीमेपर्यंत ते पोंचवावयास आले. 'वंदे मातरम्, वंदे भ्रातरम्," जयजयकार करण्यांत आला.

" जा आतां. कोणीं नांवें ठेविलीं तरी काम सोडूं नका, " स्वामी म्हणाले.

" होय. आम्ही धडपडत राहूं, " जानकू म्हणाला.

" आपण सारीं धडपड करणारीं मुलें, " रघुनाथ म्हणाला.

" तेंच आपलें भाग्य ! तोच मोक्ष, " स्वामी म्हणाले.

भिका व जानकू परत गेले.

" आजची भेट फारच महत्त्वाची झाली, " स्वामी म्हणाले.

" येथें उद्योग-मंदिर सुरू होईल. खादी तयार होईल. खादीच्या पाठोपाठ आलेंच स्वराज्य, आलेच नवविचार, आलीच हरिजन चळवळ, आलेंच रूढी फेंकणें, आलेंच मृतभोजनवर्जन, आलाच तेजस्वी नवधर्म !–गायत्रीमंत्राचा, त्यागाचा, प्रेमाचा, विचाराचा, माणुसकीस शोभणारा धर्म–मोक्षाचा, स्वातंत्र्याचा धर्म ! " स्वामी पुन्हा म्हणाले.

" रघुनाथच्या देवपूरचें भाग्य ! " नामदेव म्हणाला.

" देवपूरचें भाग्य तें तुझेंही भाग्य–आपलें सर्वांचें भाग्य," रघुनाथ म्हणाला.

" महत्त्वाच्या घडामोडी होतील असें वाटतें. भिका, जानकू तेजस्वी हिरे आहेत. देवपुराशीं आपलें लग्न लागणार ! पुनः पुनः यावें लागणार ! स्वामी पसाऱ्यांत गुंतून जाणार ! " स्वामी म्हणाले.

" स्वामी एकदा गुंतले म्हणजे मग जाणार नाहींत ; उडून जाणार नाहींत. आमच्याजवळ राहातील, " रघुनाथ म्हणाला.

" परंतु तुम्हीही गुंतून राहिलां तर. धडपड करूं लागलां तर. माझें एकट्याचें कर्माशीं लग्न लागून चालणार नाहीं. तुमचीं सर्वांचीं लागलीं पाहिजेत ! आपल्या भावी कार्याचाच आज आपण आरंभ केला. भावी जीवनाचें बीज पेरलें गेलें. भावी आश्रमाची जुळवाजुळव जमत आली नाहीं ? माझा पसारा वाढूं लागला म्हणजे छात्रालय मला सोडावें लागेल, " स्वामी म्हणाले.

" छात्रालय सोडा. परंतु खानदेश सोडूं नका. आम्हांला सोडूं नका, " नामदेव म्हणाला.

" देवपुरांत गेलेले जीव एकमेकांस कसे सोडतील ? " स्वामी म्हणाले.

" देवपूरचा जयजयकार असो ! " नामदेव म्हणाला.

" देवपूरचा जयजयकार असो ! " सारे गर्जले.

आजूबाजूच्या टेकड्यांवरून ' देवपूरचा जयजयकार असो ' असे शब्द घुमले.



## ८

# पुण्यास भेट

अमळनेरच्या शाळेंतील पुष्कळ विद्यार्थी पुण्यास शिकत होते. त्या सर्वांना स्वामींची माहिती होती. पुण्यांतील भाऊ कॉलेजमध्यें अमळनेरचा एक विद्यार्थी वक्तृत्वोत्तेजक मंडळाचा चिटणीस होता. त्यानें स्वामींना एखादें व्याख्यान द्यावयास या असें आग्रहानें लिहिलें. नामदेव व रघुनाथ ह्यांनींही आग्रहानें या असें लिहिलें. नामदेव व रघुनाथ ह्यांचाच खरा तो सारा प्रयत्न होता. चिटणीस निमित्तमात्र होता.

पुण्यास जावें कीं न जावें, स्वामींचा निश्चय होईना. पुण्यांतील विद्यार्थ्यांना मी काय सांगूं ? प्रवचनें, व्याख्यानें, चर्चा ह्यांनीं अजीर्ण झालेल्या पुण्यांतील विद्यार्थ्यांना काय सांगावयाचें ? कॉलेजमधील मुलांची कशावरही श्रद्धा नाहीं. त्यांच्यासमोर जाऊन मी कोणता ध्येयवाद मांडूं ? पुण्यांतील केसरीनें महाराष्ट्रांतील जनतेची त्रिशंकूसारखी स्थिति केली आहे. सर्व गोष्टींची टर उडवावी हेंच जणुं पुण्यांतील तरुणांचें ध्येय झालें आहे. ध्येयहीन माणसें हाच जेथें पुरुषार्थ झाला, आम्हांला ध्येय वगैरे समजत नाहीं, आम्हांला चिवडा चिरूट समजतो असेंच जेथें प्रौढीनें सांगण्यांत येतें, तेथें जावें का आपण ?

परंतु शेवटीं आस्तिक्य भावनेचा जय झाला. पुण्याला मनांत आपण नांवें ठेवलीं त्याचें त्यांना वाईट वाटलें. ज्या पुण्याची आठवण घेऊन न्यायमूर्ति रानडे उत्तर हिंदुस्थानांतील प्रवासांत रडले, त्या पुण्याला का मीं नांवें ठेवूं ? महाराष्ट्राचा मध्यकालीन व अर्वाचीन इतिहास ज्या पुण्यानें घडविला त्याला मी नांवें ठेवूं ? पुण्यांतील तरुण सारेच कांहीं फुलपांखरी वृत्तीचे नसतील. दिव्य ध्येयाचें दर्शन होत नाहीं म्हणूनही निराशेनें कांहीं तरुण एक प्रकारचा स्वतःवर सूड म्हणून मग केवळ सुखाविलासाकडे वळतात. अशा जीवनांवर न रागावतां त्यांची कींव केली पाहिजे. मनुष्याच्या हृदयगाभाऱ्याच्या आंतील भागांत शेवटीं शंकराची पिंडी आहे, मांगल्याची मूर्ति आहे हें विसरून कसें चालेल ? मीं पुण्याला गेलेंच पाहिजे. भिऊन चालणार नाहीं, निराश होऊन चालणार नाहीं.

जें आपल्याला प्रिय आहे, त्याचा सतत प्रचार करणें ह्यांतच खरी श्रद्धा आहे. संतांना रामनाम आवडे, त्याचा त्यांनीं सर्वत्र प्रचार केला.

**‘ अवघें जगचि दुमदुमित । नामघोषें भरलें. ’**

आम्हींही आमच्या ध्येयाचे वारकरी झालें पाहिजे. त्या ध्येयाची ध्वजा नेहमीं खांद्यावर असली पाहिजे. जपानी लोक आपल्या मालाचा कसा प्रचार करतात ? आपल्या विचारांचा तसा आपण सर्वत्र प्रसार केला पाहिजे. केलें पाहिजे, सांगितलें पाहिजे. ज्यानें त्यानें ठोठावीत राहावें. आपण सारें ह्या जगाच्या गोळ्याला आकार देत आहोंत. ज्याचा प्रयत्न अधिक, त्याग अधिक, श्रद्धा व निष्ठा अधिक, प्रसार अधिक तो शेवटीं विजयी होईल.

आपण गेलों तर जास्तींत जास्त काय होईल ? आपला अपमान होईल. सत्यानें अपमानित व्हावयास तयार राहिलें पाहिजे. सत्यदेवाची प्रथम खेटरांनींच पूजा होते. सत्यनारायणाला गाजरपारखी जग दगड, धोंडेच मारील आणि मागून पायां पडेल. जगाचा हा कायदा आहे. ही सनातन परंपरा आहे. शंकराचार्यांचा छळ झाला. ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकारामांचा छळ झाला. जिवंत असतांना छळावयाचें व मेल्यावर त्यांच्या पालख्या नाचवावयाच्या असा सर्वत्र इतिहासांत रक्ताचा नियम आहे.

स्वामींनीं जावयाचें ठरविलें. त्यांनीं चिटणीसांस पत्र लिहिलें. नामदेव व रघुनाथ ह्यांसही पत्र लिहिलें. नामदेव व रघुनाथ ह्यांना अपार आनंद झाला. त्यांनीं खोली स्वच्छ करून ठेवली. घोंगडी वगैरे नीट घालून ठेवली. स्वयंपाक करून ठेवला. दोघे मित्र स्टेशनवर गेले. उतरले, स्वामी उतरले. तिघांची दृष्टादृष्ट झाली. तोंडावरचे आभिर्भाव बोलले. डोळे बोलले. हात हातांत घेऊन बोलले. त्यांचीं सारीं अंगेंप्रत्यंगें जणुं बोलत होतीं. जणुं शरीराला सहस्र जिभा फुटल्या होत्या. मुक्या, रसाळ, स्नेहाळ, जिभा फुटल्या होत्या.

नामदेव व रघुनाथ सायकलीवर होते.

“ पुण्याच्या घोड्यावर स्वार झालेत वाटतें ? ” स्वामींनीं हसत विचारलें.

“ पुण्यांस सायकलशिवाय चालतच नाहीं, ” नामदेव म्हणाला.

“ पुण्याला मनुष्य चतुष्पाद होतो म्हणावयाचें ? ” स्वामी हसत म्हणाले.

" म्हणजे परब्रह्म होतो. पुरुषसूक्तांत देवाचा एक पाय ह्या विश्वानें नटला आहे व त्याचे तीन पाय वर अमृतस्वरूपी तसेच राहिले आहेत असें वर्णन आहे. पुण्यांतील लोक म्हणजे परब्रह्माचीं रूपें आहेत, " नामदेव म्हणाला.

" परब्रह्म म्हणजे सत् व असत् याच्या पलीकडे असलेलें तत्त्व. तसें पुण्यांतील लोकांना काय म्हणावें हें समजत नाहीं. त्यांना असत् म्हणेन तर थोर विभूति येथें झाल्या. ह्यांना सत् म्हणूं तर वाटेल ते ओंगळ व विचारहीन, उच्छृंखल प्रकारही येथें चालतात. येथें सारें असून नसल्यासारखें आहे व सारें नसून असल्यासारखें आहे. शिक्षणाच्या टोलेजंग संस्था आहेत इथें. परंतु तें निर्जीव शिक्षण. भावनाहीन शिक्षण. ना स्वदेशाची स्मृति, ना कोट्यवधि बंधूंची आस्था. येथें वर्तमानपत्रें भरपूर आहेत. परंतु शिवीगाळ करीत राहाणें, शिमगा सहा सहा महिने चालू ठेवणें हे त्यांचे उद्योग. खरेंच परब्रह्म आहे बापा हें, " स्वामी म्हणाले.

" ह्या टांग्यांत तुम्ही बसा. तुमच्या दोन बाजूंस दोन आम्ही सायकलस्वार, " नामदेव म्हणाला.

" जणुं पोलीसच माझ्यावरचे, " स्वामी म्हणाले.

" उगीच जायचेत निघून कोणीकडे. तुमचा काय भरंवसा ? गोपाळरावांनीं लिहिलें आहे कीं स्वामींना जपा. आमचें ठेवणें नीट परत करा, " नामदेव म्हणाला.

" आणि गाडींतून नसतें का रे मला पळून जातां आलें ? स्वामींनीं विचारलें.

" मनांत आलें म्हणजे कोणासही वाटेल तेथून जातां येईल, " रघुनाथ म्हणाला.

" सेक्रेटरींच्याकडे उतरावयास जावयाचें कीं काय ? " स्वामींनीं विचारलें.

" नाहीं. आमच्या खोलींत जावयाचें. आम्ही सेक्रेटरींना तसें सांगितलें आहे, " नामदेव म्हणाला.

गोष्टी बोलत बोलत रस्ता काटला जात होता. शेवटीं एकदांची खोली आली. स्वामी खोलींत गेले. खोली पाहून त्यांना प्रसन्न वाटलें.

" कलावान् नामदेवाची ही खोली आहे, " स्वामी म्हणाले.

" आणि मी अरसिक आहें वाटतें ? कलावान् नामदेवाला ज्यानें आपलासा करून घेतला, तोही कलावानच असला पाहिजे, " रघुनाथ म्हणाला.

" मी आतां आधीं स्नान करतों, " स्वामी म्हणाले.

" चला, मी सारें दाखवितों, " नामदेव म्हणाला.

स्वामींचें स्नान झालें. तिघेजण जेवावयास बसले.

" टोमॅटोची भाजी आहे, वाः ! " स्वामी म्हणाले.

" ही माझी निवड हो, " रघुनाथ म्हणाला.

" टोमॅटो आणलेस तूं, परंतु भाजी केली मीं, " नामदेव म्हणाला.

" तुम्हांला पुष्कळ भूक लागली असेल ना ? " रघुनाथनें विचारलें.

" तुम्हांला पाहूनच माझें पोट भरलें, " स्वामी म्हणाले.

" आम्हांला पाहून हृदय भरलें असेल ; पोट कसें भरेल ? " नामदेवानें प्रश्न केला.

" अरे, हृदय भरलें म्हणजे पोट आपोआप भरून येतें. हृदय हें पोटापेक्षां मोठें आहे आणि आत्मा हृदयापेक्षां मोठा आहे. ज्याचा आत्मा तृप्त झाला त्याला सारेंच मिळालें, " स्वामी म्हणाले.

" आज तुम्ही कशावर बोलणार आहांत ? " नामदेवानें विचारलें.

" तुझ्यावर, " स्वामी म्हणाले.

" आणि माझ्यावर नाहीं ?" रघुनाथनें विचारलें.

" सांगा ना ? " पुन्हा नामदेवानें विचारलें.

" सांगितलें ना ? त्याचा अर्थ नाहीं कळला ? " स्वामींनीं विचारलें.

" नाहीं, " दोघे एकदम म्हणाले.

" फुकट तुम्ही, कांहीं प्रतिभा नाहींच तुम्हांला. खानदेशी रे खानदेशी, " स्वामी थट्टा करीत म्हणाले.

" खानदेशचें अन्न खाऊन खानदेशला निंदतां का ? " रघुनाथनें विचारलें.

" नेहमीं तर खानदेशची स्तुति करतां. आजच कां बरें हें वंद्यनिंदन, हा पूज्यपूजाव्यतिक्रम ? " नामदेवानें विचारलें.

" अरे, तुझ्यावर म्हणजे कलेवर. तूं म्हणजे मूर्तिमंत कला, " स्वामी म्हणाले.

" मला समोर पाहून तुम्हांला स्फूर्ति येईल, तुमच्या प्रतिभेला पल्लव फुटतील, विचारांचे भुंगे गूं गूं करीत तुमच्याकडे येतील, होय ना ? " नामदेवानें विचारलें.

" तुला समोर पाहून डोळे मिटतील, ओंठ मुके होतील, वाचा पांगुळेल, विचार पळेल. तुला समोर पाहून प्रतिभेचे पंख मिटलेले राहातील, कल्पना शांत होईल, " स्वामी म्हणाले.

" नामदेव, तूं तर मग व्याख्यानाला येऊंच नकोस, " रघुनाथ म्हणाला.

" मी कोठें तरी दूर बसेन. दिसणार नाहीं अशा ठिकाणीं बसेन, " नामदेव म्हणाला.

" परंतु स्वामींचे डोळे तुला हुडकत राहातील आणि असून न दिसलास तरीही ते डोळे मिटतील. मुलें टाळया पिटतील. शिट्या फुंकतील, खानदेशाची फजीति होईल. अमळनेरचें नांव जाईल, " रघुनाथ म्हणाला.

" किती वेळ आपण जेवतों आहोंत, " स्वामी म्हणाले.

" तुमच्याबरोबर किती जेवलें तरी पोट भरत नाहीं. तुम्ही आम्हांला उपाशींच ठेवणार ? " नामदेव म्हणाला.

" मग आधीं कां रे नाहीं जेवून घेतलेंत ? " स्वामींनीं विचारलें.

" तुम्ही नसतां तेव्हां पोट आधीं भरलेलें असतें. आमचें तुमच्या उलट आहे. तुमचें आम्हांला पाहून पोट भरलें. आमचें तुम्हांला पाहून पोट रिकामें झालें. तुम्ही नसतां तेव्हां एकेक घांस आम्ही बळेंच गिळीत असतों. तुमच्या थोड्या फार आठवणी जेव्हां आम्ही काढतों, तेव्हां मग चार घांस चटाचट जातात, " नामदेव म्हणाला.

" मी म्हणजे वाटतें तुमची मीठमिरची, चटणी, लोणचें ? " स्वामींनीं विचारलें.

" तुम्ही म्हणजे आमचें सर्व कांहीं, " नामदेव म्हणाला.

जेवणें झालीं.

" भांडीं घासावयाचीं कीं काय ? " स्वामींनीं विचारलें.

" घासूं सायंकाळीं, " रघुनाथ म्हणाला.

" तोंपर्यंत त्यांना असेंच रडत ठेवणार ? आपल्यासाठीं तीं घाणेरडीं झालीं, त्यांना लगेच स्वच्छ करून ठेवूं या, " स्वामी म्हणाले.

" चला घासूं. आम्ही घासूं व तुम्हीं विसळा, " नामदेव म्हणाला.

भांडीं घासून झालीं. अडीच वाजायची वेळ झाली.

" तुम्हीं जरा पडा, " नामदेव म्हणाला.

" थोडें कांततों. गांडींत गर्दी होती फार. त्यामुळें झालें नाहीं, " स्वामी म्हणाले.

स्वामी सूत कांतीत बसले. मनांत विचार करीत होते. तीन वाजले.

" चला आतां जाऊं, " रघुनाथ म्हणाला.

" चला, " स्वामी म्हणाले.

" बरोबर कांहीं घ्यावयाचें आहे ? " नामदेवानें विचारलें.

" फक्त मला घेऊन चल, " स्वामी म्हणाले.

कॉलेजच्या सभागृहांत विद्यार्थी जाऊन बसले होते. हे कोणते स्वामी, कसे आहेत, दाढी वगैरे आहे कीं काय, रंगीत वस्त्रें आहेत कीं काय, पायांत खडावा आहेत कीं काय, कसें बोलतात, काय करतात, एक का दोन, अनेक प्रकारची जिज्ञासा मुलांना होती. विद्यार्थिनीही जाऊं लागल्या. सभागृह भरून गेलें.

ते पाहा कांहीं अध्यापक, कांहीं आचार्य, स्वामी व चिटणीस येत आहेत. स्वामींना पाहून टाळ्यांचा कडकडाट झाला. त्यांची ती उंच, भव्य, दिव्य मूर्ति पाहून मुलांना आनंद झाला. राष्ट्राच्या सर्व खुरटलेल्या संसारांत उंच कांहींतरी दिसणें किती आशादायी असतें, स्फूर्तिदायी असतें ! उंच मनुष्य, उंच मन, उंच विचार, उंच ध्येयें असें उच्चदर्शन एक प्रकारच्या उंच वातावरणांत घेऊन जातें.

स्वामींची ओळख करून देणार ? चिटणीसांनीं तें काम रघुनाथाकडे सोंपविलें. रघुनाथ उभा राहिला. काळासांवळा, तेजस्वी, किडकिडीत, उंच रघुनाथ उभा राहिला. रघुनाथ बोलूं लागला.

" गुरुजन व विद्यार्थी बंधुभगिनींनो, आजच्या वक्त्यांची ओळख मला करून द्यावयाची आहे. आजचे वक्ते सर्व हिंदुस्थानभर हिंडले आहेत. हिंदुस्थानांतील सजीव निर्जीव सृष्टि त्यांनीं पाहिली आहे. वाळंवटें पाहिलीं आहेत, सुपीक गंगायमुनांच्या कांठचे प्रदेश पाहिले आहेत. पर्वतांतून हिंडले आहेत, मैदानांतून भटकले आहेत. त्यांनीं अनेक संस्था पाहिल्या आहेत. अनेक ठिकाणीं कामही केलें आहे. परंतु त्यांना समाधान झालें नाहीं. परिव्राजक असतांना ते अमळनेर येथें आले. तेथील छात्रालयाच्या चालकांनीं स्वामींना आपल्या संस्थेंत घेतलें व गेलीं तीन वर्षें ते तेथें आहेत. तेथील मुलांच्या मनांवर सत्संस्कार करण्याचें त्यांचें काम रात्रंदिवस चाललेलें असतें. देशाची

एकच चिंता त्यांना आहे. गरिबांचें दुःख पाहून ते झटतात. ते गांवें झाडतात, हरिजनांना शिकवितात, हरिजनांच्या आजारी मुलांची शुश्रूषा करतात. ते खादी विकतात, मुलांसाठीं रोज हस्तलिखित दैनिक लिहितात. ते नवजीवन देत आहेत. त्यांचें थोर हृदय, विशाल व व्यापक बुद्धि, त्यांची तळमळ, त्यांची सेवावृत्ति, त्यांचें अनंत प्रेम मी थोडक्या वेळांत किती सांगूं ? अशा एका थोर विचारवंताचे, ध्येयदर्शी पुरुषाचे, सेवारताचे शब्द आपण शांतपणें ऐकून घ्या असें सांगून मी आपली रजा घेतों."

चिटणीस उभे राहिले. ते म्हणाले, "आजच्या सभेला अध्यक्ष नको. आजचे सन्मान्य वक्ते आतां आपलें भाषण सुरू करोत अशी सर्वांच्या वतीनें मी त्यांना विनंति करितों."

स्वच्छ खादीच्या पोषाखांतील ती भव्य मूर्ति उभी राहिली.

"मित्रांनो, तुम्हां सर्वांना पाहून मला अपार आनंद होत आहे. काळ्या-सांवळ्या, सजल मेघांना पाहून मोराला आनंद होतो. तो आपला पिसारा पसरतो, नाचतो, तन्मय होतो. तसेंच तुम्हांला पाहून मला झालें आहे. तरुण म्हणजे ओल्या हृदयाचे, रसरसलेल्या भावनांचे, जिज्ञासू वृत्तीचे, बुभुक्षित बुद्धीचे जीव होत. ध्येयांना मिठी मारूं पाहाणारे, त्यागाला कवटाळूं पाहाणारे, संसारांतील चिखलांत अद्याप न बरबटलेले असे तुम्ही आहांत. अनंत आकाश तुमच्या समोर आहे, अपार भविष्य तुमच्या समोर आहे. ह्या अनंत आकाशांत कोठें उड्डाण करणार, ह्या अपार भविष्यांत काय करणार ? तुमच्या विचारांतून, तुमच्या स्वप्नांतून, तुमच्या ध्येयांतून उद्यांचा भारत सजला जाणार आहे. तुम्ही उद्यांचे जनक आहांत, भविष्य काळाचे विधाते आहांत. ही जबाबदारी तुम्हीं ओळखली पाहिजे. तुमच्या ओंठांवर जीं गाणीं व जे शब्द खेळत असतील त्यांतून उद्यांचे पोवाडे, उद्यांचीं महाकाव्यें, उद्यांचें सारस्वत, उद्यांचा इतिहास निर्माण होणार आहे. एका रशियन ग्रंथकारानें म्हटलें आहे, 'तरुण कोणतीं गाणीं म्हणतात तें सांगा म्हणजे त्यांच्या राष्ट्राचें भवितव्य मी सांगेन.' मीही तुमचीं गाणीं विचारावयास आलों आहें. कोणतीं गाणीं तुम्हीं तुमच्या ओंठावर खेळवतां ?

**'तूं अशीच निशिदिन टाकी गडे मोहिनी ।**
**निशिदिन टाकी गडे मोहिनी ॥'**

डोळे हे जुल्मी गडे, रोखुन मज पाहूं नका ।
आग उगा लावूं नका ॥ '

असलीं गाणीं तुमच्या ओंठावर आहेत कीं

' भारतमाता हांका मारी ।
चला चला रे करूं तयारी ॥
कुरवंडी करुं निज देहाची ।
पूजा बांधूं भारतभूची ॥
लाखों बंधू मरति उपाशी ।
खातां कैसे पोळितुपाशी ॥
सुचो, रुचो ना आतां कांहीं ।
हांका मारी भारतमाई ॥ '

असलीं गाणीं तुमच्या ओंठावर आहेत ? आजची कला तुम्हांला काय सांगते आहे, काय शिकवीत आहे ?

" आजूबाजूच्या जीवनाचें रान पेटलें असतां त्या नीरोप्रमाणें तुम्ही का पेटी वाजवीत बसणार ? तुम्ही खात पीत आलापत बसणार ? काय आहे आजच्या कलेचा तुम्हांस संदेश ?

" कलेचा संदेश ? हा शब्दप्रयोग तुम्हांला चमत्कारिक वाटेल. कलेसाठीं कला हें थोतांड हल्लीं माजलें आहे. कलेसाठीं कला ही वस्तूच अस्तित्वांत नाहीं. निर्विकार व निर्विचार कला असूं शकते का ? चित्र पाहा, गीत ऐका, अभिनय पाहा, पुस्तक वाचा. त्यांतून मनावर कांहीं परिणाम होतो कीं नाहीं ? जर परिणाम होत असेल तर तो सत् होतो कीं असत् होतो हें पाहिलें पाहिजे. आपण जें जें पेरतों त्याच्यांतून कांहीं उगवणार असेल, त्याच्यांतून पीक येणार असेल, तर तें पीक अफूचें आहे कीं गव्हाचें आहे हें पाहिलें पाहिजे.

"समाजाचें मंगल हें कलेचें ध्येय आहे. हें मंगल कोणीं ठरवावयाचें ? त्या त्या काळांत महापुरुष असतात ते त्या त्या काळांतील समाजाला ध्येयें देत असतात. 'नान्यः पंथा विद्यते अयनाम, एष पंथाः' एतत्कर्म। अशी बाहू उभारून ते घोषणा करीत असतात. आजच्या काळांत कोण महापुरुष आपणांस वाटतो तें आपण पाहिलें पाहिजे. महापुरुष कलावंताला ध्येय देतो व कलावान

त्या ध्येयबाळाला वाढवितो. महापुरुष हा पती आहे व कलावान त्या महापुरुषाची पत्नी आहे. महापुरुष हा द्रष्टा असतो, ऋषी असतो. कलावान त्याच्या भोवतीं प्रदक्षणा घालतो. एकच व्यक्ति ऋषि व कवि अशी क्वचित् दृष्टीस पडते. कलावान व ध्येयवान अशी व्यक्ति फारशी आढळत नाहीं. व्यास, वाल्मिकी हे ऋषीही होते व कलावानही होते. परंतु त्यांतल्यात्यांत व्यासांची प्रतिभा कमी व प्रज्ञा थोर, तर वाल्मिकींची प्रज्ञा जरा कमी, परंतु प्रतिभा थोर असें म्हणावें लागतें. व्यासांना कवि न म्हणतां महर्षि म्हणावें लागेल व वाल्मिकींना महर्षि न म्हणतां कवीश्वर म्हणावें लागेल. ज्ञानेश्वर हे ऋषीही होते व कलावानही होते. रवींद्रनाथ ध्येयें देतील व ध्येयें कलेच्या रंगानें रंगवितील.

"परंतु ऋषित्व व कलात्व ह्यांचा हा संगम दुर्दर्शनीय आहे. महाभाग्यानें तो पाहावयास मिळतो. सामान्य नियम हा कीं महापुरुष हा द्रष्टा असतो, विचारदाता असतो आणि कलावान ते विचार लोकांना समजतील, त्यांच्या जीवनांत शिरतील अशा रीतीनें रंगवितो. विचारांची धगधगीत बाळें कलावान सौम्यसुंदर रमणीय करतो. ध्येयांना घरोघर घेऊन जाणें हें काम कलावानांचें असतें.

"ग्रह ज्याप्रमाणें प्रकाश मिळावा म्हणून सूर्याभोवतीं प्रदक्षणा घालतात, त्याप्रमाणें ध्येयांचा दिव्य प्रकाश देणाऱ्या महात्म्यांच्याभोवतीं कलावंतांनीं फिरलें पाहिजे.

"मग महापुरुष तुम्हांला कोणीही वाटो. तुम्हांला डॉ. मुंजे महापुरुष वाटले तर हिंदुमुसलमानांत ऐक्य कसें निर्माण होणार नाहीं ह्या ध्येयाची सर्वत्र पूजा करा. चित्रें, बोलपट, काव्यें, पोवाडे, गोष्टी, नाटकें, कादंबऱ्या—सर्वत्र असेंच दाखवा कीं हिंदूला मुसलमानाची चीड येईल! तुम्हांला महात्मा गांधी मोठा पुरुष वाटले तर हिंदुमुसलमानांचें ऐक्य, हरिजनोद्धार, खेड्यांतील जनतेचे हाल, खादीचा प्रसार, बंधुभाव, प्रेम, असहकार, निर्भयता, ऐक्य ह्यांना कलेचीं वस्त्रें द्या.

"तुम्हांला लेनिन महापुरुष वाटला तर वर्गकलहाचें, साम्यवादाचें, भांडवलशाहीविरुद्ध शेतकरीमजुरांचें वातावरण तयार होईल अशा कलाकृति तयार करा.

"जो तुम्हांला पूज्य वाटेल, जो युगप्रवर्तक वाटेल, त्याचे विचार प्रत्येक घरीं, प्रत्येक झोपडींत नेण्यासाठीं तुम्हीं तुमची कला घेऊन उठलें पाहिजे. जर्मनींत महायुद्धापूर्वी इंग्रजांचा द्वेष व जर्मनीचें भवितव्य हें ध्येय होतें. जर्मनी-

तील सार्‍या कला ह्या ध्येयाची पूजा करीत होत्या. नाटककार तें दाखवी, चित्रकार तें रंगवी, बोलपट तें बोले, कवि तें गाई, प्रोफेसर तें सांगे, लेखक तें लिही. त्यामुळें सर्व जर्मनींत एक वातावरण विजेसारखें भारलें गेलें होतें. त्यामुळें १९१४ मध्यें बर्लिन विद्यापीठांत हिंडेनबुर्ग ह्यांनीं 'देशासाठीं लढावयास जे तयार असाल ते उठा' असें म्हणतांच खाडकन् सारे उभे राहिले.

"अशा मार्गांनीं राष्ट्रें तयार होतात. ध्येय चुकीचें ठरलें तर राष्ट्राचा नाश होईल. नवीं ध्येयें दुसरा ऋषि देईल. त्या ध्येयबाळांना कलावान वाढवतील. ऋषि एकाच काळीं जन्मले असें नाहीं. सूर्य जसा प्राचीन काळीं होता व आजही आहे, त्याप्रमाणें ऋषि प्राचीन काळीं होते व आजही आहेत. प्रत्येक क्षण सत्ययुगाचाच आहे. सत्याचेच प्रयोग क्षणाक्षणाला चालले आहेत—त्या त्या काळांतील खळबळींतून त्या त्या काळांतील ऋषि निर्माण होत असतो.

"महाराष्ट्रांतील कलावान जीवनापासून अलग झालेले आहेत. राष्ट्रांतील ध्येयांची जीवनांत पूजा नाहीं, मग त्यांच्या लेखणींत तरी कशी होईल? महाराष्ट्रांतील, भारतांतील कलावंतांनीं राष्ट्रांतील ध्येयें आपलींशीं करून राष्ट्रभर नेलीं असतीं तर भारताचें आजचें स्वरूप किती निराळें दिसलें असतें! एका वंदेमातरम् गीतानें जितकी देशभक्ति, जितकी एकराष्ट्रीयता निर्माण केली आहे, तितकी लाखों व्याख्यानांनीं निर्माण झाली नसेल. कलेचें हें भव्य कर्म आहे, दिव्य कर्म आहे. एका रामायणानें आजचा महाभारत तयार केला आहे. स्नेह, दया, सत्य, प्रीति समाजांत जी आहे, ती रामायणानें दिली आहे.

"महापुरुष आपलीं ध्येयें कृतींत आणून जीवनाची कला जगाला दाखवितो. तो जीवितच कलामय, काव्यमय करतो. ही दिव्य जीवनकला—तिचे उपासक ललितकलांनीं झालें पाहिजे. अहंकारानें आपलेच विषारी बुडबुडे उडविणें बंद केलें पाहिजे.

"महाराष्ट्रांतील एक प्रख्यात साहित्यिक एकदा म्हणाले, 'महात्माजींनीं हरिजनोद्धाराची चळवळ सुरू केली. लागले त्यासंबंधीं गोष्टी लिहायला. एक होती म्हारीण. ती गेली पाण्याला. सनातनी आले. त्यांनीं तिला दगड मारले. तिला लागलें. परंतु तिचें मडकें फुटलें. त्याचेंच तिला फार वाईट वाटलें. कपाळांतून रक्ताची धार निघाली, तरी तिला तितकें वाईट वाटलें नसतें. परंतु

फुटलेल्या मडक्यांतून धार लागेल ह्याची तिला चिंता वाटली. झाली गोष्ट. ना कला, ना तंत्र, ना कांहीं.'

"त्या प्रख्यात साहित्यिकांना मला असें विचारावयाचें आहे कीं ती गोष्ट लिहिणाराला तुमचें तंत्र व यंत्र नसेल माहीत. परंतु तुम्ही तर सगळे अभिजात कलावंत, नामवंत कलावंत आहांत ना? मग तुम्हीच कां लिहीत नाहीं त्या हरिजन चळवळीवर? कां तुम्हांला ती वस्तु महत्त्वाची वाटत नाहीं? लाखों लोकांचीं भस्म होणारीं जीवनें पै किंमतीचीं वाटतात? माणसें पशूंसारखीं केलीं जात आहेत—तें पाहून नाहीं का हृदय हालत, नाहीं का जळत बुद्धि, नाहीं का येत डोळ्यांना पाणी?

"महात्माजींसारखा मातींत पडलेल्या राष्ट्राला नवजीवन देणारा महापुरुष! तो हरिजनांसाठीं मोलवान प्राणांचा महान् यज्ञ पेटवतो. दगडांनाही पाझर फोडणारें हें भव्य दर्शन पाहून, तुम्हां कलावंतांचीं हृदयें उडत नाहींत, लेखणी तळमळत नाहीं आणि तुमचें अश्मत्व पाहून, तुमची ही आळशी वृत्ति पाहून जर दुसरा एकादा कमी कलातंत्राचा मनुष्य तें ध्येय आपल्या शक्त्यनुसार मांडूं लागला तर त्याची टर उडवतां का?

"अरे महाराष्ट्रांतील कलावंतांनो! हीं महान् ध्येयें तुमच्या आजूबाजूला तुमचा स्पर्श व्हावा म्हणून तिष्ठत आहेत. ध्येयभगवान्, ध्येयसूर्य तुमच्या दारांत उभा आहे. जरा दारें उघडा व तुमच्या त्या डांसचिलटांच्या, ढेकणांच्या खोलींत हा प्रकाश घ्या. कलेचें महान् स्थान धुळींत मिळवूं नका. कलादेवीला डबक्यांत बुडवूं नका. चिखलांत बरबटवूं नका.

"राष्ट्रांतील दुःखाला वाचा फोडा. पांढरपेशा सुखासीन लोकांना बेचैन वाटेल असें लिहा, असें गा. अशा जळजळीत कलाकृति निर्माण करा कीं सारें राष्ट्र एक हाक देऊन उठेल. शतबंध तोडायला उठेल.

"महाराष्ट्रांतील हजारों खेड्यांतील जनताजनार्दनाचें, दरिद्रीनारायणाचें दर्शन घ्या. खरा महाराष्ट्र म्हणजे कॉलेजांतील प्रेमाचे खेळ करणारीं चार श्रीमंतांचीं पोरें नव्हत. खरा महाराष्ट्र तुम्ही पाहिलाही नाहीं. महाराष्ट्राचें दर्शन न घेतांच भराभरा महाराष्ट्राचे आवडते कादंबरीकार व आवडते कवि तुम्ही होत आहांत. महाराष्ट्राचे आवडते म्हणजे चार सुशिक्षित सुखवेल्हाळांचे हाच अर्थ नव्हे का?

महाराष्ट्रांतील एका प्रसिद्ध कादंबरीकाराचें एक पुस्तक वाचून खानदेशांतील एका खेड्यांतील प्रचारक दुःखानें म्हणाला, ‘ ह्यांत आमचें कुठेंच कांहीं नाहीं.’ ह्यांत आमचें कुठेंच कांहीं नाहीं हे शब्द माझ्या हृदयांत जळजळीत निखाऱ्या-प्रमाणें चर्र करीत गेले. कांहीं कवि शेतकऱ्यांचे चार उसने शब्द काव्यांत वापरून आपण शेतकऱ्यांचे कवि झालों असें मनांत मानीत असतात. परंतु असल्या सोंगांनीं त्या कोट्यवधि जनतेचे कवि होतां येणार नाहीं. तुमचें आंतडें तुटतें का, तुमचें हृदय भडकतें का, डोळे भरतात का, सुखविलास आपोआप दूर फेकले जातात का, खानपान मेजवानी विसरतां का ? हें जोंपर्यंत होणार नाहीं, तोंपर्यंत तुम्ही महाराष्ट्रांतील कोट्यवधि गोरगरिबांचे कैवारी कवि नाहीं. तुम्ही चार सुखी, श्रीमंत लोकांचेच कवि आहांत !

“ राष्ट्र जगायला हवें असेल तर राष्ट्राच्या मुळाला पाणी घालावयाला सर्वांना उठलें पाहिजे. कमळाला फुलवावयाचें असेल तर खालचा देंठ शाबूत हवा. पांढरपेशांचीं मुखकमळें अजून टवटवीत आहेत. हीं मुखकमळें कोट्यवधि खेड्यांतील जनतेच्या जीवनावर लटकलेलीं आहेत. हा खेड्यांतील जनतारूपी देंठ चिखलांत शेवाळांत धडपडत आहे. तेथला ओलावा कमी होत आहे. हा देंठ सुकेल, गळून पडेल आणि हीं वरचीं हसणारीं पांढरपेशी कमळें, तींही धुळींत पडतील !

“ महापुरुष ह्या देंठाची काळजी घ्यावयाला बोलावीत आहेत. महात्माजी, जवाहरलाल तुम्हा कलावंतांना हाका मारीत आहेत. युगपुरुषांच्या हाकेला ओ द्या. काळपुरुषाची हाक ऐका. राष्ट्राचीं नवीन ध्येयें रंगवून, नटवून घरोघर न्या. ध्येयाचे दीप घरोघर लावा. अंधार दूर करा. अंधार दूर करणें, आनंद निर्माण करणें, दुःख, दैन्य, निराशा झडझडून दूर करणें, ध्येयपूजेला सर्वांना चैतन्य, स्फूर्ति व उत्साह देणें हें तुमचें काम आहे ! हें काम हातीं घ्या. कृतकृत्य व्हा. हें ध्येय हातीं घ्या व भारतमातेला हसवा. ”

टाळ्यांचा सारखा गजर होत होता. चिटणीस उभे राहिले. ते म्हणाले, “ तुम्हांला अमृताची मेजवानी मिळाली आहे. इतकें भावनोत्कट व विचार-प्रवर्तक व्याख्यान ह्या सभागृहांत तुम्हीं क्वचित् ऐकलें असेल. हे हृदयाचे बोल होते. हें व्याख्यान म्हणजे एक दिव्य गीतच होतें. आपण सारे उंच वातावरणांत गेलेले आहोंत. तेथूनच आपण आजच्या थोर वक्त्यांवर आभारांची पुष्पवृष्टि करूं या. तुमच्या सर्वांच्या वतीनें हा फुलांचा हार त्यांना मी अर्पण करतों. ”

सभा संपली. कॉलेजांतील आचार्यांशीं थोडा वेळ बोलणें झालें. नामदेव, रघुनाथ व इतर अनेक खानदेशांतील मुलें स्वामींच्याभोवतीं गोळा झालीं. तो मोठा प्रेमळ देखावा होता. खानदेशांतून लोणी व तूप पुण्याला येतें. परंतु खानदेशांतून तेजस्वी विचारांचें साजूक तूप आज प्रथमच आलें होतें. त्यांना कृतार्थ वाटत होतें. मुलांना अभिमान वाटत होता.

स्वामी, नामदेव व रघुनाथ ह्यांच्याबरोबर फिरावयास गेले.

" चला पर्वतीवर जाऊं, " नामदेव म्हणाला.

" उंच वातावरणांत जाऊं, " रघुनाथ म्हणाला.

" किती दिवसांनीं मी पुन्हा पर्वतीवर जाणार आहें ! " स्वामी म्हणाले.

" तुमचें व्याख्यान किती सुंदर झालें ! " नामदेव म्हणाला.

" तुम्हीं नामदेवाला पाहिलें कीं नाहीं ? " रघुनाथनें विचारलें.

" नामदेवालाच विचार, " स्वामी म्हणाले.

" मी स्वामींना पाहात होतों. ते मला पाहात होते कीं नाहीं तें मला माहीत नाहीं, " नामदेव म्हणाला.

" सारें तन्मय झालें होतें, " रघुनाथ म्हणाला.

" माझें सारें तुम्हांला गोडच वाटतें. स्तुतिस्तोत्र पुरे, " स्वामी म्हणाले.

" आम्हांला खरोखर वाटतें तें आम्हीं बोलूं नये का ? " नामदेवानें विचारलें.

" तीं पाहा मुलें कशीं उड्या मारीत जात आहेत, " स्वामी म्हणाले.

" पर्वतीवर आपण पळत चढावयाचें का ? " रघुनाथनें विचारलें.

" हो. माझी तयारी आहे, " स्वामी म्हणाले.

" नको. तुम्ही दमाल, " नामदेव म्हणाला.

" दमावयास काय झालें ? " स्वामींनीं विचारलें.

" रात्रींचें जागरण. दुपारीं विश्रांति नाहीं. भांडींही घासायला लागलेत आणि भावनांनीं भरलेलें रसरशीत व्याख्यान. तें व्याख्यान नव्हतें. तें रक्त ओकणें होतें. तुम्हांला दमल्यासारखें नाहीं वाटत ? खरें सांगा हां ? " नामदेवानें भक्तिप्रेमानें विचारलें.

" नामदेव, माशाला पाण्यांत पोहून का दम लागतो ? वांसराला गायीभोवतीं उड्या मारण्यानें का शीण येतो ? सूर्याभोवतीं रात्रंदिवस फिरणारी पृथ्वी ती का थकते ? मी माझ्या ध्येयाभोवतीं प्रदक्षणा घालीत होतों. ज्या विचारसागरांत

नेहमीं डुंबतों, तेथेंच आजही डुंबत होतों. असें व्याख्यान झाल्यावर दमण्या-ऐवजीं मला दुप्पट जोर येतो, स्फूर्ति रोमरोमीं संचरलेली असते. ध्येयाचा स्पर्श हा चैतन्यदायी असतो, " स्वामी म्हणाले.

**' स्वत्स्पर्श अमृताचा । मजला मृता मिळूं दे**
**मम रोमरोमें रामा । चैतन्य संचरूं दे ॥ '**

नामदेवानें चरण म्हटले.

" नामदेव, हे कोठले चरण ? " रघुनाथनें विचारलें.

" स्वामींच्या वहींतले, " नामदेव म्हणाला.

पर्वतीच्या पायऱ्या येतांच स्वामी पळूं लागले. नामदेव व रघुनाथ पळूं लागले. रघुनाथ हूड होता. लहानपणीं सातपुड्याच्या पहाडांत गुराख्यांबरोबर तो शेंकडोंदा चढला, उतरला होता. तो काटकुळा होता. परंतु त्याचें तें शरीर म्हणजे लोखंडाची कांब होती. हरणासारखा, सशासारखा, वानरासारखा उड्या मारीत तो गेला व वरतीं जाऊन बसला. कार्तिकस्वामीच्या मंदिराच्या पाठीमागें जाऊन बसला.

स्वामीही आले. नामदेवही आला. रघुनाथ त्यांना दिसला.

" सर्वांच्या आधीं मी आलों, " रघुनाथ म्हणाला.

" सर्वांच्या मागें मी होतों, " नामदेव म्हणाला.

" मी तुम्हां दोघांच्यामध्यें कैदी होतों, " स्वामी म्हणाले.

स्वामी आजूबाजूस पाहूं लागले. ते गंभीर झाले. त्यांचे डोळे जरा निराळे दिसूं लागले. जीवनदायी गार वारा वाहात होता. पवित्र वेळ होती. सायंकाळ होती. स्वामी उभे राहिले. जणूं दशदिशांना ते वंदन करीत होते. त्यांनीं साष्टांग दंडवत घातलें. क्षणभर ते पडून राहिले. सद्गदित झाले.

रघुनाथ व नामदेव ह्यांना तें भावदर्शन समजेना. स्वामी शांत झाले. डोळ्यांतील भाव जरा ओसरला. मुद्रा सौम्य झाली.

" तुम्हीं का संध्या केलीत ? " नामदेवानें विचारलें.

" पवित्र स्मरण केलें, " स्वामी म्हणाले.

" कोणाचें स्मरण ? " नामदेवानें विचारलें.

" महाराष्ट्राच्या पुण्याईचें, पावित्र्याचें, पराक्रमाचें, त्यागाचें, वैराग्याचें, भक्तिप्रेमज्ञानाचें, " स्वामी म्हणाले.

" आमच्याही डोळ्यांसमोर उभें करा ना तें चित्र." रघुनाथ म्हणाला.

" अरे, ह्या पर्वतीवर कितीकांचे पाय लागले असतील! नानासाहेब पेशवे, भारतीय योद्धे भाऊसाहेब, चिमणासिंहाचा छावा विश्वासराव, ते थोर पहिले माधवराव, ते रामशास्त्री, ते नाना—सारे ह्या पर्वतीवर आले असतील. महादजीसारखे वीर येथें आले असतील. रमाबाईसारख्या थोर सती येथें आल्या असतील! ह्या पर्वतीच्या आजूबाजूस पाहा. तो पाहा सिंहगड! शिवाजीमहाराजांच्या जीवनरामायणांतील सुंदरकाण्ड लिहिणारा तो थोर तानाजी! " आधीं कोंडाण्याचें लगीन, मग रायबाचें!" किती थोर शब्द! ते शब्द आजच्या महाराष्ट्राला नाहीं का कांहीं स्फूर्ति देत! ह्या पर्वतीवर देहू, आळंदी, सासवड, चिंचवड सर्व ठिकाणांहून पवित्र वारे येत आहेत.

" पर्वतीनें पूर्वींचें पावित्र्य पाहिलें, आजचेंही पावित्र्य पाहिलें आहे. ते पुण्याचे महादेवाप्रमाणें थोर न्यायमूर्ति रानडे, ते थोर त्यागमूर्ति निर्भय आगरकर, ते मरतांनाही देशाची चिंता करणारे नामदार गोखले, ते अलोट बुद्धीचे, अलोट धैर्याचे धीरोदात्त लोकमान्य—सारे ह्या पर्वतीवर शतदां आले असतील!

" पर्वतीवरचे अणुरेणु पवित्र आहेत. ते महाराष्ट्राच्या यशापयशाचे इतिहास मला सांगत आहेत. 'भाऊ भाऊ' करीत नानासाहेब येथें मरण पावले! आनंदाश्रु दुःखाश्रु ह्या पर्वतीवर पडलेले आहेत. नामदेव, तुम्हांला थोडक्यांत काय सांगूं? सांगण्यासारख्या मनःस्थितींत मी नाहीं. महाराष्ट्राचीं रामायण-महाभारतें माझ्या हृदयांत उचंबळलीं आहेत. महाराष्ट्राचा जरीपटका भगवाझेंडा, मराठ्यांचा चौफेर उधळणारा घोडा, सारें माझ्या डोळ्यांसमोर येत आहे. मी काय बोलूं? काय करूं?"

स्वामी पुन्हा मूक झाले. बोलणें त्यांना जड जात होतें.

" चला आतां जाऊं," स्वामी म्हणाले.

" चला," नामदेव, रघुनाथ म्हणाले.

" पर्वतीच्या मंदिराला पेशव्यांनीं सोन्याचे कळस लावले. शिवाजी-महाराजांनीं सारें वैभव प्रतापगडाच्या देवीच्या मंदिरासाठीं खर्च केलें; परंतु मराठी राजांचा राजवाडा साधाच राहिला. पेशव्यांचा शनिवारवाडा साधाच राहिला. तेथें सोन्याचे कळस कोणी लावले नाहींत. मराठी राज्याचें वैभव देवासाठीं होतें. देवाचा मोठेपणा!" स्वामी एकदम म्हणाले.

" पर्वतीवर फिरावयास येणाऱ्यांना इतिहासाचें स्मरण होत असेल का ? " नामदेवानें विचारलें.

" ते शरिराला लागणाऱ्या हवेसाठीं फिरावयास येतात. त्यांना आत्म्याची हवा नको असते. येथें पर्वतीवर येऊन ते चिवडा खातील, बोलपटांची चर्चा करतील ! येथील अणुरेणु त्यांच्याजवळ बोलणार नाहींत. येथील वारा त्यांच्याजवळ महाराष्ट्रांतील पावित्र्याचीं व पराक्रमाचीं गाणीं गुणगुणणार नाहीं, " स्वामी म्हणाले.

" असें कां बरें व्हावें ? " नामदेवानें विचारलें.

" आपलें हृदय व बुद्धि ह्यांना थोर विचार झेंपतच नाहींसा झाला आहे, " रघुनाथ म्हणाला.

" ह्याचें एक कारण अहंकार आहे. स्वतःला दिव्य ध्येयें स्फुरत नाहींत आणि दुसऱ्यानें दाखविलेलीं घेण्यांत कमीपणा वाटतो. मग असें स्वतःच्याच खुशामतींत व पोकळपणांत मोठेपणा मिरवितात झालें, " स्वामी म्हणाले.

" आपणांस अजून घरीं जाऊन स्वयंपाक करावयाचा आहे, " रघुनाथ म्हणाला.

" आज नाहींतर लंघनच करूं, " स्वामी म्हणाले.

" परंतु स्वयंपाक करावयास वेळ नाहीं लागणार, " नामदेव म्हणाला.

" आज रात्रीच्याच गाडीनें मी जाईन. दौंडकडून किंवा कल्याणकडून कोठूनही जातां येतें. अगदीं शेवटच्या बाराच्या गाडीनें गेलें तरी चालेल, " स्वामी म्हणाले.

" आलेच आहांत तर राहाना एक दोन दिवस, " नामदेवानें सांगितलें.

" कोठें तरी मुलांत राहायचें तर येथेंच राहिलें, " रघुनाथ म्हणाला.

" येथें राहून काय करूं ? " स्वामींनीं विचारलें.

" कांहीं करूं नका. आमच्या खोलींत पडून राहा. विश्रांति घ्या. मी खरेंच सांगूं का, तुम्ही थकल्यासारखे दिसतां, " नामदेव म्हणाला.

" अतिस्नेहः पापशङ्की, " स्वामी हसून म्हणाले.

" येथें तुम्ही वाचा, लिहा. आमचे कांहीं मित्र येतील, त्यांच्याजवळ चर्चा करा. विचारांचा प्रसार हें कामच आहे, " नामदेव म्हणाला.

" आधीं खोलीवर चला. जेवण वगैरे झाल्यावर पाहूं. " स्वामी म्हणाले.

बोलत, बघत ते घरीं आले. खोलींत आले.

" आपण आधींच प्रार्थना करून घेऊं या, " स्वामी म्हणाले.

" हो. म्हणजे बरें, " रघुनाथ म्हणाला.

प्रार्थना झाली व तेलचूल पेटविण्यांत आली. खिचडी करावयाची असें ठरलें. स्वामी घोंगडीवर पडले होते. पडल्या पडल्या त्यांचा डोळा लागला. किती पटकन् त्यांना झोप आली !

ते पाहा चार पांच मित्र येत आहेत. हळुहळू येत आहेत.

नामदेव खोलीच्या बाहेर व्हरांड्यांत फेऱ्या घालीत होता.

" काय रे नामदेव, बाहेरसा फेऱ्या घालीत आहेस ? स्वामी गेले कीं काय ? " एकानें प्रश्न विचारला.

" ते आंत झोपले आहेत, " नामदेव म्हणाला.

" जेवण वगैरे झालें वाटतें ? " त्यांनीं विचारलें.

" नाहीं. खिचडी होत आहे. ते घोंगडीवर पडले. झोंप लागली. काल रात्रीचें जागरण होतें, " नामदेव म्हणाला.

" आम्ही सहज आलों होतों. म्हटलें कांहीं बोलूं, " नारायण म्हणाला.

" बोला ना, आम्हांला पण ऐकायला सांपडेल, " नामदेव म्हणाला.

" अरे, तुम्ही तर किती वर्षें ऐकत आहांत, " गोविंदा म्हणाला.

" ऐकण्यापेक्षां पाहात आहोंत. स्वामींचें रोजचें निरलस, प्रेममय व त्यागमय जीवन पाहाणें म्हणजेच शिक्षण. मीं प्रश्न असे त्यांना कधींच विचारले नाहींत. कोणीं विचारले तर ते काय उत्तर देतात तें मात्र ऐकतों. परंतु त्यांच्या मुक्या प्रवचनांनींच माझ्या शंका नाहींशा होत असतात. गायीला ढुशा देणारा वत्स भेटला तर तिला अधिकच पान्हा फुटतो. तुम्ही द्या ढुशा, " नामदेव म्हणाला.

" नामदेव, चल रे, " रघुनाथनें हाक मारली.

स्वामीही जागे झाले.

" नमस्कार ! " त्या मुलांनीं अभिवादन केलें.

" बसा, " स्वामी प्रेमानें म्हणाले.

जेवण सुरू झालें व मधून मधून प्रश्नोत्तरें चाललीं होतीं.

" आपलें मिश्रविवाहासंबंधीं काय मत आहे ? " एका मुलानें प्रश्न विचारला.

" आज सारे एकप्रकारें मिश्रविवाहच होत आहेत. जातीय विवाहाच्या नांवावर मिश्रविवाह होत आहेत. खरे मिश्रविवाह मला पाहिजे आहेत ; परंतु आजच्या विवाहांना काय म्हणावें हेंच मला समजत नाहीं. " स्वामी म्हणाले.

" म्हणजे काय ? आम्हांला नीट समजलें नाहीं. " नारायण म्हणाला.

" अरे जात म्हणजे तरी काय ? विणकरानें विणकराच्या मुलीशींच लग्न करावें असें होतें. कारण काय ? त्या दोघांचा आचार, विचार, उच्चार, आहार— सारें समान असणार म्हणून. ज्यांचा आहार, ज्यांचा आचार, विचार, उच्चार समान त्यांची एक जात होय. विणकराला विणकराचीच मुलगी जीवनयात्रेंत उपयोगी पडेल. ताणा कसा करावा, फणी कशी भरावी, पांजण कशी करावी हें माहीत असलेली, त्या धंद्यांतील शब्द, पारिभाषिक ज्ञान माहीत असलेलीच मुलगी विणकराला उपयोगी पडणार ! परंतु बाप शिंपी असतो व नवरा मिळतो वकील ! मुलीनें घरीं शिवणकाम पाहिलेलें. शिवण्याचें यंत्र तिला चालवितां येतें. तिचा वकिलाला काय उपयोग होणार ! परंतु आडनांवें व गोत्रें पाहातात ! आडनांवावरून जात ओळखातात ! रोजचें जें कर्म, त्यावरून ओळखत नाहींत. एका दृष्टीनें वकील म्हणजे वैश्यच तो, पैशांत रात्रंदिवस रमलेला एखाद्या ज्ञानांत रमलेल्या खऱ्या ब्राह्मणानें तेथें मुलगी कां द्यावी ? मी वैश्य कमी मानतों असें नाहीं. मला समाजसेवेचे सारे धंदे पवित्र वाटतात. खादी वापरणारा, शाकाहार घेणारा, देशासाठीं तळमळणारा एखादा हरिजन—तो माझ्या जातीचा आहे आणि माझा सख्खा भाऊही जर खादीची टर उडवीत असेल, परदेशीला परब्रह्म मानीत असेल, देशाच्या ध्येयांची थट्टा करीत असेल, तर तो माझ्या जातीचा नव्हे. एका आईच्या पोटचें असून भागत नाहीं. एका ध्येयाच्या पोटचें असावें लागतें. म्हणून तर तुकाराम-महाराज म्हणत,

**' माझिये जातीचें मज भेटो कोणी. '**

आणि बर्नार्ड शॉ एकदा महात्माजींना म्हणाले, ' तुम्ही आम्ही एका जातीचे आहोंत. ' म्हणूनच महात्माजी व राजगोपालाचारि ह्यांच्या मुलामुलींत झालेला विवाह हा खरा जातीय विवाह. कारण महात्माजींशीं जास्तींत जास्त जवळ असे राजाजीच आहेत. त्यांची जात एक आहे. विलायती वस्त्रांचा व्यापार करणारा गुजराथी व्यापारी महात्माजींच्या जातीचा कसा होईल ?

" विवाहाचा प्रश्न खरोखर गंभीर झाला आहे. कांहींकांहीं जाती, कांहींकांहीं शाखा इतक्या लहान आहेत कीं त्या जर जवळच्या सदृश अशा दुसऱ्या जातींशीं मिसळणार नाहींत तर त्या जाती व शाखा नष्ट होतील. त्या त्या शाखांतील साऱ्यांचें जणूं एक रक्त होऊन गेलें आहे. सारे एकमेकांचे आप्त, सगेसोयरे. हे डबक्यांतील विवाह बंद झाले पाहिजेत. नाहींतर प्रजा खुरटी होत जाईल, असें वाटतें. त्या अगदीं लहान डबक्यांतच, एक झालेल्या जातींतच विवाह करणाऱ्या लोकांकडे पाहा. दिवसेंदिवस त्यांची उंची कमी होत आहे. खुरटी प्रजा निर्माण होत आहे. ह्या गोष्टीला जर आळा न घातला तर अंगुष्ठाएवढे बालखिल्य भारतवर्षांत निर्माण होऊं लागतील!

" त्या त्या जातींतच विवाह हे कांहीं काल ठीक असतात. परंतु कांहीं शतकें गेलीं कीं मिश्रविवाह करणेंच योग्य असतें असें मला वाटतें. जमिनींतून एकच पीक आपण नेहमीं घेत नाहीं. सारखी कपाशीच घेत नाहीं. मध्येंच एकादे वर्षीं बाजरी, भुइमूग असें त्या जमिनींत पीक घेतों आणि मग पुन्हा कपाशी घेतों. आज शेंकडों वर्षें त्या त्या जाती एकच पीक घेत आहेत. त्यामुळें टपोरे दाणे निपजत नाहींसे झाले आहेत. अपवाद असतील ते सोडून दिले पाहिजेत. सर्वसामान्य जनता पाहिली पाहिजे. शरीराची, मनाची, बुद्धीची निस्तेजता स्वच्छ दिसत आहे. ह्याला इतर दारिद्र्य, दास्य हीं कारणें आहेतच ; परंतु हे डबक्यांतील विवाह हेंही एक कारण असावें.

" सापापेक्षांही अकरमाशा अधिक क्रूर असतो. अकरमाशा हा मिश्रविवाहाचें अपत्य असतो. मिश्रविवाहानें गुणधर्म वाढतात हाच त्याचा अर्थ. आपले सारे ऋषि मिश्रविवाहाचीं फळें आहेत. अर्जुनापेक्षां बभ्रुवाहन अधिकच पराक्रमी! कारण तो नागकन्येपासून झाला होता! म्हणून आपली म्हण केली, ' ऋषीचें पाहूं नये कूळ, नदीचें पाहूं नये मूळ. ' परंतु ह्यांत कमीपणा थोडाच आहे? त्यांत नीतीचें उल्लंघन थोडेंच आहे? आपण जेथें विवाह केला, तेथें जर प्रेमानें, निष्ठेनें राहिलों नाहीं तर ती अनीति होईल. परंतु भिन्न जातींत विवाह केल्यानें नीति कशी काय बिघडते? आणि जात तरी कोठें आहे?

" आज मिश्रविवाहाची वेळ आहे. सर्वसामान्य जनता अधिक उत्साही व तजस्वी व्हावयास हवी असेल तर आज मिश्रविवाहाशिवाय गत्यंतर नाहीं. मिश्रविवाहानें ऐक्य वाढेल वगैरे कल्पना फोल आहेत. युरोपियने वाटल तेथें

लग्न लावतात. म्हणून का त्यांचीं भांडणें कमी होत आहेत? उत्साह, तेज, बुद्धि हीं वाढतील. कांहीं शतकें अशीं गेलीं कीं पुन्हा जातीय विवाह सुरू करावेत. एकच पीक एका जमिनींत वर्षांनुवर्षें घेऊं नये हा त्याचा नियम होय.

"थोडक्यांत सांगावयाचें झालें तर विवाह डबक्यांतील नसावेत व समुद्रांतीलही नसावेत; प्रवाहांतील, विशाल नदींतील असावेत. एकदम एखादें अमेरिकेंतील पीक भारतभूमींत येणार नाहीं; भारतीय बीं अमेरिकेंत फोंफावणार नाहीं. परंतु गुजराथमधलें महाराष्ट्रांत, ओरिसाचें आंध्रांत पेरण्यास हरकत नाहीं. समुद्र नको, डबकें नको; नदी घ्या."

"तुमचें जेवण तसेंच राहिलें," गोविंदा म्हणाला.

"त्यांना नाहींतरी भूक नव्हतीच," रघुनाथ म्हणाला.

"आम्हींच बळें बसविलें," नामदेव म्हणाला.

"पण आतां लागली आहे भूक. वाढ थोडी खिचडी," स्वामी म्हणाले.

"ह्या मुलांना पाहून तर तुमचें पोट भरलें असेल ना?" नामदेवानें विचारलें.

"आम्हांला पाहून उलट त्रास मात्र होत असेल," नारायण म्हणाला.

"मुलें पाहून खरोखरच मला आनंद होतो," स्वामी म्हणाले.

"आतां आधीं जेवण होऊं दे. मग बोलूं." नारायण म्हणाला.

जेवणें झालीं. स्वामी हात धुवून येऊन बसले.

"तुम्हांला कालचें जागरण आहे," एक मुलगा म्हणाला.

"थोडा वेळ बोलूं," स्वामी म्हणाले.

"तुमचें यंत्राबद्दल काय मत आहे? महात्माजी तर यंत्रें नको म्हणतात," गोविंदानें विचारलें.

"महात्माजी सर्वत्र यंत्रांना नांवें ठेवतात असें नाहीं. त्यांना शोध पाहिजे आहेत, यंत्रें पाहिजे आहेत. महात्माजींची दृष्टि सदैव शास्त्रीय असते. ते सारे प्रयोग करीत असतात. खाण्यापिण्याच्या पदार्थांचेंही त्यांनीं शास्त्रज्ञांकडून पृथक्करण करून घेतलें. ते बुद्धिवादी आहेत. बुद्धीला पटेल तेंच ते घेतात. क्लोरोफॉर्म, विजेचे दिवे, शिवण्याचें यंत्र ह्यांना त्यांचा विरोध नाहीं. सुधारलेला चरका शोधून काढण्यासाठीं त्यांनीं तर बक्षीस लाविलें होतें. आपल्याकडील मोठमोठे कारखानदार कोट्याधीश आहेत. परंतु शोध लावणाऱ्यांना त्यांनीं

बक्षिसें ठेविलीं नाहींत. महात्माजी त्या यंत्रांच्या विरुद्ध आहेत, ज्यांचा समाजावर अनिष्ट परिणाम होतो," स्वामी म्हणाले.

"अनिष्ट परिणाम यंत्रांमुळें होतो का समाजरचनेमुळें होतो? तीं यंत्रें जर समाजाच्या मालकीचीं असतील तर मजुरांची वाईट स्थिति होणार नाहीं. फायदा व्यक्तीच्या हातांत न जातां मजुरांना मिळेल. श्रमणाऱ्याला मिळेल. त्यांच्यासाठीं सुंदर स्वच्छ मोकळीं घरें, कमी तास काम, करमणुकीचीं निर्मळ साधनें, बागा, सर्व कांहीं तयार करण्यांत येईल. त्यांच्या मुलांची काळजी घेण्यासाठीं संगोपनगृहें काढूं. अग्नीनें पाकनिष्पत्तीही होते व आगही लावतां येते. जगांत कोणत्याही वस्तूचा सदुपयोग व दुरुपयोग करतां येतो. यंत्रशक्तीचा मनुष्याचे श्रम कमी करण्याकडे कां उपयोग केला जाऊं नये? मनुष्यानें बैलाप्रमाणें, रेड्याप्रमाणें दिवसभर राबतच राहावें असें तुम्हांला वाटतें? समजा. प्रत्येक गांवची शेती एकत्र केली कीं वाफेच्या नांगरानें ती नांगरतां येईल. आजचीं चारचार हात शेतें आहेत तोंपर्यंत यांत्रिक शेती करतां येणार नाहीं हें खरें. परंतु शेती एकत्र केल्यावर तें शक्य होईल. भराभरा सारीं कामें होतील," नारायण म्हणाला.

"यंत्रावर दोन आक्षेप घेतां येतील. समाजरचना तुम्हीं बदललीत व सर्वांची स्थिति सुधारलीत तरी दुसऱ्या गोष्टी राहातातच. यंत्रामध्यें मनुष्याच्या निर्माण-शक्तीला वाव नाहीं, व्यक्तित्वाला वाव नाहीं. तें यंत्र आहे. त्याच्याजवळ आपण यंत्रासारखे उभे राहातों! यंत्रानें मनुष्यही यंत्र होतो. चरक्यावर सूत कांततांना मी कला निर्माण करतों आहें असें मला वाटतें. ती दुधाची धार निघतांना पाहून डोळे कृतार्थ होतात, बोटें धन्य होतात. यंत्रानें काढलेल्या सुतांत ना माझा आत्मा, ना माझें हृदय. विणकर वस्त्र विणतो! किती तल्लीन होतो तो! आपल्या हातून का हें वस्त्र विणलें गेलें असें मनांत येऊन तो कसा नाचतो! वेरूळचें कैलास लेणें खोदणारा तो दिव्य शिल्पी असाच नाचला होता असें सांगतात! आपण आपल्या कर्मांत जणुं आत्मा पाहातों. यंत्रानें तो आनंद मीं गमवावा का? शिवणकामाच्या यंत्रांत कलेला वाव आहे. तें मशीन कांहीं एकदम कपडा शिवून देत नाहीं. जेथें स्वतःच्या बुद्धीला, हृदयाला, कलेला वाव आहे, आपलें स्वतःचें असें कांहींतरी वैशिष्ट्य, आपला स्वतःचा रंग जेथें ओततां येईल तें यंत्र ठेवा.

" दुसरें असें कीं समजा, तुम्हीं यंत्रानें श्रम वांचविलेत, आपल्या देशांतील माल इतर देशांत तर नाहीं ना पाठवावयाचा ? कारण इतर देशांत पाठवावयाचा असेल तर तो देश मला गुलाम करावा लागेल. त्याचे धंदे बुडवावे लागतील. तसें तर आपणांस नाहीं करावयाचें ? मजूरसाम्राज्यशाही तर नाहीं ना निर्माण करावयाची ? आपल्या देशाच्या गरजांपुरता माल यंत्रसाहाय्यानें निर्माण करावयाचा. कांहीं थोडे लोक यंत्रांच्या साहाय्यानें शेती करून समाजाला धान्य देतील; कांहीं थोडे लोक यंत्रांच्या साहाय्यानें वस्त्र देतील. असें चाललें रोज दोनचार तासच काम. पंचवीस तासच काम. पंचवीस तासांचाच आठवडा समजा. मनुष्याला कामापेक्षां रिकामा वेळ जर जास्त उरला तर तो वेळ मनुष्य सार्थकींच लावील का ? सैतान रिकाम्या हातांना वेडेचाळे करायला लावीत असतो. रिकामा वेळ कलासंवर्धनांत, आत्म्याच्या निरागस आनंदांतच जाईल का ? कोणी वनसंचार करतो आहे, कोणी खगोलशास्त्राचा अभ्यास करतो आहे, कोणी चित्रकला अभ्यासितो आहे, कोणी गायनकला जवळ करतो आहे, कोणी नर्तन शिकतो आहे, कोणी वादनांत प्रवीण होऊं पाहातो आहे, कोणी फुलाफळांचे प्रयोग करतो आहे—असें होईल का ?

" का रिकामा वेळ सांपडला तर मनुष्य अधिक पतित होईल ? तो बोलत बसेल, का भांडत बसेल, का काम करील ? " स्वामींनीं विचारलें.

" स्वामी ! मजुराला थोडा वेळ विसावा मिळाला तर तो वेळ कसा दवडील ह्याची तुम्हांला चिंता वाटते आणि आजचे हे खुशालचेंडू भांडवलवाले, हे जहागीरदार, सावकार, कारखानदार हे आपला वेळ सार्थकींच लावीत असतील नाहीं ? मोटारींतून हिंडावें, नाचतमाशे करावे, वेश्यांच्या संगतींत रात्री दवडाव्या, अजीर्ण होईपर्यंत खावें व मग वर सोडे प्यावे—ही संस्कृतीच नाहीं का ? हा आत्म्याचा विकासच आहे नाहीं ? गाद्यांगिरद्यांवर शेणगोळ्यासारखे लोळत पडणारे हे किडे, हीं बांडगुळें, हे सैतानी साप—हे कोणती संस्कृति निर्माण करीत आहेत ? एकीकडे मजुरांचीं दुःखें ह्यांना दिसत नाहींत आणि तिकडे मंदिरें उभारतात ! एकीकडे मजुरांच्या मानेवर हे पाय देतात आणि तिकडे राष्ट्राची मान वर व्हावी म्हणून देणग्या देतात ! दुसऱ्यांचें दुःख न समजण्याइतके जड झालेले हे लोक ह्यांचा आपण उदोउदो करतों ! धर्मरक्षक व संस्कृतिसंवर्धक म्हणून त्यांचे पुतळे करितों ! कसें हें सारें तुम्हांला सहन

होतें ? भ्रामक तत्त्वज्ञानें कां निर्माण करतां ? मजूर म्हणे कसा वागेल ? रिकामा वेळ मिळाला तर पतित होईल ! होऊं दे पतित ! खाऊन पिऊन होऊं दे पतित. ह्या साऱ्या पतित जगांत त्यानेंच मरमर मरून पुण्यवंत राहावें का ? लाथा खाऊन देवाचें व्हावें का ? होऊं देत सैतानाचे, परंतु सुखी होऊं देत."

"आणि स्वामी ! तुम्ही मनुष्याच्या सत्प्रवृत्तीवर कां विश्वास ठेवीत नाहीं ? सत्याग्रह करतांना महात्माजी मनुष्यांतील सदंशावर विश्वास ठेवितात. मग ह्या वेळेस कां ठेवूं नये ? मनुष्य हा मुळांत पापी आहे का पुण्यवान आहे ? ख्रिस्ती धर्म मानतो कीं मनुष्य हा मुळांत पापीच आहे. उपनिषदें म्हणतात मनुष्य परब्रह्म आहे. कोणतें स्वरूप खरें ? मनुष्याला रिकामा वेळ मिळाला तर तो वाईटच वागेल असें कां गृहीत धरतां ? श्रीमंत आपला रिकामा वेळ वाईट दवडतात. त्यांना मुळींच काम नसतें. परंतु यंत्रयुग आलें तरी कांहीं श्रम हा करावा लागणारच ! तेवढा श्रम माणसाला पुरे. अमेरिकेंतील थोरोनें एके ठिकाणीं म्हटलें आहे, 'जा, जरा काम करा, अंगांतून घाम काढा, म्हणजे तुमचा सैतान दूर पळेल. तुमची पोटदुखी दूर होईल.' शरीर व बुद्धि दुबळीं होणार नाहींत इतका श्रम राहीलच. मनुष्यस्वभावावर श्रद्धा ठेवूनच चालूं या. तो मुळांत मंगल आहे असें धरून वागूं या. पाहूं या काय होतें तें. होऊं दे हाही प्रयोग," गोविंदा म्हणाला.

"सामुदायिक कर्मे करण्यांत मनुष्याची नीतिमत्ता वाढलेली असली पाहिजे. नाहींतर जें सर्वांचें काम तें कोणाचेंच नाहीं. प्रत्येक जण जर टंगळमंगळ करील तर काम कसें होईल ? कांहीं प्रामाणिक लोक ज्याप्रमाणें स्वयंसेवकांत मरेमरेतों काम करितात आणि कांहीं टंगळमंळ करितात, तसें व्हावयाचें. अधिक स्वातंत्र्य म्हटलें कीं अधिक नीतिमत्ता आली; अधिक जाणीव व जबाबदारी आली," स्वामी म्हणाले.

"जाणीव व जबाबदारी अकस्मात् थोडीच येणार आहे ? असें चुकत चुकतच पुढें जावें लागेल. ज्याप्रमाणें आपण म्हणतों कीं, चूक करण्याचेंही स्वातंत्र्य आम्हांला हवें आहे, तसेंच हें. सुराज्यापेक्षां माझ्या प्रयोगांचें स्वराज्य मला पाहिजे आहे. जनतेच्या प्रयोगांचें स्वराज्य आम्हांस पाहिजे आहे. सामुदायिक प्रयोग आम्ही करूं. कर्तव्याची जाणीव देऊं. उदाहरणानें दाखवूं.

आदर्श हे सर्वत्र असतीलच. जगांतील सारे प्रयोग मंगलावर श्रद्धा ठेवून चालतात. आमचाही होऊं दे तसा प्रयोग.

“ दिवसभर काम करून दमलेला मनुष्य घरीं येतांच पडतो व झोपीं जातो. त्याला वाटेल ते चाळे करण्यास वेळच नाहीं. अशा प्रकारें वागण्यांत मानवाचा विकास नाहीं. त्याला रिकामा वेळ मिळूनही, त्याची शक्ति शिल्लक ठेवूनही, उत्साह असूनही जर तो नीट वागला तरच खरें. दडपून ठेवल्यामुळें चांगलें वागणें म्हणजे ती गुलामगिरीच होय. कामामुळें मनुष्याची खची करायची व त्याला पावित्र्याचें प्रशंसापत्र द्यावयाचें. अशा प्रकारची ही तुमची विचारसरणी दिसते, ” गोविंदा म्हणाला.

“ यंत्रांमुळें जीवनांतील काव्य कमी होईल असें मला वाटतें. मनुष्याच्या-भोवतीं वाफेचा नांगर, शिवण्याचें यंत्र, सायकल, मोटार अशीं सारीं निर्जीव यंत्रें जमा केल्यावर घोडा, बैल वगैरेंची आपणांस जरूरच नाहीं. परंतु माझ्याभोवतीं घोडा आहे, माझा बैल माझ्याजवळ आहे—असें माझें चित्र असावें, असें मला वाटतें. घोड्याला मीं खाजविलें कीं घोडा प्रेमानें फुरफुरतो, बैल माझा आवाज ओळखतो. माझ्या प्रेमाला त्याच्याकडून उत्तर मिळतें. मीं सायकलला कितीही खाजवलें, कुरवाळलें तर सायकल का मला चाटील? वाफेचा नांगर का मला पाहून नाचेल? प्रेमाच्या संबंधानें माणसें व पशु एकत्र सहकार्यानें नांदत आहेत—हें दर्शन मला प्रवित्र व पावन वाटतें, ” स्वामी म्हणाले.

“ तुम्हांला काव्य दिसतें, पण मला गुलामगिरी दिसते. मोटेला तासन्तास जुंपलेला बैल मानवाला धन्यवादच देत असेल नाहीं ? बैलाला बोटबोट आरा टोंचतात, त्याच्या अंगाची चाळण करतात हें काव्यच नाहीं का ? बैलगाडींत कधींही बसावेंसें मला वाटत नाहीं. तुम्ही प्रेमाचे पोवाडे गाणारे लोक बैलास फटके मारीत व आरा टोंचीत खुशाल जातां आणि पुन्हा त्याला काव्य म्हणतां ? माझ्या अंगणांतील दाणे खायला चिमणी येईल व उडून जाईल. तिला पिंजरा ठेवण्याची काय जरूरी ? गायीगुरें राहूं देत रानांत. भोगूं देत स्वातंत्र्य. आपण हरणें उड्या मारतांना पाहातों, त्याप्रमाणें दुरून गायीगुरांना पाहूं, ” नारायण म्हणाला.

“ तुम्हांला गायीगुरांचे प्रेमाचे संबंध दिसत नाहींत का ? ” स्वामींनीं विचारलें.

" गुलामही कांहीं स्वामिनिष्ठ असतात. परंतु तेवढ्यावरून गुलामगिरीची पद्धति राहावी असें का म्हणाल ? एखादा घोडा मालकासाठीं मेला, एखादा कुत्रा प्रेमानें मेला, एखादें मांजर प्रेमानें मेलें, परंतु तेवढ्यावरून प्राण्याची गुलामगिरी क्षम्य ठरत नाहीं, " नारायण म्हणाला.

" आणि सायकलला पुसल्यावर सायकलही आम्हांला धन्यवाद देत नसेल कशावरून ? चैतन्य सर्वत्र आहे ना ? " नामदेवानें विचारलें.

" जाऊं दे. हें पाहा, तुम्हांला यंत्रें हवीं असलीं तरी आज कांहीं निर्माण करतां येत नाहींत. स्वराज्य मिळाल्यावर यंत्रें आणावयाचीं कीं चरखे वाढवावयाचे हा प्रश्न उभा राहील. तोंपर्यंत आपण आपल्या विचारांचा प्रचार करीत राहूं. लोकांना वाटलें यंत्रें हवींत कीं यंत्रें आणिलीं जातील. लोकांना वाटलें ग्रामोद्योग हवा तर त्याची तजवीज करूं. आधीं स्वराज्य मिळवूं या, " स्वामी म्हणाले.

" परंतु ह्या खादीच्या वगैरे अटी आम्हांला भोंवतात ना ? " एकजण म्हणाला.

" गरीब लोकांना त्यामुळें थोडासा आधार देतां आला तर कां न द्या ? " स्वामी म्हणाले.

" लोकांना असा आणा अर्धा आणा मिळूं लागला, त्यांना थोडें खायला मिळूं लागलें तर ते समाधानी होतील व क्रांतीसाठीं उठणार नाहींत. क्रांतीची भूमिका लवकर तयार करावयाची असेल तर असंतोष हवा, " नारायण म्हणाला.

" भाकर देतां येत असली, स्वावलंबनानें, अभिमानानें भाकर देतां येत असली तरी ती न देऊन, उपवास करायला लावून का तो असंतोष निर्माण करावयाचा आहे ? खेड्यांतील अन्नहीन लोकांस थोडें अन्न मिळूं लागल्यानें त्यांची स्वातंत्र्याची तहान का दूर होईल ? तुम्ही दोनदा चारदा जेवून तुमची जर स्वातन्त्र्याची तहान मरत नाहीं, तर त्यांची कां बरें मरेल ? आणि खादीच्या किंवा ग्रामोद्योगाच्या द्वारा जाणारा घास हा साधा घास नाहीं. त्याच्याबरोबर राष्ट्रप्रेम जाईल. त्या घासाबरोबर नवविचार, निर्भयता, स्वातंत्र्य ह्यांचीं जीवन-तत्त्वें गेल्याशिवाय राहाणार नाहींत, " स्वामी म्हणाले.

" पण खादीच्या वगैरे अटी पाळण्यांत एक प्रकारची बुवाशाही आहे. हा संप्रदाय कशाला ? " गोविंदानें विचारलें.

" प्रत्येकाच्या तत्त्वाबरोबर कांहीं चिन्हेंही येतात. त्यांना म्हटलें तर महत्त्व नाहीं, म्हटलें तर आहे. इटलींतील फॅसिस्ट लोक काळे सदरे वापरतात. मुक्ति-फौजेचे लोक भगवे कपडे वापरतात. कॉंग्रेस खादी वापरते. ह्यांत गुलामगिरी कसली ? तें ऐक्याचें चिन्ह आहे. सरकारलासुद्धां खादींतील तेज कळतें. कांहीं ठिकाणीं त्यांनीं चरखे जाळले, गांधीटोपी घालणारांना शिक्षा केल्या ; माहीत आहे का ? खादीच्या पाठीमागें त्याग आहे, तपश्चर्या आहे. खादी पवित्र वस्तु झाली आहे. तुरुंगांत कांतावयास मिळावी म्हणून उपोषणेंही करण्यांत आलीं. खादी म्हटली म्हणजे हें सारें आठवलें पाहिजे. वंदेमातरम् गीत ज्याप्रमाणें त्यागानें, कष्टानें, मरणानें पवित्र झालें आहे, त्याप्रमाणें खादीही झाली आहे. अशी खादी राष्ट्राचें प्रतीक झालें तर काय बिघडतें ? खादी त्यागाचें, ऐक्याचें, श्रमजीवनाचें व यशाचें चिन्ह आहे, " स्वामी म्हणाले.

" खादी वापरली कीं गांधींचें सारें तत्त्वज्ञान आमच्या बोडक्यावर बसवितात. खादी वापरतां नि चिरूट ओढतां, खादी वापरतां नि विडा खातां, खादी वापरतां नि समाजसत्तावाद बोलतां, खादी वापरतां नि हिंसेची चर्चा करतां — अशा प्रकारें लोक आम्हांस छळतात, " गोविंदा म्हणाला.

" ती गांधाळांची चूक आहे. खादीकडे केवळ आर्थिक दृष्टीनें पाहा. ज्या खेड्यांतील उपाशी बंधुभगिनींसाठीं आजच्या परिस्थितींत मी कांहीं करूं शकत नाहीं, त्यांना जर ह्या खादीनें घास मिळत असेल, तर घेऊं दे मला खादी — ह्याच एका विचारानें खादी वापरा असें महात्माजी म्हणतात. आपद्धर्म म्हणून तरी आज ती सर्वांनीं वापरायला हवी. तिच्या पाठीमागें तत्त्वज्ञान काय आहे तें ज्याचा तो जाणे. आपण तें आपल्या बोडक्यावर कोणीं लादलें तर लादून घेऊं नये. त्या भीतीनें खादी न वापरणें म्हणजे भीरुता आहे, " स्वामी म्हणाले.

" पुष्कळ वेळ झाला. तुम्हांला त्रास झाला, " नारायण म्हणाला.

" त्रास नाहीं. तुमचे विचार ऐकून आनंद झाला. आमच्यापुढें तुम्ही जा. तुमचे व महात्माजींचे फारसे मतभेद नाहींत. यंत्र व हिंसा हेच दोन मुद्दे राहातात. हिंसा मनांत आणली तरी शक्य नाहीं आणि यंत्रें स्वराज्य आल्या-शिवाय कोणी उभारूं शकत नाहीं. म्हणून मतभेदाच्या दोन्ही गोष्टी स्वराज्यांत पाहूं. आज एका झेंड्याखालीं काम करूं या. महात्माजी श्रीमंतांना गरीब

करीत आहेत. गिरणीवाल्यांपासून पैसे घेऊन ग्रामोद्योग करीत आहेत व गिरणी-वाल्यांचें कापड घेऊं नका असा प्रचार करीत आहेत. त्यांचेच पैसे घेऊन त्यांना मारीत आहेत. श्रीमंत व गरीब असे वर्गभेद पाडण्याऐवजीं चांगले व वाईट असे वर्गभेद पाडले तर बरें. ही सत् व असत् ह्यांची चुरस होऊं दे. जो श्रीमंत मनुष्य खरोखर सज्जन आहे, तो खरोखर भिकारीच आहे. दामाजी का श्रीमंत होता ? तो क्षणांत दरिद्री झाला. सज्जनांचा वर्ग व दुर्जनांचा वर्ग; असे वर्ग आपण पाडूं या. महात्माजींच्या एका डोळस परंतु निस्सीम भक्तानें एकदा सांगितलें कीं ' जमीनदारांची जमीन आम्ही वांटून देऊं. त्यांच्याजवळ ठेवणार नाहीं.' मला तरी खोल पाहिलें तर तुमच्यांत व त्यांच्यांत फारसा भेद कोठें दिसत नाहीं; म्हणून मी सर्वांचा आहें. राष्ट्रांत धडपड सुरू झाली आहे, ध्येयासाठीं धडपड सुरू झाली आहे, तेजस्वी ज्ञानासाठीं धडपड सुरू झाली आहे, विचारांना खणखणून, वाजवून, पारखून घेण्याची वृत्ति उत्पन्न झाली आहे हेंच भाग्य आहे. जें राष्ट्र धडपडूं लागलें, जागें होऊं लागलें, डोळे चोळून पाहूं लागलें त्याचा भविष्यकाळ उज्ज्वल आहे! श्रद्धेमध्यें भेद असतील, परंतु प्रत्येक पक्ष आपल्या श्रद्धेसाठीं किती तडफडतो, किती त्याग करतो, किती बलिदान करतो हें पाहिलें पाहिजे व त्या त्या त्यागमय श्रद्धेबद्दल पूज्यभाव दाखविला पाहिजे. भाई लोकांचा त्याग अपार आहे. ते चणेकुरमुऱ्यांवर राहातात, रात्रंदिवस श्रमतात, संघटना करतात, उपहास सहन करीत झेंडा उंच राखतात, ह्याबद्दल माझा माथा मी त्यांच्यापुढें नमवीन. श्रद्धाभेद असला तरी त्याग व तळमळ हीं पवित्र व पूज्यच आहेत," स्वामी म्हणाले.

"नारायणला थोडें गातां येतें," रघुनाथ म्हणाला.

"होय का रे नारायण ?" नामदेवानें विचारलें.

"फार येत नाहीं," नारायण म्हणाला.

"म्हणा कीं एखादें गाणें," स्वामी म्हणाले.

नारायणानें आढेवेढे घेतले नाहींत. त्यानें एक लहानसें गोड गाणें म्हटलें.

**मोहुन फसशिल वेड्या**
**रूप जगाचें पाहुन साचें ॥ मोहु० ॥**
**वरून जल तें दिसतें नितळें**
**पंकजाल परि तळिं त्याचे ॥ मोहु० ॥**

" किती सुंदर आहे गाणें ! " स्वामींनीं म्हटलें.

" आतां आम्ही जातों. " असें म्हणून तीं मुलें गेलीं.

स्वामी म्हणाले, " नामदेव, किती वाजले ? "

" अकरा वाजायला आले, " तो म्हणाला.

" नामदेव, मी आजच जातों. उद्यां रात्रीं अमळनेरला पोंचेन. अजून १२-१० ची गाडी मिळेल, " स्वामी म्हणाले.

" तुम्हांला फारच जावें असें वाटत असेल तर आम्ही राहाण्याचा आग्रह करणार नाहीं. तुमचें मन प्रसन्न राहील तें करा. तुमची अंतःस्फूर्ति सांगेल तसें वागा, " नामदेव म्हणाला.

" चला तर मग आपण निघूंच, " स्वामी म्हणाले.

" आपण पायींच जाऊं. येतांना आम्ही सायकलवरून येऊं, " रघुनाथ म्हणाला.

" चला, गप्पा मारीत जाऊं, " नामदेवानें संमति दिली.

सायकलीच्या दिव्यांत तेल आहे कीं नाहीं तें पाहून दोघे मित्र निघाले.

" नामदेव, तुम्ही दोघे पोटभर जेवतां कीं नाहीं ? रघुनाथ व तूं—दोघांचा खर्च तुला चालवावा लागतो. घरून पैसे तर तुझ्यापुरतेच येत असतील, " स्वामींनीं विचारलें.

" मी डबा मागवला किंवा खाणावळींत जेवलों तर जेवढा खर्च येईल, त्यापेक्षां आम्हांला खर्च कमी येतो. मी खाणावळींत गेलों तर चौदा-पंधरा रुपये खर्च येणारच. आम्ही दोघे हातानें स्वयंपाक करतों. आम्हांला दहा रुपये पुरतात. भांडीं वगैरे आम्हीच घासतों. खोलीचें भाडें पांच रुपये आहे. त्यामुळें तशी चिंता नाहीं. रघुनाथला निम्मी नादारी आहे. उरलेल्या फीचे पैसे आम्ही कांहीं मित्र वर्गणी करून जमवितों आणि रघनाथ गोष्टी लिहून कांहीं पैसे मिळवितो. नवाकाळ, चित्रमयजगत् ह्यांतून त्याच्या दोन गोष्टी प्रसिद्ध झाल्या व त्याला दहा रुपये मिळाले. तसेंच गीतेवर त्यानें निबंध लिहिला, त्यांतही त्याला बक्षीस मिळालें आहे. तुम्ही कांहीं चिंता करूं नका. मनाला लावून घेऊं नका, " नामदेव म्हणाला.

" देवपूरच्या आश्रमाचें काय झालें ? जानकू व भिका ह्यांना विणकामाचें शिक्षण देण्यासाठीं पाठवणार होतेत ना ? कांहीं जमलें का ? " रघुनाथनें विचारलें.

"मी अमळनेरच्या छात्रालयांतील मुलांस एक कल्पना सुचविली आहे. दीडशें मुलें आहेत. ह्यांतील शंभर तरी अशीं आहेत कीं महिना चार आणे देऊं शकतील. त्यांना वीस रुपये खर्च येतो. त्यांत चार आणे त्यांना भारी नाहींत. महिना जर १५–२० रुपये असे जमले तर जानकू व भिका ह्यांना मी पाठवीन म्हणतों. दुसरा एक विचार माझ्या मनांत आला आहे तोही सांगतों. छात्रालयाच्या भोजनाची सारी व्यवस्था मीं माझ्याकडे घ्यावयाची. मुलांकडून दर महिना दहा रुपये घ्यावयाचे व त्यांना नीट जेवण द्यावयाचें. मधल्या सुट्टींत ज्यांना कांहीं पाहिजे असेल त्यांना त्याचा खर्च निराळा. मला खात्री वाटते कीं खर्चवेंच वजा आतां दीडदोनशें रुपये तरी उरतील. महिन्याला पंधराशें रुपये जमा होतील. हजार बाराशें रुपयांत नीट काटसरीनें व्यवस्था ठेवली तर सारें कांहीं होईल. मुलांच्या जेवणांतही मी शास्त्रीयता आणीन. हे शंभर-दोनशें रुपये जर दर महिन्याला उरले, तर त्यांतून किती तरी कामें करतां येतील! पंचवीस, पंचवीस रुपये देऊन मला पांच, सात प्रचारक ठेवतां येतील. पुन्हा सारें गाजावाजा न होतां. पाहूं या काय काय होतें तें. धडपडत राहावयाचें!" स्वामी म्हणाले.

"तुम्हांला फार त्रास होईल. तुम्ही का आचारी होणार? आगीजवळ बसणार? मला कल्पनाच सहन होत नाहीं." नामदेव म्हणाला.

"स्वयंपाक करणें मला आवडतें. मला मुलांची आई होऊं दे. माझ्या हातानें तयार करून त्यांना वाढूं दे. देशांतील कामही वाढूं दे. कोठून तरी पैसा उत्पन्न करावयास हवा ना? आचारी होणें का कमी प्रतीचें आहे? नामदेव, सेवेचीं सर्व कर्में पवित्र व सारखीं आहेत. गायत्री मंत्र देणारा विश्वामित्र व समाजांतील घाण दूर करणारा भंगी–दोघांची योग्यता सारखीच. एक आंतरिक स्वच्छता देतो, दुसरा बाहेरची देतो. सेवेच्या कर्मांत तन्मयता किती आहे, हृदय किती ओतलें आहे, बुद्धि किती वापरली आहे, ह्यांवर त्या कर्माची किंमत आहे. प्रकृतीला उपकारक पदार्थ कोणते, भाज्या कोणत्या चांगल्या, इत्यादींचा अभ्यास करून प्रेमपूर्वक जर मीं रसोई केली तर तें कर्म मोक्षाचें अधिकारी आहे. तुम्ही काळजी नका करूं. अजून मीं ठरविलें आहे असें नाहीं; परंतु मनांतील घडामोडी तुमच्याजवळ सांगितल्या पाहिजेत," स्वामी म्हणाले.

" शरीराची काळजी घ्या. तुम्ही आम्हांला पुष्कळ दिवस हवेत हें विसरूं नका, " रघुनाथ म्हणाला.

" रघुनाथ, तुम्हीही शरीराची आबाळ करूं नका. दोघे चांगले राहा. तुमची ही मैत्री पाहून मला कृतार्थ वाटतें. प्रत्यक्ष जीवनांत तुम्ही साम्यवाद आणीत आहांत. स्वतःच्या जीवनापासूनच साम्यवादाला आरंभ करीत आहांत. नामदेव, अभ्यास संभाळून इतर विचार मिळवीत जा. पुण्यांत निरनिराळीं अभ्यासमंडळें असतात. तेथें जावें, ऐकावें, वाचावें, मनांत मनन करावें. ओळखी होतात. जरा माणसाळलेला हो. तूं फार लाजतोस. हजारों मित्र जोडायला हवेत. तरुण महाराष्ट्राचें हृदय एक होऊं दे. समानी व आकूतिः समाना हृदयानि वः । एकमेकांना आशा मिळते, आधार वाटतो. सातारा, पुणें, सोलापूर इकडेही तरुण ध्येयवान होत आहेत, गरिबांसाठीं तडफडत आहेत, हें पाहून तुम्हांला स्फूर्ति येईल. तुम्हा खानदेशांतील मुलांना पाहून पुणें–नगरच्यांना उचंबळून येईल. महाराष्ट्राच्या तरुणांची परस्परांस ओळख होऊं दे. एकमेकांच्या हृदयांतील अशांति, आग, ध्येयाचा ध्यास एकमेकांना दिसूं दे. विचार पाहिजे. विचार हा तरवारीपेक्षां बलवान आहे. राष्ट्रांत सर्वत्र विचारांचे वारे घों घों करूं लागले पाहिजेत. एक वेळ जेवा, परंतु विचारांचें जेवण आधीं मिळवा. शक्य तर नवीन पुस्तकही घ्यावें. मनुष्य शेवटीं भाकरीनें जगत नसून विचारानें जगतो. विचारांची भाकर अधिक मोलवान. तुम्हीं विचारांची भरपूर पौष्टिक भाकर मिळविल्याशिवाय लाखों लोकांना धान्याची भाकर तुम्हांला देतां येणार नाहीं. समजलेत ना ? करा धडपड. विचारानें श्रीमंत होऊन मला येऊन मिळा, " स्वामींचें बोलणें दोघेजण पीत होते.

" यशवंताला आम्हीं एक पत्र लिहिलें होतें, " नामदेव म्हणाला.

" कशासंबंधीं ? " स्वामींनीं विचारलें.

" यशवंताला आम्हीं लिहिलें होतें कीं तूं भावापासून वेगळा हो आणि वांटणीला जें येईल तें घेऊन त्यानें अमळनेरला यावें. अमळनेरला त्यानें छापखाना काढावा. तुम्हीं वर्तमानपत्र काढावें, एखादी पुस्तकमाला काढावी, वगैरे त्याला सुचविलें होतें, " नामदेव म्हणाला.

" आम्हीं छापखान्याचें नांवसुद्धां मनांत योजिलें आहे. 'भाऊ छापखाना.' आपण सगळे भाई, सारे भाऊ. भाऊ हा खानदेशी शब्द आहे. खेड्यापाड्यांत

बाया माणसें 'भाऊ' ह्या नांवानेंच इतरांना संबोधितात. मुद्रणालय वगैरे अगडबंब शब्द नकोत. भाऊ छापखाना. सुटसुटीत नांव. वर्तमानपत्राचें नांव स्वधर्म आणि पुस्तकमालेचें नांव चैतन्यमाला." रघुनाथ म्हणाला.

"स्वधर्म हें नांव सुंदर आहे. स्वधर्मांत सारें येतें. माझा स्वधर्म सर्वव्यापी आहे. माझ्या स्वधर्मांत अद्वैत आहे, साम्यवाद आहे, प्रेम आहे, वर्णाश्रम आहे, सारें आहे," स्वामी म्हणाले.

"यशवंतानें लिहिलें आहे, मी विचार करतों आहें. यशवंताला घरीं चैन पडत नाहीं. तुम्ही त्याच्या जीवनांत क्रांति केलेली आहे. ती त्याला स्वस्थ कशी बसूं देईल?" रघुनाथ म्हणाला.

"बऱ्याच घडामोडी तुम्ही करीत आहांत," स्वामी म्हणाले.

"परंतु सफळ होतील तेव्हां खरें. यशवंत जर येऊन मिळाला तर झपाट्यानें काम होईल. विचारप्रसार जोरानें होईल. मग तुम्हांला हातानें दैनिक लिहावयास नको," नामदेव म्हणाला.

"हातानें लिहिल्याशिवाय छापतां कसें येईल," स्वामी हसून म्हणाले.

"पण त्या एका हस्तलिखिताच्या हजारों प्रती खानदेशांतील खेड्यापाड्यांत जातील, खानदेशांतील खेडीं उठतील. माझा खानदेश सारा पेटूं दे! माझा खानदेश सारा भडकूं दे," नामदेव म्हणाला.

"कोठें तरी ठिणगी पडूं दे. कोठें तरी तेज प्रकट होऊं दे. मग महाराष्ट्रभर वणवा पेटल्याशिवाय राहाणार नाहीं. जिल्ह्याजिल्ह्याला ज्वाला निघत आहेत. प्रांताप्रांतांत घर्षण होत आहे, चैतन्य स्फुरत आहे. सर्व भारतवर्षांत क्रांतीच्या ज्वाला पेटल्याशिवाय राहाणार नाहींत. पारतंत्र्य, जुलूम सारा खाक होईल," स्वामी म्हणाले.

स्टेशन आलें. तिकीट काढण्यांत आलें. सायकली तेथें ठेवून दोघे मित्र स्वामींबरोबर गाडीपर्यंत गेले. बाहेरच तिघे उभे होते.

"तुम्ही देवपूरला मधून मधून जात जा," रघुनाथ म्हणाला.

"रघुनाथच्या आईची चौकशी करीत जा. तेथें कष्ट व उपासमार सदैव आहे. हिंदुस्थानांत सर्वत्रच आहे," नामदेव म्हणाला.

"वेणुसारख्या मुली जर शहरांत शिकल्या असत्या तर त्यांनीं केवढी जागृति केली असती! कशी बोलते, जसा फुटाणा!" स्वामी म्हणाले.

"आतां आपण परत केव्हां भेटूं," नामदेवानें विचारलें.

"दिपवाळींत तर येणार नाहीं ना?" स्वामींनीं विचारलें.

"नाहीं. उगाच पंचवीस रुपये खर्च करावयाचे," नामदेव म्हणाला.

"मग आतां मार्च महिन्यांत भेट. सात महिने आहेत. पत्र पाठवा. आपली मनोमय भेट आहेच. मनानें मनाला पाहाणें, आत्म्यानें आत्म्याला भेटणें हीच भेट मनुष्याला शोभते. ही पार्थिव डोळ्यांतोंडाची भेट स्थूल आहे," स्वामी म्हणाले.

"परंतु त्याशिवाय समाधान नाहीं हेंही खरें," नामदेव म्हणाला.

घंटा झाली. "पांच मिनिटें राहिलीं. पांच मिनिटें आणि तुम्ही जाणार. कां नाहीं राहिलेत एक दिवस आणखी?" नामदेवानें विचारलें.

"एक दिवस राहून का पोट भरलें असतें? तूं वेडा आहेस हो नामदेव," स्वामी म्हणाले.

"तुम्ही फार श्रम करूं नका हेंच पुन्हा पुन्हा सांगणें आहे," नामदेव म्हणाला.

"तुम्ही उगीच मनाला फार लावून घेत जाऊं नका," रघुनाथ म्हणाला.

करा, सूचना करा," स्वामी हसत म्हणाले.

"आम्ही हृदय तोडून सांगतों. तर तुम्हांला थट्टाच वाटते," नामदेव म्हणाला.

"बरें, थट्टा नाहीं. तुम्हीं सांगितलें आहे त्याप्रमाणें वागेन," स्वामी म्हणाले. झाली शिटी, निघाली गाडी.

स्वामी खिडकींतून त्या दोघा प्रेमळ मित्रांकडे पाहात होते. नामदेव व रघुनाथ उभे होते. गाडी गेली. दिसेनाशी झाली. दोघे मित्र उभेच होते. ना कोणी बोले ना हाले, ना चाले. दुसऱ्या एका गाडीसाठीं घंटा झाली. नामदेव व रघुनाथ भानावर आले. हातांत हात घालून ते दोघे बाहेर आले.

"स्वामी खरेंच का स्वयंपाकी होणार, आगीजवळ बसणार? खानदेशाची सेवा करतां यावी, खानदेशाला प्रचारक मिळावे, म्हणून चुलीवर पोळ्या, भाकऱ्या का भाजीत बसणार?" रघुनाथ खिन्नपणें म्हणाला.

"कोणाला माहीत? चुलीजवळ सांडलेल्या त्यांच्या त्या पवित्र, प्रेममय घामांतून आपला खानदेश फुलो व सजो, उठो व नटो. त्यांच्या आगीजवळच्या

तपश्चर्येनें सारा खानदेश पेटूं दे, साऱ्या खानदेशच्या तरुणांच्या हृदयांत आग पेटूं दे," नामदेव म्हणाला.

आकाशांत भगवान् सूर्यनारायण इतका जवळ असतो, तेव्हां कोठें मनुष्याच्या शरीरांत जगण्यापुरती ऊब राहाते. समाजांतील थोर पुरुष सूर्यासारखे जळत असतात, जीवनांच्या होळ्या पेटवून ठेवतात, तेव्हां कोठें समाजाच्या हृदयांत थोडीतरी ऊब उत्पन्न होते, कर्तव्याची मंदशी ज्वाला जळूं लागते," रघुनाथ म्हणाला.

"'सन्तो तपसा भूमिं धारयन्ति,'" नामदेव म्हणाला.

"जळतात अहोरात्र । संत हे भास्करापरी," रघुनाथ म्हणाला.



## ९

# देवपूरचा आश्रम

शनिवारीं रात्रीं छात्रालयांत भजन होत असे. भजन झाल्यावर स्वामी कधीं गोष्ट, कधीं एखादा निबंध वाचून दाखवीत. एखादे वेळेस कविता वाचीत किंवा कांहीं विचार सांगत. शेवटीं प्रसाद वांटण्याचें गोड काम झाल्यावर तो समारंभ समाप्त होत असे.

शनिवारचें भजन संपलें. स्वामी आज काय वाचणार, काय सांगणार? स्वामी जरा गंभीर होते. नेहमींप्रमाणें ते हसत नव्हते. तोंडावरची प्रसन्नता पळून गेली होती. ते कांहींतरी बोलूं लागले. मुलें ऐकूं लागलीं.

"मुलांनो! मी आज जरा गंभीर आहें हें तुम्हांला दिसतेंच आहे. मी तुम्हांलाही थोडें गंभीर करणार आहें. दैनिकांतून निरनिराळे विचार मी तुम्हांला देतच असतों. आज नवीन असें काय सांगणार आहें? आज मी तुम्हांला प्रत्यक्ष त्याग शिकवणार आहें. तुमच्यापैकीं बरीचशीं मुलें सुखवस्तु लोकांचीं आहेत. खरें पाहिलें तर ही सुखस्थति तुम्हांला कोणीं दिली? लाखों गरीब लोक रात्रंदिवस श्रमतात व तुम्ही सुखांत राहातां. तुमच्या शाळेची इमारत कशी उठली?

मिलमध्यें मजूर मरत आहेत, त्यांनीं निर्माण केलेल्या संपत्तींतून तुमची शाळा बांधली गेली. खरें म्हटलें तर 'मजूर हायस्कूल' असें तुमच्या शाळेचें नांव हवें. ज्या मजुरांनीं मरेमरेतों कामें करून ही शाळा बांधायला पैसे दिले, त्या मजुरांच्या मुलांना शिक्षण मिळतें का? त्यांना ज्ञान मिळतें का? शाळेला सरकार ग्रँट देतें, हजारों, कोट्यवधि शेतकऱ्यांनीं दिलेल्या करांमधून ही ग्रँट दिली जात आहे. परंतु त्या कोट्यवधि शेतकऱ्यांना विचारांची भाकरी मिळते का? कोणांमुळें आपणांस भाकर मिळते, कोणांमुळें आपणांस हें शिक्षण मिळतें? त्या अन्नदात्या व ज्ञानदात्या उपकार करणारांस आपण सारे कृतघ्नतेनें विसरतों.

"लाखों शेतकरी, कामकरी ह्यांना विचार मिळावे असें तुम्हांला वाटतें का? तसें वाटत असेल तर काय करावयास हवें? आपण ठिकठिकाणीं प्रचारक पाठविले पाहिजेत. हे प्रचारक खेड्यापाड्यांतून वर्ग घेत जातील, रात्रींच्या शाळा चालवितील, सदीप व्याख्यानें देतील, वर्तमानपत्रें व पुस्तकें वाचून दाखवितील. ज्ञानाची भाकर त्या बुभुक्षित मनांस मिळेल. परंतु हे प्रचारक कोणीं नेमायचे? तुम्हीं नेमले पाहिजेत आणि मोठे झाल्यावर तुम्हीं स्वतः प्रचारक झालें पाहिजे. तुम्हीं स्वतः मोठे होऊन तुम्हांला पोसणाऱ्या शेतकऱ्यांना, तुम्हांला पांघरणाऱ्या मजुरांना काय विचारमेवा नेऊन द्याल तो द्याल, परंतु तोंपर्यंत काय करावयाचें?

"माझ्या मनांत असें आलें कीं तुम्हीं त्यासाठीं कांहीं त्याग करावा. तरुण-ग्राम-सेवक-मंडळ म्हणून काढावें आणि तुम्हीं ह्या मंडळाचे सभासद व्हावें. ह्या मंडळास महिना चार आणे वर्गणी असावी. ही जी वर्गणी जमा होईल, तिच्यांतून आपण ग्रामसेवकांस मदत करूं शकूं. तुमच्यावर मी दडपण टाकूं इच्छितों असें नाहीं. परंतु तुम्हांला मनापासून जर मदत करतां येत असेल तर ती तुम्हीं करावी. ह्यावर तुमचे काय विचार आहेत? आपण खुल्या मनानें चर्चा करूं या," स्वामी म्हणाले.

"असें मंडळ वगैरे तुम्ही स्वतंत्र काढा. आम्हांला कांहीं मदत करावयाची झाली तर करीत जाऊं. परंतु हें महिन्याचें बांधलेलें नको," एक मुलगा म्हणाला.

"तुम्ही गांवांतील सभ्य लोकांकडून कां नाहीं वर्गणी जमवीत? आम्ही अजून विद्यार्थी आहोंत. आमच्या पैशाचे आम्ही मालक नाहीं! छात्रालयांतील

ग्रंथालयाला दोन आणे वर्गणी देतों, त्याबद्दलच घरीं पालक कुरकुर करीत असतात. आतां आणखी चार आणे कोठून द्यावयाचे ?" दुसरा एक म्हणाला.

"एखादा आमचा मेळा तयार करावा. तिकीट लावून त्याचा गांवांत खेळ करावा. एकदम दोनतीनशें रुपये मिळतील. एखाद्या सुट्टीच्या दिवशीं तोच मेळा जळगांवला न्यावा. तेथेंही पैसे मिळतील. अशा रीतीनें पण बरेच पैसे मिळतील. घरच्या लोकांवरही बोजा नाहीं आणि मेळ्यामुळें विचारप्रसारही होईल. नाहींतरी आमच्यापासून अशी कितीशी वर्गणी जमा होणार ? समजा, शंभर मुलांनीं चारचार आणे प्रत्येकीं दिले, तरी फारतर पंचवीस रुपये जमा होतील. वर्षाला दोनशें जमतील. परंतु आपण मेळा काढला तर सुट्टींत निरनिराळ्या ठिकाणीं जाऊन कितीतरी अधिक पैसे जमा करतां येतील !" एक मुलगा म्हणाला.

"ही सूचना चांगली आहे," एकानें अनुमोदन दिलें.

"परंतु सुट्टीमध्यें घरीं जाण्याऐवजीं माझ्याबरोबर मेळ्यांत काम करावयास याल का ? मागें महाराष्ट्रांत पैसाफंडासाठीं मेळ्याचे कार्यक्रम करून पैसे मिळविण्यांत आले होते. दरवर्षी मे महिन्याच्या सुट्टींत काढावा मेळा; परंतु मुलें मिळालीं पाहिजेत," स्वामी म्हणाले.

"आम्ही येऊं तुमच्याबरोबर," कांहीं मुलें म्हणालीं.

"तुमचे पालक परवानगी देतील का ?" स्वामींनीं शंका विचारली.

"हो, त्यांत वाईट असें काय आहे ?" एक मुलगा म्हणाला.

"परंतु मेळ्याची योजना होईल तेव्हां होईल. मंडळ सुरू करावें. ज्यांना प्रासंगिक किंवा नियमित मदत देतां येईल त्यांनीं द्यावी. गांवांतही स्वामींनीं हिंडावें," शिवलाल म्हणाला.

"गांवांत हिंडावयास मला संकोच वाटतो. ज्यांची थोडीफार सेवा करतां येते, त्यांच्याजवळच मी मागूं शकतों; इतरांपुढें तोंड वेंगाडण्याची मला लाज वाटते," स्वामी म्हणाले.

"परंतु जगांत असें लाजून कसें चालेल ? काम कसें होईल ? लोक आपण होऊन थोडेंच कांहीं देणार आहेत ?" आबा म्हणाला.

"मी गोपाळरावांचा सल्ला घेऊन काय तें ठरवीन," स्वामी म्हणाले.

"मग संपला आजचा कार्यक्रम ?" हरीनें विचारलें.

" हो संपला, " स्वामींनीं सांगितलें.

मुलें गेलीं. स्वामी मैदानांत येरझारा करीत होते. कितीतरी विचार त्यांच्या डोक्यांत घोळत होते. इतक्या मुलांच्या भोजनाची व्यवस्था आपण आपल्याकडे करार करून घेतली तर कसें होईल ह्याचा विचार ते करीत होते. परंतु तो विचार त्यांना शेवटीं कठीण वाटूं लागला. आपण मासिकें, वर्तमानपत्रें ह्यांना लेख पाठविले तर ? कांहीं पुस्तकें लिहिलीं तर ?

ते एकदम आपल्या खोलींत आले. त्यांनीं आपली पेटी उघडली. कितीतरी दैनिकांचे ढीग त्या पेटींत होते. त्या दैनिकांतून लिहिलेले निंबंध, दैनिकांतून लिहिलेल्या कविता, दैनिकांतील गोष्टी ह्यांचीं आपणांस स्वतंत्र पुस्तकें नाहीं का करतां येणार ? सहज करतां येतील. ते दैनिकें चाळूं लागले. गोष्टींवर खुणा करूं लागले. निबंधांवर खुणा करूं लागले. किती वाजले ह्याचें त्यांना भानही राहिलें नाहीं.

शेवटीं ते अंथरुणावर पडले व एक गोष्टींचें पुस्तक तयार करण्याचें त्यांनीं ठरविलें. दुसऱ्या दिवशीं उठल्यापासून त्याच कामाला ते लागले. लिहिलेलेंच नीट लिहून काढावयाचें होतें. दोनतीन दिवसांत दोनशें पानें छापून होतील इतकीं पानें त्यांनीं लिहून काढलीं. ' गोड गोष्टी ' हें त्या पुस्तकास ते नांव देणार होते.

" तुम्ही हल्लीं फारसें लिहीत असतां ? " गोपाळरावांनीं विचारलें.

" पैसे मिळविण्याच्या पाठीमागें आतां लागलों आहें. संसार वाढवूं म्हणत आहें, " स्वामी म्हणाले.

" लग्न करणार कीं काय ? करा बोवा लग्न, म्हणजे आमची चिंता कमी होईल. आमचा त्रास कमी होईल, " गोपाळराव म्हणाले.

" तुम्हांला कसला त्रास आहे माझ्यामुळें ? मी जेवावयाला येतों हाच कीं नाहीं ? तुम्हींच तर जेवायला येत जा म्हणून सांगितलें, " स्वामी म्हणाले.

" आमच्या मनाला त्रास होई. तो कमी व्हावा म्हणून तुम्हांला जेवावयाला बोलावूं लागलों. तुमची सर्वांना काळजी वाटते. जेवाल कीं नाहीं, कोठें जाल कीं काय ? लग्न केलें म्हणजे बंधनांत पडलेत. जबाबदारी आली. दुसऱ्या जिवाच्या सुखदुःखाचा विचार आला, " गोपाळराव म्हणाले.

" लग्न न करतांही दुसऱ्याच्या सुखदुःखांचा नाहीं का विचार करतां येत ? स्वामींनीं विचारलें.

" विचार करतां येतो, परंतु तितके नैतिक बंधन वाटत नाहीं, " गोपाळराव म्हणाले.

" गोपाळराव ! मी कितीही निराश झालों, मरून जावें असें कितीही मनांत आणिलें, तरी मी मरणार नाहीं. आपल्या जगण्यानें एखाद्या तरी जिवाला सुख वाटत आहे, एखाद्या तरी झाडाला थोडें पाणी पडून तें वाढत आहे, अशी जोंपर्यंत माझ्या मनाला खात्री वाटत आहे, तोंपर्यंत मी मरणार नाहीं. ह्याच माझ्या हृदयांतील खोल आशावृत्तीमुळें, आस्तिक्य बुद्धीमुळें मी आजपर्यंत जिवंत राहिलों. गेलीं दोन तपें माझ्या निराशेकडून मी सतत ग्रासला जात असतांही माझा मनश्चंद्र पुनः पुन्हा बाहेर पडला, " स्वामी म्हणाले.

" कोणता संसार वाढवावयाचा आहे ? " गोपाळराव मुख्य गोष्टीकडे वळले.

" देवपूरला आश्रम काढावा असें मनांत आहे, " स्वामी म्हणाले.

" तुम्ही तेथें जाऊन बसणार कीं काय ? " गोपाळरावांनीं विचारलें.

" मी कांहीं आजच नाहीं जात. तेथें चांगले स्वयंसेवक आहेत. ते तेथें धडपडत असतात. त्यांना तेथें वस्त्रस्वावलंबन वगैरे सुरू करावयाचें आहे. खादीच्या संबंधीं कांहीं प्रयोग करावयाचे आहेत. प्रथम त्यांना स्वतःच विणकाम शिकून यावयाचें आहे. शिकून आले म्हणजे ते काम सुरू करणार आहेत. शिकून येण्यासाठीं त्यांना शंभर रुपये पाहिजे आहेत. कोठून आणावयाचे शंभर रुपये ? मनांत निरनिराळे विचार करीत होतों. शेवटीं एक पुस्तक लिहावयाचें ठरविलें. तें लिहून तयार आहे. 'गोड गोष्टी' हें त्याला नांव आहे. तुमच्या ओळखीचा कोणी प्रकाशक आहे का ? शंभर रुपयाला आपण तें देऊन टाकूं. दोनशें पानांच्या पुस्तकाला शंभर रुपये कोणीही देईल असें वाटतें, " स्वामी म्हणाले.

" मीच देतों तुम्हांला शंभर रुपये. तुमचें हस्तलिखित मी विकत घेतों. काय हरकत आहे ! " गोपाळरावांनीं विचारलें.

" माझी कांहींच हरकत नाहीं. परंतु तुम्ही कां त्रास घेतां ! तुम्हांला तर पुस्तक म्हटलें म्हणजे कपाळाला आंठ्या पडतात, " स्वामींनीं विचारलें.

" श्रमजीवनाला न कंटाळणाऱ्या माणसाचें पुस्तक मला पूज्य आहे. जो प्रेमानें व आस्थेनें खेडीं स्वच्छ करण्यासाठीं हातांत आनंदानें झाडू घेतो, त्याची लेखणीही मला आदरणीय आहे. ती लेखणीही लोकांचीं मनें झाडण्या-

साठींच असेल. केवळ शब्दवेल्हाळांची लेखणी मला तिरस्करणीय वाटते. कर्मशून्य झब्बूंचीं प्रवचनें व पलंगपंडितांचे आळ्यतेचे उपदेशाचे घुटके हे मला अत्यंत किळसवाणे वाटतात. द्या तुमचें पुस्तक. तें खपेल. निदान खानदेशांत तरी खपेल. माझ्या अंगावर पडणार नाहीं, असा माझा विश्वास आहे, " गोपाळराव म्हणाले.

" मग द्या शंभर रुपये, " स्वामी म्हणाले.

" परंतु शंभर रुपये, एकदम त्या मुलांच्या हातीं देऊं नका. येथें माझी बुद्धि थोडी वापरा. ते जेथें शिकायला जाणार असतील, तेथील चालकांशीं पत्रव्यवहार करा. महिना दोघांचा सर्व खर्च काय येतो त्याची माहिती मिळवा आणि दरमहिना तेथें ते पैसे त्या चालकांकडे तुम्ही पाठवीत जा, " गोपाळराव म्हणाले.

जानकू व भिका हे विणकाम शिकण्यासाठीं गेले. स्वामी देवपूरला जाऊन आले. तेथील लोकांना सूत कांतण्याबद्दल ते सांगून आले. ' तुमच्या गांवाला महत्त्व द्या. नवीन तीर्थक्षेत्र करा. बाहेरचे लोक तुमचें गांव पाहावयाला येतील.' त्या दिवशीं त्यांनीं किती तरी गोष्टी सांगितल्या. रघुनाथच्या आईकडेच ते उतरले होते. वेणू टकळीवर सूत कांतावयास शिकली होती.

" वेणू, गांवांतील मुलींना, बायकांना तूं सूत कांतावयास शिकविलें पाहिजे. बरें का ? " स्वामी म्हणाले.

" हो, शिकवीन. मी माझ्या हातच्या सुताचें आतां पातळ नेसेन ? खरेंच ! " वेणू म्हणाली.

" रघुनाथचें पत्र केव्हां आलें होतें ? " स्वामींनीं विचारलें.

" आलें होतें. तो दिवाळीला कांहीं येणार नाहीं. मग मी कोणाला ओवाळूं ? " वेणूनें विचारलें.

" वेणू ! बाबा केव्हां आले होते ? " स्वामींनीं विचारलें.

" ते आतां येत नाहींत. आम्हांला दाणे पाठवीत नाहींत, कांहीं नाहीं, " वेणू म्हणाली.

" मग तुम्ही काय करतां ? " स्वामींनीं विचारलें.

" कोणाचें दळतों, मजुरी करतों. रघुनाथभाऊनें पांच रुपये पाठविले होते, " वेणू म्हणाली.

" त्यांतील किती शिल्लक आहेत ? " त्यांनीं प्रश्न केला.

" कांहीं नाहीं. वाण्याचे दिले, " वेणू म्हणाली.

" मग हे पांच रुपये घेऊन ठेव, म्हणजे तितकी अडचण वाटणार नाहीं, " स्वामी म्हणाले.

" तुम्हांला कां त्रास आमच्यासाठीं ? " वेणूनें विचारलें.

" तुम्ही माझ्या आश्रमांतील म्हणून. आपण सारीं एका आश्रमांतील धडपडणारीं देवाचीं मुलें, भारतमातेचीं मुलें, " स्वामी म्हणाले.

" आम्ही आश्रमांत राहूं ? " वेणूनें विचारलें.

" पुढें रघुनाथभाऊचें शिकणें वगैरे झालें म्हणजे. तोंपर्यंत हें घर म्हणजेच तुमचा आश्रम. प्रार्थना करीत जा. आईचें काम करून वेळ मिळेल तेव्हां वाचीत जा, कांतीत जा. भिका वगैरे आले म्हणजे पिंजणही शीक, समजलें ना ? आमची वेणू चांगली होवो, " स्वामी प्रेमानें म्हणाले.

" होईन, मी चांगली होईन, " वेणू म्हणाली.

गोपाळरावांनीं स्वामींचें पुस्तक छापलें. छात्रालयांतच शंभरसवाशें प्रति खपल्या. शाळेंतील विद्यार्थ्यांनीं घेतल्या. त्या पुस्तकावर चांगले अभिप्राय आले. गोपाळराव जळगांवला गेले होते. तेथें जिल्हा लोकल-बोर्डाच्या शिक्षणाधिकाऱ्यांना ते भेटले. ते शिक्षणाधिकारी म्हणाले, " तुम्हीं येण्यापूर्वीच तें पुस्तक मीं वाचलें. येथें कोणी तरी विद्यार्थी विकावयास आला होता. तें पुस्तक मला फारच आवडलें. पोळ्याची गोष्ट, शेतकऱ्याचा संसार वगैरे गोष्टी कोणालाही चटका लावतील आणि भाषा किती गोड आहे ! दोनदोन तीनतीन शब्दांचीं साधीं वाक्यें, परंतु हृदयाची पकड घेतात. झिमझिम सुंदर पाऊसच पडत आहे व हृदयभूमि फुलून येत आहे असें वाटतें. जिल्हा लोकल-बोर्डाच्या जवळजवळ आठशें शाळा आहेत. प्रत्येक शाळेंत कांहीं आमची लायब्ररी नाहीं. तरी पण शंभर प्रति मी खरेदी करून शंभर मोठ्या शाळांच्या लायब्ऱ्यांसाठीं देणार आहें. तुम्ही नसतां आलांत तरीही मी घेणारच होतों. हे स्वामी कोण ? "

" मलाही त्यांची फारशी माहिती नाहीं. अमळनेरला तीन वर्षांपूर्वी आले. सहज भेटले. मीं म्हटलें, ' आमच्या छात्रालयांत राहा. ' ते राहिले. जशा कांहीं योगायोगाच्या गोष्टी. परंतु त्यांचा मुलांना पुष्कळच फायदा होतो. मी त्यांना त्यांची फारशी पूर्वकथा विचारीत नाहीं, " गोपाळराव म्हणाले.

"तें बरोबर. अशीं माणसें थोडीं लहरी असतात. एखादे वेळेस एकदम बिनसावयाचें, कीं चालले. मिळेल तेवढा फायदा अशा विचरणाऱ्या मेघांपासून करून घेतला पाहिजे," ते गृहस्थ म्हणाले.

गोपाळराव खटपटी मनुष्य होते. त्यांनीं इतर जिल्हा लोकल-बोर्डांना सुद्धा लिहिलें. पुस्तकाला सरकारी मंजुरी मिळाली होती. त्यामुळें पुस्तकाचा शाळांतून प्रसार व्हावयास उशीर झाला नाहीं. स्वामींनीं नामदेवाकडे पांच पुस्तकें पाठविलीं होतीं. नामदेव, रघुनाथ सर्वांनाच तें पुस्तक आवडलें,

नामदेवानें स्वामींना लिहिलें :–

किती गोड पुस्तक. प्रत्येक शब्दांत तुम्हीच आम्हांस दिसतां.

**'जेथें तेथें देखें तुझींच पाउलें ।**
**सर्वत्र संचरलें तुझें रूप ॥'**

"पुस्तक लिहितांना तुम्ही स्वतःशीं हसले असाल, रडले असाल, सुस्कारे सोडले असतील; पेटले असाल ; खरें कीं नाहीं ? हें पुस्तक जिवंत पुस्तक आहे. नारायण वगैरे माझ्या येथल्या मित्रांनाही तें फार आवडलें. देवपूरचा आश्रम भाग्यवान् आहे. त्या आश्रमांतून सूत केव्हां निघूं लागेल, खादी केव्हां विणली जाईल, ती आमच्या अंगावर केव्हां पडेल तें माहीत नाहीं. परंतु त्या आश्रमाच्या निमित्तानें तुमचे विचार, तुमच्या भावना ग्रंथनिविष्ट होऊन सर्वांना सुखवूं लागल्या आहेत, हालवूं लागल्या आहेत हें मात्र खरें. एकानें कोणीं म्हटलें आहे कीं "गांधी सूत कांततात. अरविंद विचार कांततात!" परंतु गांधींचें सूत नुसतें सूत नसून त्याच्याबरोबर शेंकडों विचारही कांतले जात असतात. तें सूत कांततांना समाधि लागून नवविचारदर्शन होत असेल नाहीं ?"

नामदेवचें पत्र मोठें सुंदर होतें. आश्रमाबद्दलची नामदेवाची शंका लवकरच दूर झाली. भिका व जानकू हे लौकरच शिकून आले. मनुष्याच्या मनाची ओढ व तळमळ निम्में काम करते. उरलेलें निम्में अभ्यासानें होतें. भिका व जानकू हे राममंदिरांत राहिले. पारोळ्याहून मागाचें सामान आणण्यांत आलें. राममंदिरांत उद्योगमंदिर थाटलें गेलें. 'समारंभ वगैरे सध्यां कांहीं नको,' असें स्वामी म्हणाले. 'काम सुरू होऊं दे. कामांत राम येऊं दे.' चरखे, पिंजणीं, लोढणीं, टकळ्या सारें सामान जमा होऊं लागलें. गांवांतील मुलेंमुली वेळ असेल तेव्हां कांतावयास येत. पुष्कळ बायकांना कांतण्याची जुनी सवय होती.

त्यांचे चरखे दुरुस्त करून देण्यांत आले. माळ्यावर पडलेले चरखे खालीं आले. भाग्यलक्ष्मी खालीं आली, घरांत आली. गांवांत संगीत सुरू झालें.

जानकू व भिका सकाळीं प्रार्थना झाल्यावर गांवांत हिंडत. कोठें घाण फार असली तर दूर करीत. नंतर ते कामाला लागत. दुपारीं बारा वाजतां भाकर खात. नंतर पुन्हा काम. रात्रीं प्रार्थनेनंतर ते वर्तमानपत्रें वाचीत. स्वामी वर्तमानपत्रें पाठवून देत. तसेंच दैनिक जुनें झालें कीं पाठवून देत. जुन्या दैनिकांचे कांहीं अंक एकदां भिका घेऊन आला. गांवकऱ्यांना विचारांचें खाद्य मानवे.

" स्वामी, तुमच्या आश्रमांत पहिला धोतरजोडा माझा विणला जावो, " गोपाळराव म्हणाले.

" आणि गोदूताईचीं पातळें ? " स्वामींनीं विचारलें.

" तिनें आधीं सांगितलें असेल तर माझा दुसरा नंबर, " गोपाळराव म्हणाले.

" सूत बांधून ठेवा. वजन करून, आपलें नांव वगैरेंची चिठ्ठी, सारें व्यवस्थित करून ठेवा. धोतर का शर्टिंग, पन्हा काय, सारी माहिती द्या, " स्वामी म्हणाले.

" तें सारें कांहीं मी करून ठेवतों, " गोपाळराव म्हणाले.

देवपूरला सूत रवाना झालें. गांवांतील मुलांच्या मदतीनें ताणा झाला. पांजण झाली, मागावर खादी चढली ! पहिली देवपूरची खादी ! ज्या वेळेस तीं सणगें विणून तयार झालीं, तेव्हां भिकाचा आनंद गगनांत मावेना. तीं ठाणें हृदयाशीं धरून तो नाचला ! ' आमच्या गांवची खादी, आमच्या हातांनीं विणलेली खादी, आमच्या आश्रमाची खादी ! पंख असते तर स्वामीं-जवळ एकदम गेलों असतों व त्यांच्या हातांत ही दिली असती ' असें त्याला वाटलें ! दुसऱ्या दिवशीं एका सायकलवर बसून तीं ठाणें घेऊन तो अमळनेरला गेला. स्वामींच्यासमोर तीं स्वच्छ, सुंदर व निर्मळ ठाणें त्यानें ठेविलीं. स्वामींनीं प्रणाम करून तीं हातांत घेतलीं. त्यांच्या डोळ्यांत धन्यतेचें पाणी आलें !

" भिका, छान हो छान. चालूं दे काम. भिका, पण एक लक्षांत ठेव. चरखा व माग ह्यांच्या नादाबरोबर विचारांचा नादही सुरू झाला पाहिजे. खादी मुकी नको. खादी म्हणजे संघटना ; खादी म्हणजे स्वाभिमान ; खादी म्हणजे स्वावलंबन ; खादी म्हणजे निर्भयता ; खादी म्हणजे प्रेम ; खादी म्हणजे

दुसऱ्यांचें दुःख जाणणें व दूर करावयास धावणें ; खादी म्हणजे स्वराज्य ; खादी म्हणजे स्वातंत्र्य ! खादी हें एक प्रतीक आहे, चिन्ह आहे. शेवटीं विचार ही मुख्य गोष्ट. हातांत खादी घेऊन स्वातंत्र्याकडे जावयाचें ! चक्रचिन्हांकित राष्ट्राचा झेंडा शेवटीं स्वातंत्र्याकडे नेणारा झाला पाहिजे, भिका, रघुनाथ, नामदेव, यशवंत पुढें येऊन तुम्हांला भेटतील, तुम्हांला मिळतील ! आपण सारे एका आश्रमांतले, एका महान् आश्रमांतले. जमाखर्च नीट ठेव. तुला येतोच आहे लिहावयास. संस्था म्हटली म्हणजे पैन्पैचा हिशेब हवा, " स्वामी म्हणाले.

" त्याला मी जपत आहेंच. आश्रमाची अब्रू म्हणजे आपले प्राण ! " भिका म्हणाला.

भिका परत गेला. छात्रालयांतील मुलांना स्वामींनीं एका शनिवारीं रात्रींच्या सभेंत विचारलें, " देवपूरच्या आश्रमांतील खादी तुम्ही घेत जाल का ? जर घ्याल तर किती छान होईल ! तेथील बेकार बायांना काम मिळेल. तुम्ही खादी घेतांच. खादीभांडारांतील घेण्याऐवजीं येथील आश्रमाची घ्या. शेवटीं स्वदेशीधर्म म्हणजे शेजारधर्म ! आपले हात जवळच्या माणसासाठीं आधीं धावले पाहिजेत. कारण जवळचा माणूस आपल्यासाठींही आधीं धावून येईल. शेजारचा मनुष्य असंतुष्ट व उपाशी ठेवून भागणार नाहीं. "

" हो, आम्ही घेऊं. आम्ही आश्रमास भेट देऊं. सायकलवरून आम्ही जाऊं, " कांहीं मुलें उत्साहानें म्हणालीं.

देवपूरला मुलें जाऊं येऊं लागलीं. रविवारीं सायकलवरून मुलें जावयाचीं. जातांना फराळ घेऊन जात. नदीवर आनंदानें खात. आश्रमांत येणाऱ्या मुलांबरोबर गप्पा मारीत. गांवकऱ्यांना कौतुक वाटे.

मेळा करण्यासाठीं स्वामींनीं कांहीं संवाद लिहिले. मधून मधून पदें घातलीं. नाताळची सुटी होती. मेळ्यांत काम करणारीं मुलें घरीं गेलीं नाहींत. तीं संवाद पाठ करीत, जनार्दन पेटी वाजवी व गांवांतील श्रीराम तबला वाजवी. सहज अभिनय कसा करावा तें स्वामी शिकवीत. निरनिराळ्या विषयांवर संवाद होते. शाळेंतील शिक्षण, अस्पृश्योद्धार, खादी, स्वराज्य, सावकारी पाश, मजुरांचे हाल—सुरेख संवाद होते. चार तासांचा भरगच्च कार्यक्रम होता. मे महिन्यांत मेळा घेऊन गांवोगांव जावयाचें असें ठरलें होतें. जर बरे पैसे मिळाले तर दोन प्रचारक ठेवण्याचें स्वामींच्या मनांत होतें.

उन्हाळ्याची सुट्टी केव्हां लागते इकडे सर्वांचें लक्ष होतें. मेळ्यांतील मुलें नापास होऊं नयेत म्हणून स्वामी काळजी घेत होते. ते त्या मुलांना शिकवीत, त्यांच्या शंका निरसन करीत.

" तुम्ही कोणी नापास होऊं नका, म्हणजे आपली अब्रू राहील, छात्रालयाचें नांव राहील. पालकांचा दोष येणार नाहीं. गोपाळरावांना बोल लागणार नाहींत, " असें पुनः पुन्हा स्वामी बजावून सांगत. शक्य तों नापास न होणारींच मुलें त्यांनीं निवडलीं होतीं.

परीक्षा झाली व मेळ्याचीं सारीं मुलें पास झालीं.

" कनक, तूं पास होशील असें वाटलें नव्हतें, " स्वामी म्हणाले.

" भारतमाताकी जय ! भारतमातेचा आशीर्वाद. तिची सेवा करण्यास निघालेलीं मुलें नापास कशीं होतील ? " कनक म्हणाला.

" आपण केव्हां निघावयाचें ? " माधवनें विचारलें.

" आतां ठरवूं. परंतु आधीं अमळनेरलाच कार्यक्रम करूं. येथें तिकिटें पुष्कळ खपवूं. दुसऱ्या गांवाचा कार्यक्रम आधीं निश्चित करून तेथें तिकिटें खपविण्याची व्यवस्था आधींपासून करायला हवी, " स्वामी म्हणाले.

" जळगांव, भुसावळ, धुळें, चोपडा, चाळीसगांव हीं पांच गांवें तरीं घ्यावयाचींच. "

" मालेगांव धुळ्याहून जवळ आहे, तेथेंही जाऊं. "

" तालुक्याचीं सर्व गांवें घ्यावीं. धरणगांवही घ्यावें, " एकजण म्हणाला.

अमळनेरांत आज मेळ्याचा कार्यक्रम होता. अमळनेर तसें रसिक होतें. येथें गणेश गायनसमाज होता. अमळनेरांत गाण्याचे, संगीताचे कार्यक्रम पुष्कळ वेळां होत असत. नजरखांचे सतारीचे प्रोग्रॅम कितीदां तरी होत. नजरखां खरोखरच उत्कृष्ट सतार वाजवी. गांवांत हिंडून हिंडून मुलें तिकिटें खपवीत होतीं.

' देवपूरच्या आश्रमाच्या मदतीसाठीं ' असे शब्द जाहिरातींत मुद्दाम घातले होते. अमळनेरांत ह्याच गोष्टीची सर्वत्र चर्चा चालली होती. वकिलांच्या क्लबांत, व्यापाऱ्यांच्या बैठकींत, स्त्रियांच्या देवदर्शनाच्या वेळीं मेळ्याच्याच गोष्टी चालल्या होत्या.

रात्र झाली. खूपच गर्दी लोटली. शेवटीं तिकिट बंद करणें भाग पडलें. नाटकगृह चिक्कार भरून गेलें होतें. गांवांतील सारी प्रतिष्ठित व रसिक मंडळी दिसत होती. खेळास आरंभ झाला. सर्वत्र शांतता पसरली.

संवादांत अनेक भावनोत्कट प्रसंग होते. पाण्यावांचून हरिजन मुलगा तडफडत आहे व त्याच्या बापाला विहिरीवर पाणी मिळत नाहीं. तो गटारांतील गंगा ओंजळीनें भरून घेऊन येतो व मुलाला पाजतो !

'पाण्यावांचून माझें पोर मरावें ना रे देवा ? माझ्या डोळ्यांत सुद्धा पुरेसें पाणी नाहीं रे बाळ, नाहींतर तें तुला पाजलें असतें ! माझ्या जिवाचें पाणी पाणी होतें, परंतु तें बाळाला कोठें पाजतां येतें ? बाळ !'

हे शब्द प्रेक्षकांच्या डोळ्यांतून पाणी आणतात ! हरिजनसंवाद रडविणारा होता. 'शाळेंतील शिक्षक' हा संवाद हसविणारा होता. प्रेक्षक शाळेंतील शिक्षकांकडे बघत व टाळ्या वाजवीत ! अर्थात् शिक्षकांना लागेल असें त्यांत कांहीं नव्हतें. तो सारा निरागस विनोद होता. 'सावकारी पाश' संवाद सुरू झाल्यावर शिक्षक, सावकार व वकील ह्यांच्याकडे पाहून टाळ्या वाजवीत !

आपण सारेच समाजाला कसे खालीं नेत आहोंत हें दिसून येत होतें.

स्वामींनीं शेवटच्या प्रवेशाच्या आधीं सर्वांचे आभार मानले व तीनशें रुपयांहून जास्त उत्पन्न झाल्याचें सांगितलें. त्या वेळेस प्रचंड जयघोष झाला. दुसऱ्या दिवशीं पुन्हा एक जादा कार्यक्रम करण्याचें जाहीर करण्यांत आलें.

एका अमळनेरांतच पांचशें रुपये जमा झाले. कोणीं मुलांना बक्षिसें दिलीं. स्वामींना व मुलांना खूप उत्साह आला. खानदेशभर ते गेले व त्यांच्या मेळ्याची कीर्ति सर्वत्र पसरली. बऱ्हाणपुराहून बोलावणें आलें. पुण्यासही जावें अशी कांहींनीं सूचना केली. परतु 'पुण्यांत खानदेशाचे विद्यार्थी असतील तेव्हां जावें, म्हणजे ते तिकिटें खपवितील,' असें स्वामींचें म्हणणें पडलें. गोपाळराव म्हणाले, "तेव्हां मेळ्यांतील मुलांची शाळा बुडेल. आतांच जा. वर्तमानपत्रांतून प्रसिद्धी करावी म्हणजे झालें."

खानदेशाचा मेळा पुण्यांतही आला. पुणेकर प्रसिद्ध म्हणून नांवाजलेले. परंतु खानदेशच्या मुलांनीं पुण्याचें हृदय जिंकलें. तो सहजसुंदर अभिनय पाहून त्यांना कौतुक वाटलें. अभिनयांत आदळआपट, ओढाताण कांहीं नव्हतें.

मेळ्याला पुण्यांतील रसिकांनीं पदकें दिलीं. मेळ्याचा जाहीर सन्मान करण्यांत आला.

स्वामींनीं जवळजवळ खर्चवेंच वजा जातां दोन अडीच हजार रुपये जमविले. दरवर्षी हा कार्यक्रम करावा असें त्यांनीं मनांत योजिलें. मुलांची त्यांनीं अत्यंत काळजी घेतली. ते दिवसा त्यांना वाचून दाखवीत, त्यांचें ज्ञान वाढवीत. निरनिराळ्या ठिकाणीं ऐतिहासिक स्थानें वगैरेही त्यांनीं मुलांना दाखविलीं. मुलें आनंदलीं. अपेक्षेबाहेर प्रयत्नाला यश आलेलें पाहून सर्वांना धन्यता वाटली.

नामदेव व रघुनाथ हे स्वामींबरोबर येऊं शकले नाहींत. नामदेवाचे रायबा जरा आजारी होते. रघुनाथला घरची व्यवस्था पाहावयाची होती. रघुनाथ आश्रमांतही जाई. गांवांतील लोकांना सायंप्रार्थनेनंतर निरनिराळे विचार सांगे. शेतकरी व कामकरी ह्यांनीं संघटना कशी केली पाहिजे वगैरे गोष्टी तो बोले.

" अरे रघुनाथ, हा इंग्रज कांहीं बाबा जायचा नाहीं. घुसला तो कायमचा. आणील एक तोफ व देईल फुंकून साऱ्यांना, " गांवांतील एक वृद्ध गृहस्थ म्हणाले.

" जी भाऊ ! आपणांजवळ शस्त्रास्त्रें नाहींत ही गोष्ट खरी. परंतु म्हणून का हातपाय नाहीं हालवावयाचे ! सर्व हिंदुस्थानभर संघटना झाली, जर निर्भयता आली, अपमानाचें मिंधें जिणें न जगण्याचा जनतेनें निश्चय केला, तर सरकारी तोफा बंद पडतील. राष्ट्राच्या सर्वव्यापी संघानें स्वराज्य मिळेल. सारें हिंदुस्थान इंग्रज का मारील ? त्यालाही जगायचें आहे. पस्तीस कोट लोकांचा आवाज कोण दडपील ? जें सरकार कोट्यवधि लोकांच्या हृदयांतील स्वातंत्र्याची ज्वाला दडपूं पाहील तें सरकार धुळीला मिळेल. धडपड करीत मर्दासारखें उठलें पाहिजे, " रघुनाथ सांगे.

" अरे, सरकारपेक्षां सावकार छळतो. आपल्या गांवचा शेतसारा चार हजार आहे परंतु सावकाराचें व्याज त्यापेक्षां जास्त आहे. सावकार कसा दूर होणार ? " दुसऱ्या एकानें विचारलें.

" पोटापुरतें खायला ठेवून मग सावकार व सरकार तृप्त करावे. आधीं नीट जगलें तर पाहिजे. आपण सरकार व सावकार ह्यांना सांगितलें पाहिजे, ' महाराज, तुमचें देणें आहे खरें. तें मी नाकबूल करीत नाहीं. परंतु तें

देण्यासाठीं मीं जिवंत तर राहिलें पाहिजे ? मला आधीं जगूं दे. माझीं पोरेंबाळें जगूं दे. उरलें तर तुला दिल्याशिवाय राहाणार नाहीं, " रघुनाथ म्हणाला.

" जप्ती आणील, लिलांव करील, " पाटील म्हणाले.

" आपण एकजूट करून उठलें पाहिजे. प्रयत्न हवा. हातपाय गाळून जी भाऊ कसें होईल ? " रघुनाथ म्हणाला.

त्या दिवशीं रघुनाथची आई त्याला म्हणाली, " रघुनाथ, वेणूचें लग्न नको का करायला ? कोण बरं पाहाणार, कोण काळजी करणार ? ते इकडे ढुंकूनही पाहात नाहींत. एकदां मध्यें आले होते. ह्या घरांतून आम्हांला हांकलीत होते. परंतु पंचांनीं समजूत घालून त्यांना लावून दिलें.

" आई, मी तरी कोठें जाऊं, कोठें शोधूं ? माझी का कोठें ओळखदेख आहे ? मीही अजून व्यवहारांत लहान आहें. मामा असते तर त्यांनीं केलें असतें सारें. परंतु तेही गेले. होईल तसें होईल. आणखी एक दोन वर्षें राहूं दे तशीच. माझें शिक्षण पुरें झालें म्हणजे मग पाहीन, " रघुनाथ म्हणाला.

" अरे, मग मोठी झाली म्हणून कोणी करणार नाहीं. रघुनाथ, तुला चिंता वाटत नाहीं, परंतु मला चैन पडत नाहीं. एकदा वेणूचें लग्न झालें म्हणजे मी मोकळी झालें, " आई म्हणाली.

" आई, माझें सुद्धा अभ्यासांत लक्ष नसतें हो. बाबा मध्यें आले व तुला मारीत मारीत त्यांनीं घरांतून बाहेर ओढीत आणलें, वेणू कशी मध्यें पडली व तिच्याही कानशिलांत त्यांनीं कशी भडकावली—सारी हकीकत भिकानें मला कळविली होती. मी रडलों. रडरड रडलों. नामदेवाला माहितही नाहीं. माझें तोंड उतरून गेलें होतें. मी रात्रीं एकटाच बाहेर हिंडत होतों. मला सारी काळजी आहे. परंतु मी काय करूं ? वेणूला कोणाच्या गळयांत का बांधायची आहे ? किती गोड आहे वेणू ! कशी बोलते, कशी हसते ! तिला गाणीं किती येतात, वाचते किती छान ! तिच्या लक्षांत कसें राहातें ! वेणू म्हणजे रत्न आहे, " रघुनाथ म्हणाला.

" अरे, पण उकिरड्यावरच्या रत्नाला विचारतो कोण ? गांवांतील बाया मला विचारतात. मी काय बोलणार ? " आई म्हणाली.

"देव सारें बरें करील. नाहींतर आश्रमाशीं लावूं लग्न," रघुनाथ म्हणाला.

"असें रे काय बोलतोस ?" आई म्हणाली.

इतक्यांत वेणू आली.

"काय रे भाऊ बोलतां? तूं केव्हां परत जाणार?" वेणूनें विचारलें.

"आठ दिवसांनीं," रघुनाथ म्हणाला.

"मला तें पुस्तक पाठव हो. 'भारतीय स्त्रीरत्नें,'" वेणू म्हणाली.

"एक तूं रत्न!" रघुनाथ हसत म्हणाला.

"आणि तूं हिरा!" वेणू म्हणाली.

"वेणू, तूं व्याख्यान सुद्धा देशील," रघुनाथ म्हणाला.

"स्वामींचीं पुष्कळ व्याख्यानें ऐकलीं कीं मी सुद्धा देईन. सारें माझ्या लक्षांत राहातें. परवांचा नवाकाळांतील महात्मा गांधींचा लेख किती छान होता भाऊ आणि तुझ्या स्वामींचे दैनिकाचे अंक आम्हीं आणले आहेत आश्रमांत. मी सूत कांतायला म्हणून जातें व दैनिकेंच वाचीत बसतें. किती वाचलें तरी पुरेंसेंच होत नाहीं," वेणू म्हणाली.

"वाचीत जा वेणू आणि लिहूनही काढावें. अक्षर सुधरेल," रघुनाथ म्हणाला.

"भिका म्हणत होता कीं रोज गांवांत प्रभातफेरी काढावी," वेणू म्हणाली.

"केव्हांपासून सुरू करणार आहेत? तुझा आवाज चांगला आहे. घे झेंडा खांद्यावर व सांग गाणीं. जशी पंढरपूरची वारकरीण," रघुनाथ म्हणाला.

"आपले आजोबा पंढरपूरला दरवर्षी जात असत. त्यांना सारे मान देत; होय ना ग आई?" वेणूनें विचारलें.

"होय. तुम्हा पोरांवर त्यांचा किती लोभ. परंतु गेले सोडून," आई म्हणाली.

"मला नेहमीं खाऊ द्यायचे," रघुनाथ म्हणाला.

"मीं एक दिवस तुला खूप मारलें. तर मामंजींनीं वाघासारखी झडप घालून माझ्या हातांतून ओढून नेलें. तो चेहेरा मी कधीं विसरणार नाहीं," आई म्हणाली.

"भाऊ, आपण उद्यां काढूं प्रभातफेरी. तूं आहेस तोंवर सुरू होऊं दे," वेणू म्हणाली.

"आज रात्रीं प्रार्थनेच्या वेळीं ठरवूं," रघुनाथ म्हणाला.

शेवटीं रात्रीं प्रार्थनेच्या वेळीं ठरलें कीं सकाळची प्रार्थना झाली कीं गांवांत दररोज फेरी काढावयाची. गांवांतील तरुणांस आनंद झाला. वेणूनें शेजारच्या मुलींना सांगितलें. त्याही येणार होत्या.

पहाटेच्या वेळीं राममंदिरांतून फेरी निघाली. नवभारताचे मंत्रजागर करणारे लोक निघाले! यात्रेकरू निघाले. रघुनाथनें एक नवीनच गाणें सांगितलें.

शेतकरी हो शेतकरी
ध्यावी सत्ता स्वीय करीं ॥ शेत० ॥
शेतांमध्यें श्रमतों आपण
घेतों विश्रांतीही न क्षण
घरांत खाया नाहीं परि कण
दीन दुर्दशा कोण हरी ॥ ध्यावी० ॥
झेंडा हातीं घ्या क्रांतीचा
झेंडा हातीं घ्या शांतीचा
निर्भयतेचा स्वातंत्र्याचा
सोडा आतां दास्यदरी ॥ ध्यावी० ॥
मिळेल निःसंशय तो विजय
होईल दारिद्र्याचा विलय
व्हावें सर्वांनीं परि निर्भय
संघटना ती हवी परी ॥ ध्यावी० ॥
भविष्य आहे आपुला आतां
खाऊं कुणाच्या आतां न लाथा
वरतीं करूं या आपुला माथा
पळतील सारे दूर अरी ॥ ध्यावी० ॥

देवपुरांतील शेतकऱ्यांचीं मुलें खड्या आवाजांत गाणें म्हणत होतीं. मजूरही त्यांत सामील झाले. सारा गांव दुमदुमून गेला.

"भाऊ, तूं गाणें सांगितलेंस तें किती छान होतें. मला नाहीं उतरून दिलेंस तें!" वेणूनें विचारलें.

"तें काल रात्रीं मीं लिहिलें. तुझ्या भाऊनें तें गाणें रचलें आहे," रघुनाथ म्हणाला.

" भाऊनें केलेलें गाणें ! माझ्या भाऊनें केलेलें गाणें ! भाऊ, तुझे ते दुसरे मित्र नाहीं का रे करीत गाणीं ? त्यांचेंही दे ना मला गाणें. साऱ्यांचीं गाणीं मला दे. माझ्या वहींत साऱ्यांचीं हवींत गाणीं. स्वामींचीं आहेत. हें तुझें आणि त्यांचें ? " वेणूनें विचारलें.

" नामदेव कवि नाहीं. तो चित्रकार आहे. तो सुंदर चित्रें काढतो. तो बांसरी वाजवतो, गाणींही सुंदर गातो, " रघुनाथ म्हणाला.

" त्यांना कां नाहीं आणलेंस ? आश्रम पाहिला असता त्यांनीं. त्यांनीं बांसरी वाजविली असती व मीं गाणें म्हटलें असतें, " वेणू म्हणाली.

" त्याचे वडील आजारी आहेत, " रघुनाथ म्हणाला.

" आतां बरे आहेत का रे ? " वेणूनें विचारलें.

" बरे आहेत. जमलें तर एक दिवस तो येणार आहे येथें, " रघुनाथ म्हणाला.

रघुनाथचे जाण्याचे दिवस जवळ येत चालले. एके दिवशीं स्वामी व नामदेव अकस्मात् देवपूरला आले. भिका व जानकू ह्यांना आनंद झाला. स्वामी व नामदेव आश्रमांत उतरले होते.

" तुम्ही आमच्या घरीं कां नाहीं उतरलांत ? " वेणूनें विचारलें.

" आश्रम हें मुख्य घर. आतां मीं आश्रमांतच उतरलें पाहिजे. आश्रम सर्वांचा, " स्वामी म्हणाले.

" रघुनाथभाऊ येईल तर तोही आश्रमांत उतरेल ? " वेणूनें विचारलें.

" नाहीं. आश्रमाला वाहून घेईपर्यंत नाहीं, " स्वामी म्हणाले.

" तुम्हीं आश्रमाला वाहून घेतलें आहे ? " वेणूनें विचारलें.

" पण मी आश्रमाकडे आलों असल्यामुळें आश्रमाचा पाहुणा आहें, " स्वामी म्हणाले.

" भिका व जानकू भाकऱ्या भाजतां भाजतां दमतील, " वेणू म्हणाली.

" मग तूं ये मदत करायला. तूंही आश्रमांतच जेव. रघुनाथ जेवील, " स्वामी म्हणाले.

" चालेल ! भिका, मी भाजीन रे भाकऱ्या, " वेणू म्हणाली.

" बरेंच झालें. रोज भाजून मिळाल्या तरी चालेल, " भिका म्हणाला.

" रोज नाहीं हो ! आज पाहुणे आले आहेत म्हणून, " वेणू म्हणाली.

" रघुनाथ, जरा नदीवर नाहीं तर त्या मशिदींत जाऊं चल. थोडें बोलायचें आहे मला, " स्वामी म्हणाले.

नामदेव, रघुनाथ व स्वामी फिरायला गेले.

" रघुनाथ, मेळ्याचे दोन हजार रुपये जमा झाले आहेत. आश्रमासाठीं पांचशें ठेवावे. उरलेले प्रचारकामांत खर्च करावे. तुझ्या ओळखीचे आहेत का प्रचारक ? चार प्रचारक वर्षभर ठेवतां येतील. पुढील वर्षी पुन्हा मेळा काढूं, " स्वामी म्हणाले.

" तुम्हांला प्रचारक कशा प्रकारचे हवेत ? " रघुनाथनें विचारलें.

" राष्ट्राला चैतन्य देणारे, निर्भयता शिकविणारे, संघटनेचा मंत्र देणारे, क्षुद्र रूढी व जानवीं, शेंडी, गंध, मुकटे ह्यांच्या धर्माऐवजीं प्रेम, ऐक्य, स्वावलंबन, त्याग, उद्योग ह्यांचें रणशिंग फुंकणारे, गरिबांच्या विपत्तीनें जळणारे असे प्रचारक हवेत. चांगले अभ्यास केलेले व चारित्र्यवान् असावेत. खेड्यांतील लोक चारित्र्य आधीं पाहातात, " स्वामी म्हणाले.

" साम्यवाद, शेतकरी कामकरी संघटना करणारे, भांडवलशाहीला शिव्या देणारे, नवीन विचार देणारे, असे प्रचारक चालतील ? " रघुनाथनें विचारलें.

" चालतील. परंतु त्यांनीं कॉंग्रेस संस्था बलवान् करावी. पुढें जाणारे तरुण मला का नकोत ? त्यांनीं हळूहळू विचार पसरून मोठ्या संस्थेंत घुसावें. कॉंग्रेस-बद्दल जनतेला श्रद्धा उत्पन्न झाली आहे ती मारूं नये. तिळतिळ श्रद्धा उत्पन्न करावयास अपार त्याग द्यावा लागतो. परंतु ती श्रद्धा आपण एका शिवीनें व एका संशयानें नाहींशी करूं शकतों. तेव्हां जरा संयमनपूर्वक प्रचार करणारे तरुण हवेत. तसेंच त्या प्रचारकांना गांवें झाडणें, स्वच्छता निर्माण करणें ह्यांतही प्रेम असावें. दिवसा झाडू व रात्रीं व्याख्यान. दिवसा रस्ते झाडणें व रात्रीं मनें झाडणें. पुण्यास पाहा. मिळाले तर विचार करून कळवा, " स्वामी म्हणाले.

" हे पैसे नाहीं तर छापखान्यांत घालावे. दोन तीन वर्षें मेळा चालवून पांच सात हजार रुपये जमवावे. छापखाना काढावा, " नामदेव म्हणाला.

" यशवंत कदाचित् छापखाना काढील. आज प्रचारकांचीच फार जरूर आहे. जिवंत प्रचारक, जिवंत कळकळीचीं हालतीं, चालतीं, बोलतीं माणसें सर्वत्र वणवा लावीत गेलीं पाहिजेत, " स्वामी म्हणाले.

"बरें, हे प्रचारक आश्रमातर्फे हिंडणार का ?" नामदेवानें विचारलें.

"हो. हें आश्रमाचेंच काम. आश्रम केवळ सुतें गुंडीत बसला नसून, त्या सुताच्या आधारानें विचारांचीं जाळीं विणीत आहे हें दिसलें पाहिजे. आश्रम म्हणजे सर्व स्फूर्तींचें स्थान. राष्ट्रांतील सर्व विचारांची छाननी आश्रमांत होत असली पाहिजे. आजतागायतचे विचार आश्रमांत फिरले पाहिजेत. 'सनातनो नित्यनूतनः' ज्याला मरायचें नसेल, सनातन राहावयाचें असेल त्यानें काळाबरोबर पुढें गेलें पाहिजे. युगपुरुषाचें स्वरूप ओळखलें पाहिजे. आश्रम मनें झाडील, बुद्धि पेटवील, हृदयें उचंबळवील. आश्रम डोळे उघडील, हातपाय हालवायला लावील. आश्रम म्हणजे अनंत चेतना, अंतर्बाह्य जागृति. गांव झाडीत असतां जर मनें झाडतां आलीं नाहीं तर तें आश्रमीय झाडणें नव्हे. खादी देतांना विचार देतां आले नाहींत, तर ती आश्रमीय खादी नव्हे. आश्रम म्हणजे नवराष्ट्राचा संसार, पावित्र्य, सहकार्य, सेवा, उद्योग, ज्ञान, प्रेम, निरहंकारिता, दंभशून्यता ह्यांचें वातावरण आश्रमांत हवें. प्रचारक आश्रमाचेच ! खानदेशांत चरक्याचें गूं गूं व क्रांतीचें गूं गूं वेगानें सुरू होवो ! आश्रम म्हणजे क्रांतिसूर्य आणणारे अरुण होत." स्वामी म्हणाले.



१०

# आंधळी वेणू

रघुनाथ व नामदेव पुन्हा पुण्यास निघून गेले. कॉलेजमधली पहिली परीक्षा त्यांची पास झाली होती. दुसऱ्या वर्षाचा अभ्यास सुरू झाला. पूर्वीप्रमाणेंच एका खोलींत ते राहात. हातानें स्वयंपाक करीत. घरून येतांना रघुनाथला खूप वाईट वाटलें. आईच्या मनस्थितीबद्दल त्याला चिंता वाटे. वेणूचीही त्याला नाहीं म्हटलें तरी थोडी काळजी वाटूं लागली. आपण गरीब, वेणू कोठें द्यावी ? वडील असून नसल्यासारखे झालेले. त्यामुळें कुळाला एकप्रकारें कमीपणा आलेला. कसें होईल सारें ?

"रघुनाथ, तूं खिन्न कां दिसतोस ? माझ्या मनांत एक शंका आली आहे ती तुला विचारूं ?" नामदेवनें प्रश्न केला.

" विचार, " रघुनाथ म्हणाला.

" तुला माझ्यावर विसंबून राहावें लागतें, मी तुझा खर्च चालवतों म्हणून तुला मिंधेपणा वाटतो का ? ही गोष्ट तुझ्या मनाला जाचते का ? नामदेवाला आपण त्रास देतों असा भाव तुझ्या मनांत येतो का ? खरें सांग, संकोच नको करूं, " नामदेवानें विचारलें.

" नामदेव, तुझी कोणतीही वस्तु घ्यायला मला संकोच नाहीं वाटत. आपण दोघांनीं एकमेकांचीं हृदयें एकमेकांच्या हृदयांत ओतलीं आहेत. त्या रात्रीं छात्रालयाच्या गच्चीवर आपण एकमेकांना मिठी मारून रडलों होतों. आठवतें तुला ? त्या अश्रूंनीं आपणांस कायमचें जोडलें आहे. त्या अश्रूंनीं परस्परांतील दुजाभाव वाहून नेला आहे. आपण एक आहोंत. आतां तुझें तें माझें व माझें तें तुझें हो, " रघुनाथ म्हणाला.

" मग तूं खिन्न कां दिसतोस ? तुझ्या दुःखाचें कारण काय ? " नामदेवानें प्रश्न केला.

" नामदेव, सध्यां मला वेणूची काळजी वाटत आहे. तिचें पुढें कसें होणार ? आमची सारी स्थिति तुला माहीतच आहे. वडिलांच्या एकंदर वर्तनामुळें कुळाला काळिमा आलेला. घरची गरिबी. वेणू किती गुणी मुलगी आहे ! तिच्या गुणांची का माती होणार सारी ? आई मजजवळ रडली. ती म्हणाली, ' वेणूची व्यवस्था लाव. ' मी कोठून लावणार व्यवस्था ? कोणाच्या गळ्यांत बांधणार ? " रघुनाथ दुःखानें बोलत होता.

" परंतु इतक्यांत काय घाई आहे ? आणखी दोन वर्षें थांबलें म्हणून काय झालें ? वेणूसारखी मुलगी कोणीही करील. आपण उगीच काळजी करीत असतों. देवाच्या योजना ठरलेल्याच असतात, " नामदेव म्हणाला.

" देवाच्या योजना ठरलेल्या असतात असें म्हणून भागत नाहीं. आपण प्रयत्न करीत राहिलें पाहिजे. देवाच्या योजनेंत तें बसलें तर यशस्वी होईल. न बसलें तर यश मिळणार नाहीं, " रघुनाथ म्हणाला.

" तेथील आश्रमांत वेणू काम करील, प्रभातफेरी काढील, लिहील, वाचील. वेणू तयार होत आहे. तिची बुद्धि चांगली आहे, मन थोर आहे. तिचे डोळे कसे काळेभोर, मोठे आहेत, " नामदेव म्हणाला.

" ज्यांचे डोळे मोठे असतात, त्यांचें हृदयही मोठें असतें. नामदेव, तुझे डोळे सुद्धा मोठे आहेत. सृष्टींतील सौंदर्य पिण्यासाठीं जणूं ते अधीर आहेत असें वाटतें, " रघुनाथ म्हणाला,

नामदेव, रघुनाथ व स्वामी त्या दिवशीं आश्रमांतून निघून गेल्यावर वेणू रडली. आपण कां रडत आहोंत तें तिचें तिलाच समजेना. तिचे अश्रु थांबेनात. ते अश्रु होते कीं साधें पाणी होतें? ती डोळ्यांचीच फक्त गळती होती कीं हृदयांतील गळती होती? किती प्रेमानें वेणूनें त्या दिवशीं भाकरी केल्या होत्या! किती वेळ ती चुलीशीं बसली होती! केवढें समाधान तिच्या जिवाला वाटत होतें! त्या का साध्या पिठाच्या भाकरी होत्या? त्या भाकरींत आणखी कांहीं होतें का? त्या भाकरींतून वेणूनें स्वतःचें हृदय का सर्वांना वाढलें? त्या भाकरींतून जीवरस का वाढला?

" आई, सारखें डोळ्यांतून पाणीच आज येत आहे. जरा वर बघावें तर डोळे आपले भरून येतात. कां ग असें होतें? " वेणूनें विचारलें.

" तुला चुलीजवळ बसायची सवय नाहीं. तूं परवां चुलीजवळ बसलीस. एकटीनें साऱ्यांच्या भाकरी भाजल्यास. त्रास झाला असेल डोळ्यांना, " आई म्हणाली.

" पण त्या वेळेस कोठें येत होतें पाणी? भाऊ वगैरे सर्व जाईपर्यंत डोळे कसे चांगले होते. ते गेल्यावरच हें असें कां बरें होत आहे? डोळे दुखत नाहींत खुपत नाहींत; परंतु गळती मात्र थांबत नाहीं, " वेणू म्हणाली.

" थांबेल हो पाणी. जरा नीज. पडून राहा. आज कांतूं नको, पिंजूं नको. वाचूं नको, लिहूं नको. तूं अलीकडे सारखें वाचीतच बसतेस, " आई म्हणाली.

" आई, वाचलें म्हणजे कितीतरी समजतें. भाऊला मी बहीण शोभलें पाहिजे. स्वामी त्या दिवशीं नाहीं का म्हणाले कीं, ' वेणू, वाचीत जा, विचार मिळवीत जा, ' " वेणू म्हणाली.

" बरें, मी जातें नदीवर. तूं पडून राहा, " असें म्हणून वेणूची आई धुण्याची मोट घेऊन नदीवर गेली.

वेणू एकटीच घरांत होती. मध्येंच गाणें गुणगुणे, मध्येंच नाचे. वेणू वेडी झाली होती.

गांवांत एक किनरीवाला भिकारी आला होता. किनरी वाजवीत तो गाणीं म्हणत होता. गोड मंजुळ किनरी ! गोड गोपीचंदाचीं गाणीं ! तें संगीत वाऱ्यावरून आलें व वेणूच्या कानांत घुसलें. ती उठली, पुलकित झाली. नामदेवाची बांसरी तिला आठवली. 'नामदेव गाणीं गोड म्हणतो'–स्वामींचे शब्द आठवले. वेणू अंगणांत आली. टपोरे डोळे पाहूं लागले. कान टवकारून ऐकूं लागले. आला, किनरीवाला आला. वेणूच्या अंगणांत आला. तो किनरी वाजवूं लागला. गाणें म्हणूं लागला. वेणू तटस्थ होऊन ऐकूं लागली. तिचं हृदय विरघळूं लागलें.

तो किनरीवाला वेणूकडे पाही व त्याला स्फुरण येई. वेणूला गाणें पुरें वाटेना; किनरी थांबावी असें वाटेना. किनरीवाल्याला आपण येथून जावें, गाणें थांबवावें, किनरी थांबवावी असें वाटेना..

नदीवरून आई धुणीं घेऊन आली. परंतु वेणूची धून लागली होती. तिला भान नव्हतें.

" अरे, पुरे कर बाबा तुझी किरकिर. जा. आतां, " वेणूची आई म्हणाली.

" वाजव रे वाजव. आईचें काय ऐकतोस ? म्हण छानदार गाणें. म्हण कृष्णाचें गाणें. गोकुळांतील गाणें, " वेणू म्हणाली.

" वेण्ये, अग त्याला द्यायला काय आहे घरांत ? ना मूठभर दाणे, ना पैसाअडका. जा रे बाबा तूं, " आई म्हणाली.

" माझी भाकर त्याला दे. माझी भूक गेली, " वेणू म्हणाली.

" मला तुमचें कांहीं नको. दाणे नको, आणे नकोत आई, मी फुकट वाजवीन, ह्या डोळ्यांसाठीं फुकट वाजवीन. असे डोळे मीं कोठें पाहिले नाहींत. काशी, मथुरा, अयोध्या, द्वारका–मी सारीकडे हिंडलों. परंतु असे डोळे पाहिले नाहींत. आई, पोरीच्या डोळ्यांना जपा. डोळ्यांना जपा, " तो किनरीवाला म्हणाला.

" जा बाबा तूं, " आई म्हणाली.

" चाललों मी. त्या डोळ्यांना जपा, " किनरीवाला जातांना म्हणाला.

किनरीवाला गेला. त्यानें गांवांत मग कोठें वाजवलें नाहीं, नंतर गाणें कोठें म्हटलें नाहीं. पोरें त्याच्या पाठीस लागलीं होतीं. परंतु त्यानें कोणाचें ऐकलें

नाहीं. त्याला दाणे नको होते, कांहीं नको होतें. तो गांवांतून निघून गेला. ‘ए किनरीवाल्या, म्हण कीं एक गाणें’ असें म्हणत पोरें त्याला पोचवीत गांवाबाहेर गेलीं. किनरीवाल्यानें एकदा पाठीमागें पाहिलें. मुलांना वाटलें कीं हा आतां वाजवणार! परंतु किनरीवाल्यानें गांवाला डोळे मिटून एक प्रणाम केला व तो एक शब्दही न बोलतां निघून गेला. वाऱ्यावर आलेलें भटकणारें दिव्य संगीत निघून गेलें. कोठून आलें, कां आलें? आलें आणि निघून गेलें!

वेणू पडून राहिली. शांत पडून राहिली.

“वेण्ये, जेवायला ऊठ. थोडें खा आणि पड. तुला काय होतें आहे?” आई कनवाळूपणानें म्हणाली.

“मला भूक नाहीं. मला गाण्याची भूक आहे. गाणीं गात उडून जावें असें मला वाटतें. आई, नको मला भाकर. मी पडून राहातें. लागली भूक तर तिसरे प्रहरीं खाईन,” वेणू म्हणाली.

वेणू जेवली नाहीं. तिच्या आत्म्याला तें जड अन्न नको होतें. खालीं पृथ्वीशीं डांबून ठेवणारें तें अन्न नको होतें. तिला हवेंत उंच घेऊन जाणारें, ह्या पृथ्वीचा विसर पाडणारें, सभोवतालच्या संसाराचा विसर पाडणारें, भावनांच्या हजारों तारा छेडूं लागणारें दिव्य संगीत पाहिजे होतें. वेणू का पृथ्वीवरची नव्हती? मर्त्य लोकांसाठीं नव्हती?

“वेणू, हें बघ पत्र आलें आहे. रघुनाथाचें पत्र,” भिका आश्रमांतून येऊन म्हणाला.

“बघूं दे. भाऊचें पत्र. मला आलें होय?” वेणूनें विचारलें.

“हो. माझ्या पत्रांत ही तुला स्वतंत्र चिठ्ठी होती,” भिका म्हणाला.

“मी जातों हां. तें ठाण लौकर विणून द्यावयाचें आहे,” असें म्हणून भिका निघून गेला.

वेणूनें तें पत्र वाचलें. कितीदां तरी वाचलें. तिनें आईला वाचून दाखविलें.

“चिरंजीव वेणूस सप्रेम आशीर्वाद.

आम्ही आनंदांत आहोंत. येथला आमचा संसार पुन्हा सुरू झाला आहे. आम्ही हातानेंच स्वयंपाक करतों. रात्रीं भात करीत नाहीं. भाकर करतों. तुझ्या भाकरीची आठवण येते. नामदेव म्हणाला, ‘मी वेणूच्या भाकरी-सारखी भाजतों हां.’ परंतु त्याला साधली नाहीं. कलावान नामदेवाला

भाकरी साधेना. नामदेवानें वाजवावें, गावें, चित्रें काढावीं. परंतु भाकरी रघुनाथनेंच भाजावी. वेणूच्या भाऊनें. ' माझ्या वेणूजवळ भाकरी भाजायला शीक, ' मीं त्याला म्हटलें. तो म्हणाला, ' मी तिच्याजवळ भाकरी शिकेन, परंतु तिला मी काय शिकवूं ? ' मीं म्हटलें, ' बांसरी वाजवायला शिकव. ' काल आम्ही कॉलेजच्या बागेंत फिरत होतों. एका कृष्णकमळीच्या वेलीवर दोन कमळें फुललीं होती. मीं म्हटलें, ' नामा, हीं बघ दोन फुलें. ' तो म्हणाला, ' तुझ्या वेणूच्या डोळ्यांसारखीं आहेत. कसे आहेत वेणूचे डोळे ! ' मीं त्याला म्हटलें, ' माझ्या वेणूच्या डोळ्यांवर दृष्ट पडेल हो. ' नामदेव म्हणाला, ' चांगल्या वस्तूवर सर्वांची दृष्ट पडते. चंद्र सुंदर दिसतो म्हणून तर त्याला दृष्ट लागली. त्याच्यावर डाग पडले. त्याला क्षयवृद्धि लागली. ' आमचा वेळ आनंदांत जात आहे. भावांसारखे आम्ही वागत आहोंत. तुझी, आईची आठवण येते. वाईटही वाटतें. आईला म्हणावें कीं चिंता नको करूं ; सारें चांगलें होईल. वेणू, वाचीत जा. लिहीत जा. चांगली हो. वेणू म्हणजे गोपाळकृष्णाची वेणू होऊं दे. सर्वांना मोहून टाकणारी, सर्वांची समाधि लावणारी, सुखदुःखाचा विसर पाडणारी, मोक्ष देणारी वेणू ! आईला माझा व नामदेवाचा नमस्कार. नामदेवाचे तुला आशीर्वाद, सप्रेम आशीर्वाद. तूं पत्र पाठव.

तुझा भाऊ "

" आई, भाऊ कसें छान पत्र लिहितो नाहीं ? मला येईल का ग लिहायला ? मी लिहितें हो भाऊला पत्र. लिहू ? भिकाच्या चिठ्ठीबरोबर माझें पत्र जाईल. लिहूं ?" वेणूनें विचारलें.

" लिही," आई म्हणाली.

वेणूनें पत्र लिहिलें. किती वेळ तिला लागला. तिनें पूर्वी रघुनाथला पत्रें लिहिलीं होतीं. परंतु आजच्या इतका वेळ तिला कधींही लागला नव्हता. हातांत कागद घेऊन ती बसली. कोराच कागद पाठवावा असें तिच्या मनांत आलें. त्या विचारानें ती हसली. कोऱ्या कागदांत काय लिहिलें आहे ह्याचा शोध भाऊ व नामदेव करीत आहेत. डोळे फाड फाडून पाहात आहेत, कागद उलटा सुलटा करून पाहात आहेत, विस्तवावर धरून पाहात आहेत ! सारें चित्र तिच्या डोळ्यां-समोर उभें राहिलें. ती हसली. पण नंतर रडली. काय लिहूं, कसें लिहूं, किती लिहूं !

तिच्या हृदयाला भावनांच्या भारानें कळा लागूं लागल्या. त्या भावना बाहेर फुटूं देत. गाण्यांत उठूं देत. शब्दांत उमटूं देत. अश्रूंतून, हास्यांतून बाहेर येऊं देत. वेणू! गा, हस, रड, नाच! परंतु ह्या साऱ्या क्रिया म्हणजे कांहीं पत्र नव्हे. काय तरी लिहूं मी पत्रांत?

शेवटीं वेणूनें हिय्या केला. पत्र एकट्याला लिहायचें का दोघांना? काय लिहूं बरं मी? दोघां भावांस नमस्कार असें लिहूं? दोघे भाऊ! एक माझा भाऊ आणि दुसरा? तो कोण, त्याचें माझें काय नातें? कोणतें नातें? ते भाऊचे भाऊ झाले आहेत. परंतु ते माझे कोण? शेवटीं तिनें ठरविलें कीं मोघम लिहावें.

" दोघांना वेणूचे सप्रेम नमस्कार."

एकच ओळ! एकच गद्यकाव्याचा चरण! हृदयांतील तानसिंधूंतील ती एक अस्पष्ट तान होती! हृदयांतील अनंत सारस्वतांतील तें अल्पदर्शन होतें! वेणू त्या ओळीकडे पाहात राहिली. शब्दांकडे पाहात राहिली. त्यांतील अनंत अर्थांकडे पाहूं लागली! त्या मोघम 'दोघांना' ह्या शब्दांत केवढा भाव होता, केवढे मनोरथ होते, केवढाल्या उड्या होत्या, बुड्या होत्या! शेवटीं पत्र पुढें सुरू झालें.

"मी काय लिहूं? मला कांहीं लिहितां येत नाहीं. तुम्ही पुन्हा आलेत म्हणजे मी भाकर देईन, काय काय तरी देईन. सारें देईन. त्यांना शिकवीन भाकर भाजायला. कंदिलावर त्यांचा हात भाजला होता. तव्यावर हात भाजेल हो. त्यांना भाकर नको भाजूं देऊं. तूं भाकर भाज व ते बांसरी वाजवतील. तुझें मन रमेल. आज कि नाहीं येथें एक किनरीवाला आला होता. कसें वाजवी, कसें गाणें म्हणे! तो आपल्या अंगणांत किती वेळ वाजवीत होता. आई म्हणाली, 'जा रे आतां. तुला द्यायला कांहीं नाहीं." तो म्हणाला, 'मला कांहीं नको. ह्या पोरीचे डोळे पाहिले. हिरे मिळाले, माणिकमोतीं मिळालीं मला. पोरीच्या डोळ्यांना जपा बरें, आई,' आई त्याच्यावर रागावली. तो गेला. त्यानंतर गांवांत त्यानें गाणें म्हटलें नाहीं, किनरी वाजवली नाहीं. गांवाला नमस्कार करून गेला असें मुलें म्हणालीं. म्हातारा किनरीवाला!

"माझे डोळे! तुम्ही सारे गेलेत नि माझे डोळे सारखे गळत होते. पाणी खिळेना. जसें आकाश भरून येतें, तसें झालें होतें. कां रे असें होतें? त्यांना का

वाईट वाटत होतें ? सारखे तुम्ही त्यांना समोर हवे होतेत का ? तुम्ही गेलेत व त्यांचा आनंद जणूं गेला. हा आनंद त्यांना परत केव्हां मिळेल ? असे रडून रडून, गळून गळून नाहीं तर डोळे आपले जायचे. हो, माझ्याजवळून तुमच्याकडे यायचे !

" आई बरी आहे. तिला माझी आहे काळजी. परंतु मी तर पांखरासारखी डोळे मिटून गाणीं गुणगुणतें, घरांत नाचतें, हसतें ! त्या दिवशीं केसुअप्पा एकदम आले तों मी घरांत नाचत होतें ! ' वेण्ये ! अग वेड तर नाहीं लागलें पोरी तुला ? ' ते म्हणाले. मीं म्हटलें, ' मला पांखरूं होऊं दे. उंच उंच आकाशांतील ताऱ्यांकडे उडून जाऊं दे. ' ते हसले.

" मी दैनिकें वाचतें. पुष्कळ वाचीन. वेणू चांगली होईल. मला पत्र पाठवा. वेडी वेणू. "

वेणूनें पत्र कितीदा तरी वाचलें. तिला तें आवडलें. ' कसें लिहितां आलें मला ! आवडेल, त्या दोघांना आवडेल ! वेणूचें पत्र दोघांना आवडेल ! '

" वेणू , तुला कांहीं द्यायचें आहे का लिहून ? " भिकानें विचारलें.

" हो. हें बघ लिहून ठेवलें आहे. थांब, घडी करतें नीट, " असें म्हणून वेणूनें घडी करून तें पत्र भिकाजवळ दिलें. भिका गेला.

" उद्यां त्यांना मिळेल ! भाऊ म्हणाला, इकडचें पत्र दुपारीं चार वाजतां मिळतें. कॉलेजमधून येतील तों वेणूचें पत्र ! माझें पत्र वाचतील. दोघे वाचतील. वाचतील आणि नाचतील. म्हणतील वेड्या वेणूचें पत्र, मोठ्या डोळ्यांच्या वेणूचें पत्र, गोड भाकरी भाजणाऱ्या वेणूचें पत्र, गोड प्रार्थना सांगणाऱ्या वेणूचें पत्र ! हो. खरेंच असें ते म्हणतील, मनांत तरी म्हणतील, मनांत गुणगुणतील ! "

सायंकाळ झाली. वेणू नदीवर गेली होती. नदीच्या पाण्याशीं खेळत बसली. घडा भरून न्यायचें तिला भानच राहिलें नाहीं. किनरीवाल्याच्या गाण्यांतील गवळण तिला आठवली. यमुना आठवली. वृंदावनांतील वेणू आठवली ! वाऱ्यानें पाण्यावर तरंग उठत होते. सायंकाळच्या संध्येचे शत रंग पाण्यांत पसरत होते. पाणी नाचत होतें, रंगत होतें. वेणूचें हृदय नाचत होतें, रंगत होतें. तिचे डोळे नाचत होते. गाल रंगत होते. भरलेल्या डोळ्यांनीं व भरलेल्या हृदयानें रिकामाच घडा घेऊन वेणू निघाली ! रिकामा घडा ? छे, त्या घड्यांतही

भावना होत्या. जीवनाच्या घड्यांत प्रेमसिंधु उसळत होता. त्या मातीच्या घड्यांतही तो शिरला, भरला !

'हें काय, रिकामा घडा घेऊन मी चाललें ! वेडी, खरेंच मी वेडी !' वेणू हसली. पुन्हा पळत पाण्यावर गेली. तिनें घडा भरला. भरलेला घडा तिनें डोकीवर घेतला. भरलेली वस्तु पूज्य आहे ! भरलेलें हृदय, भरलेलें मन ; भरलेला घडा, भरलेला गाडा ; भरलेलें कणीस, भरलेलें भांडें ; भरलेला हात, भरलेलें कपाळ ; भरलेली ओटी, भरलेली कास ; भरलेलें सारें पवित्र आहे. ह्या जगांत पोकळ वस्तूला स्थान नाहीं ; रिकाम्या, निस्सार, शुष्क, वस्तूला मान नाहीं ! भरलेल्या भारताला मान मिळेल ! पोकळ, बडबड्या, चिरचिऱ्या भारताला स्थान नाहीं ! भारत दिव्य भावनांनीं भरूं दे ; बंधुप्रेमानें भरूं दे ; ज्ञानानें, तेजानें, त्यागानें जग त्याला डोक्यावर घेईल. विश्वंभर त्याला डोक्यावर घेईल.

भरलेली वेणू भरलेला घडा घेऊन भरलेल्या गांवांत आली. गांव भरत होता. गायीगुरें येत होतीं, हंबरत येत होतीं. भरलेल्या पोटानें, भरल्या कासेनें, भरल्या हृदयानें येत होतीं. गुराखी येत होते. रानांतील मस्त हवा खाऊन, पांवे वाजवून, नाचून, कुदून, खेळून, येत होते. शेतांत काम करणारे परत येत होते. गांवांतून बाहेर गेलेले सारे गांवांत येत होते. गांव भरत होता. गायीवांसरें भेटत होतीं. कुटुंबांतील सारीं भेटत होतीं.

वेणू घरांत आली. घरांत अंधार भरला होता ; परंतु अंधारांत दिवा होता. तेलानें, स्नेहानें भरलेला होता. भरलेला घडा वेणूनें ठेवून दिला. वेणू दिव्या-जवळ बसली. कशी सुंदर ज्योत ! कशी अंधारांत नाचते, चमकते, शोभते ! साऱ्या अंधाराला एका दिव्यानें शोभा आली ! एकच ज्योत ! परंतु सारा अंधार प्रकाशमय झाला.

"वेण्ये, दुपारची जेवली नाहींस. चल आतां जेवायला," आईनें हाक मारली.

"आई, खूप भूक लागली आहे. मी तुझ्या साऱ्या भाकरी खाऊन टाकीन. तुला ठेवणार नाहीं," वेणू म्हणाली.

"आधीं एक तर पानांतील खा. बडबडूं नकोस. पोटभर जेव," आई म्हणाली.

"आई, एखादे वेळेस आपलें वाटतें कीं डोळे मिटून राहावें. कां ग असें वाटतें?" वेणूनें विचारलें.

"भक्त डोळे मिटतो. देवाची पूजा करतांना डोळे मिटतात. तुझे आजोबा तास तास डोळे मिटून बसत," आई म्हणाली.

"त्यांना मनांत कांहीं दिसे; होय ना? त्यांना का मनांत देवाची मूर्ति दिसे? जें आपल्याला आवडतें, तें मग दिसतें; नाहीं का? तेवढेंच दिसतें, बाकी सारें जातें. दूर जातें. नाहीं?" वेणूनें विचारलें.

"हवी का आणखी भाकर? वाढूं?" आईनें विचारलें.

"नको. भूक लागलीशी वाटते, परंतु खाववत तर नाहीं. भाकरीची नाहीं वाटते ही भूक!" वेणूनें विचारलें.

"वेण्ये, दुसरें काय करायचें? भाकर तर पोटभर मिळूं दे म्हणजे झालें. भाकर तरी पोटभर सर्वांना कोठें मिळते?" आई म्हणाली.

"अग, तसें नाहीं कांहीं मीं म्हटलें. म्हणजे खाण्याचीच भूक नाहीं. भूक तर वाटते, परंतु अन्न मात्र नको. दुसरी असते का ग भूक?" वेणूनें विचारलें.

"मला नाहीं हो माहीत. मी का वाचतें? तूं उगाच वाचीत बसतेस. वाचून वाचून वेडी होशील, नसल्या कल्पना मनांत आणशील. उद्यांपासून वाचू नकोस," आई म्हणाली.

"वा? मी वाचीन. तुला मदत करीन. पाणी आणीन. झाडीन. प्रभात-फेरींत जाईन. प्रार्थना करीन. गाणें गाईन, कांतीन, पिंजीन. मी सारें करीन. म्हणजे मी भाऊला आवडेन. सर्वांना आवडेन," वेणू म्हणाली.

आश्रमांत वेणू प्रार्थनेला गेली. तिनें कोणतें गाणें म्हटलें? कोणती प्रार्थना म्हटली?

**भुकेले बघाया तुला दोन्हि डोळे ॥ ध्रु० ॥**
**तुझें वेड मातें**
**तुझा ध्यास मातें**
**स्मृतीनेंच होतात हे नित्य ओले ॥ भुकेले० ॥**
**वियोगें जळें मी**
**वियोगें गळें मी**
**वियोगामुळें फुल्ल हृत्पुष्प पोळे ॥ भुकेले० ॥**

तुला हे बघोत
तुला हे पिवोत
नसे हें जरी भाग्य होवोत गोळे ॥ भुकेले० ॥

वेणूनें हें पद घोळून घोळून म्हटलें. प्रार्थना झाल्यावर ती स्तब्धपणें घरीं निघून गेली. अंथरुणांत पडली. पडून रडली. विचारसिंधूंत, भावसिंधूंत बुडाली. माझे डोळे! त्यांच्या डोळ्यांपेक्षां का माझे डोळे सुंदर आहेत? त्यांच्या डोळ्यांना भूल पडतील असे आहेत माझे डोळे? त्यांच्या डोळ्यांनीं मला भूल पडली व माझ्या डोळ्यांनीं त्यांना भूल पडली. त्यांच्या डोळ्यांपेक्षां माझेच डोळे सुंदर आहेत. त्यांच्या डोळ्यांतील सौंदर्य मीं पिऊन टाकलें आहे. त्यांच्या डोळ्यांतील तेज मीं ओढून घेतलें आहे. रघुनाथ त्यांच्या गोष्टी सांगे. मी त्यांची कल्पना करीत असे. त्यांना मनांत निर्मीत असे. त्यांना प्रत्यक्ष पाहिलें म्हणून माझे डोळे मोठे झाले. किनरीवाला म्हणे, 'असे डोळे मी पाहिले नाहींत.' खरेंच का माझे डोळे फार गोड झाले आहेत? होय. गोड वस्तु पाहून गोड कां नाहीं होणार? हिरव्या गवतांतील किडा हिरवा होतो. जें पाहावें तसें आपण होतों. त्यांचे डोळे पाहून, त्यांचें तोंड पाहून माझे डोळे सुंदर झाले, मोठे झाले! तुमच्यापेक्षां सुरेख आहेत हो माझे डोळे! याल तेव्हां पाहाल! तुमच्या डोळ्यांपेक्षां काळेभोर, तुमच्या डोळ्यांपेक्षां गोड, तुमच्या डोळ्यांपेक्षां मोठे – माझे डोळे! माझ्या ह्या मोठ्या डोळ्यांनीं तुम्हांला एकदम सांठवीन, एकदम पिईन. होऊं देत माझे डोळे मोठे, होऊं देत गोड, होऊं देत सुंदर सुंदर!

वेणू अंथरुणांत क्षणांत निजे, क्षणांत उठून बसे. अंधारांत ती का कोणाला पाहात होती? तिला का कोणी दिसत होतें? निजली, पडली पुन्हा. नीज, वेणू, नीज. इतकी अशांति बरी नव्हे. म्यांव म्यांव! गुर् गुर् गुर्– म्यांव म्यांव! अरे मांजरें भांडताहेत! वेणूची तंद्री मोडली. ती भ्याली. तिनें अंगावरून आईची चौघडी घेतली! नीज, वेणू, नीज. मोठे डोळे मिटून नीज. डोळ्यांना फार शिणवूं नको. नीज, मीट, डोळे मीट! मोठे डोळे मीट.

प्रभात झाली. वेणूची आई दळूं लागली. राममंदिरांत प्रार्थना सुरू झाली. वेणू निजली होती. आईनें तिला हाक मारली नाहीं. भिका बोलवायला आला नाहीं. कोंबड्यानें जागें केलें नाहीं, वाऱ्यानें हलवलें नाहीं. सारी सृष्टी म्हणत होती, 'नीज, वेणू, नीज. गोड डोळे मिटून नीज. मोठे डोळे मिटून नीज.'

बाहेर चांगलेंच उजाडलें. फुलें फुललीं. गायी रानांत गेल्या. पांखरें आकाशांत उडालीं. मुलें शाळेंत गेलीं. वेणू निजलीच होती. जागी झाली. वेणू जागी झाली. डोळे चोळूं नको इतके वेणू. हळूच डोळे उघड. मिटलेले डोळे हळूच उघड, किती चोळतेस ? हें काय ? काय झालें ! वेणू रडायला लागली. तिनें ' ए आई. आई ग, आई ' हाक फोडली !

" काय वेण्ये ? काय ग झालें ? स्वप्न का पाहिलेंस ? ऊठ, " आई संबोधूं लागली.

" आई, मला कांहीं दिसत नाहीं ! तुझें तोंड मला दिसत नाहीं. तुझे हात मला दिसत नाहींत. हें काय ? कांहीं नाहीं. काय झालें डोळ्यांना ? चिकटलेले नाहींत. कांहीं नाहीं आई, माझे डोळे ! " वेणू रडूं लागली.

" थांब मी कढत पाणी आणतें. त्यानें धू. असे चोळूं नको. रडूं नको. " असें म्हणून आई चुलीजवळ गेली.

वेणू डोळे फाडफाडून पाहात होती ! कांहीं नाहीं. उजेड दिसेना, झाडें दिसत ना, घरांतील वस्तु दिसेना. " माझे डोळे ! आई ! माझे डोळे ! "

आई पाणी घेऊन आली. फडका कढत पाण्यांत बुडवून आई डोळे पुसूं लागली, स्वच्छ करूं लागली !

" अग आई, ते चिकटले नाहींत. चांगले उघडे आहेत. परंतु दिसत नाहीं. मला कांहीं दिसत नाहीं आई ! कोठे गेले तुझ्या वेणूचे डोळे ? कोणी नेले ? कोणी चोरले ? माझे मोठे डोळे ! आई, मी काय करूं ? " वेणू रडूं लागली, आई रडूं लागली.

" त्या किनरीवाल्याची दृष्ट पडली. पापी मेला. त्याचीच दृष्ट पडली. म्हणे असे डोळे मीं पाहिले नाहींत. पोरीच्या डोळ्यांना जपा म्हणे. त्याचेंच काम. त्यानेंच फुंकर मारली ! त्याचेंच हें दुष्ट काम. वेण्ये, पाहूं दे बरें पुनः ? पुसूं का ? " आई पुनः पुसूं लागली. परंतु कांहीं दिसेना.

भिका आला. त्याला काय झालें समजेना. भिकाचा आवाज ऐकून वेणू म्हणाली, " भिका, मी आंधळी झालें. भिका, माझे डोळे गेले. आतां मी दैनिक कशी वाचूं, पत्र कसें लिहूं, आलेलें पत्र कसें वाचूं ? भिका, मला कांहीं दिसत नाहीं. सारा अंधार, अंधार ! तूं दिसत नाहींस, आई दिसत नाहीं, मला आतां कांहीं नाहीं दिसणार ! फुलें नाहीं, फुलपांखरें नाहींत. नदी नाहीं, राई

नाहीं. सूर्य नाहीं, तारे नाहींत. गायीगुरें नाहींत. मला कोणी दिसणार नाहीं. रामाची मूर्ति दिसणार नाहीं. स्वामी दिसणार नाहींत. भाऊ नाहीं, भाऊचे मित्र नाहीं. आई, वेणूचे डोळे कां गेले? कुठें गेले? कोणी नेले? मी काय करूं? ही आंधळी वेणू काय करील आतां?"

वेणूचें रडें थांबेना. ती उठे व बाहेर जाऊं लागे. कांहीं दिसेना. आईनें तिचा हात धरला. "आई, कोण तुझ्या आंधळ्या वेणूचा हात धरील, कोण तिचा हात हातांत घेईल? मला कोण चालवील? कोण माझें बोट धरील? माझ्याबरोबर हळूहळू कोण चालेल? मी पडेन. मी पडूं नये म्हणून कोण मला आधार देईल? मला हात देणाऱ्याला मी अडखळून पाडायची एखाद वेळ! माझ्या अडखळण्यामुळें माझा हात हातांत घेणाराच पडायचा! बुडणारा हात देणाऱ्याला मिठी मारून त्यालाही बुडवितो! माझ्यामुळें दुसरे पडायचे! माझ्या-बरोबर कोण पडेल, कोण रडेल? मला बरोबर घेऊन कोण चढेल? आई, तुझा हात किती दिवस तूं देणार! धर, माझा हात घट्ट धर. आई, सोडूं नको माझा हात. मला अंगणांत ने. बघूं दे बाहेर दिसतें का?"

वेणू आईचा हात धरून बाहेर आली! पाहूं लागली, चौफेर पाहूं लागली. दिसेना, कांहीं दिसेना. कांहीं नाहीं हेंच सगळीकडे दिसे. न दिसणें दिसत होतें. अनंत अंधार दिसत होता. अद्वैत दिसत होतें. एकता दिसत होती.

"आई, मला घरांत ने. मला कोपऱ्यांत बसूं दे. कसे गेले माझे डोळे? सर्वांना आवडणारे डोळे, आई! भाऊ रडेल, त्याचे मित्र रडतील. सारे रडतील. माझ्यामुळें सारे रडतील. कशाला मी जगूं? साऱ्यांना ओझें, सर्वांना भार!"

वेणूच्या आईला काय करावें सुचेना. गांवांतील औषधें जाणणारे एक दोन आले. ते म्हणाले, "आम्हांला आशा नाहीं." साऱ्या गांवांत वार्ता गेली. मुलेंमुली पाहायला आलीं. लहानमोठीं पाहायला आलीं! आकाशांतील तारे तुटावे, मोतीं फुटावीं, फुलें गळावीं—तसें झालें! ते हसणारे, हसवणारे डोळे! सारा गांव हळहळला! त्या किनरीवाल्याची जादू! त्याचा मंतर तंतर! त्यानें फुंक मारली! दुष्ट, नष्ट किनरीवाला!

"नको रडूं वेण्ये," आई सांत्वन करीत होती. "जा, आई तूं जा. किती वेळ बसशील. तूं नदीवर जा. वेणू आतां फुकट गेली," आईला वेणू म्हणाली. आई उठेना. आईनें वेणूला ओढून पोटाशीं घेतलें. वेणूचें हृदय भरून आलें.

"आई, येतील का ग डोळे? सांग येतील का?" वेणूनें वर मान करून विचारलें.

"येतील. गेले तसे येतील. गेलेलीं पांखरें परत येतील. गेलेलीं माणसें परत येतील. गेलेलीं गुरें परत येतील. बारा वर्षें वनांत गेलेले रामलक्ष्मण परत आले. गेलेलें परत येतें. हरपलेलें सांपडतें. वेण्ये, येतील. तुझे डोळे येतील. एक दिवस येतील. उगी, रडूं नको," आई संबोधीत होती. अमर आशा देत होती.

"आई, तुझें म्हणणें खरें ठरो. तुझी आशा माझी आशा होवो. मी वाट पाहात बसेन. एक दिवस माझे डोळे येतील. उजेड येईल. अंधार जाईल. होय ना आई? नको ना मी रडूं?" वेणूनें विचारलें.

"नको रडूं. मी आहें तोंपर्यंत तरी नको रडूं. मी तुझा हात धरीन. तुझें सारें करीन. उगी बाळ," आई म्हणाली.

"नाहीं मी रडणार. आई, तुला वाईट वाटूं देणार नाहीं. आई, सार्‍यांची तुला चिंता. तुला सुख नाहीं. आई, धन्य आहे तुझी," वेणू म्हणाली.

"आई, आतां नवीन कांहीं दिसणार नाहीं. जुनें पाहिलेलेंच आठवायचें. तुझें तोंड आठवायचें. भाऊचें तोंड आठवायचें. आतां आठवण म्हणजेच डोळे. ही आठवण तरी राहो. भाऊ म्हणे, 'वेण्ये, तुझे डोळे चांगले आहेत.' परंतु ते चांगले डोळे गेले. स्वामी म्हणत, 'वेण्ये, तुझ्या स्मरणांत किती राहातें! तुझी स्मृति चांगली आहे.' आतां डोळ्यांप्रमाणें ती स्मृति न जावो. स्मृतीची दृष्टि तरी नष्ट न होवो. आई, आतां सार्‍यांना मी आठवत राहीन. आठवून पाहात राहीन. आठवणींचें माझें राज्य! जा. आई, तूं जा. मला सवय होईल. मग मी तुला मदत करीन. डोळे मिटून चालण्याचा मी अभ्यास करीत असें. डोळे मिटून वाळवंटांत नदीकांठीं हिंडत असें. डोळे मिटून प्रार्थना करीत असें. डोळे मिटून कोणाला तरी बघत असें. डोळे मिटून कांतीत असें. डोळे मिटून दळीत असें. देवानें दिलेले डोळे मिटून ठेवण्याचा प्रयत्न करीत असें. म्हणून तर नाहीं ना डोळे देणारा तो रागावला? आंधळ्या वेणूला लवकरच सारी सवय होईल. जा. आई, तूं जा."

भिकानें रघुनाथला पत्र लिहिलें. ती सारी करुणकथा त्या पत्रांत त्यानें लिहिली. आदल्या दिवशींच वेणूचें गोड पत्र आलें होतें. रघुनाथ व नामदेव ह्यांनीं वाचलें होतें. रघुनाथ मंडईत गेल्यावर नामदेवानें तें काढून पुन्हा कितीदा

वरी वाचलें होतें आणि आज पुन्हा रघुनाथला दुसरें पत्र आलें! देवपूरचें दुसरें पत्र! रघुनाथनें कांपऱ्या हातांनीं फोडलें. बाबांनीं तर येऊन नाहीं ना कांहीं अत्याचार केला, असें त्याच्या मनांत आलें. पत्र वाचतां वाचतां रघुनाथचे डोळे भरून आले.

"नामदेव, अरे माझी वेणू आंधळी झाली! नामदेव, वेणूचे डोळे एकाएकीं गेले. नामदेव, वाच—ही सारी कथा वाच. वेणू आंधळी झाली! हाय रे दैवा," रघुनाथ शोक करूं लागला.

नामदेवाला एक शब्दही बोलवेना. त्याचे डोळे मात्र भरून आले. खिडकीच्या बाहेर तोंड काढून तो उभा राहिला व मुके अश्रु ढाळूं लागला. तो आपले डोळे मिटी. कां मिटी? वेणूचे सुंदर डोळे गेले. माझेही जावोत, असें का त्याला वाटलें? जगाला मोह घालणारे डोळे! कशाला ते राखा, कशाला त्यांचें कौतुक, असें का त्याला वाटलें? का आपले डोळे वेणूला जावेत, अशी तो प्रार्थना करीत होता?

"नामदेव, काय आतां करावयाचें? कोणते उपाय आपण गरीब लोक करणार? वेणूला कोठें नेणार, कोणाला दाखविणार? गरिबाच्या दुखण्याला औषध नाहीं, गरिबाच्या दुःखाला अंत नाहीं. वेणूचें सारें आयुष्य आतां अंधारांत जाणार! अंधार, भयाण अंधार, न संपणारा अंधार! पांखरासारखी उडूं पाहाणारी, हरणासारखी उड्या मारणारी माझी वेणू! आतां कोपऱ्यांत बसून राहील! अभागी वेणू व तिचा दरिद्री भाऊ अभागी रघुनाथ!"

रघुनाथाच्यानें राहवेना. नामदेव कांहीं बोलेना.

"नामदेव, सांग ना तूं तरी कांहीं." रघुनाथ रडत म्हणाला.

"काय सांगूं? माझे डोळे वेणूला देऊं? काय करूं मी? एकाएकीं असे जे डोळे जातात, त्याला उपाय नसतो म्हणतात. कारण रोग नसतो. दुखणें नसतें. खुपऱ्या नाहीं, फुलें नाहींत, मोतीबिंदु नाहीं, सारा नाहीं; कांहीं नाहीं. जसे अकस्मात् कारण नसतां गेले, तसे अकस्मात् परत येतील. ह्या आशेशिवाय दुसरें आपण काय करणार? मुंबईला वगैरे कोणाला दाखवूं म्हटलें तर कोठें आहेत आपणाजवळ आज पैसे? स्वामी कांहीं तरी खटपट करतील. भिकानें स्वामींना कळविलें असलेच. स्वामींचें पत्र येईपर्यंत आपण शांत राहूं या." नामदेव म्हणाला.

स्वामींना भिकानें कळविलें. स्वामी आले. टांगा करून त्यांनीं वेणूला अमळनेरला आणलें. तेथील नामांकित डॉक्टरांनीं डोळे पाहिले. :" अर्थ नाहीं. ह्याला उपाय नाहीं." असें डॉक्टर म्हणाले.

" मुंबईला नेऊन दाखवूं का ? " स्वामींनीं विचारलें.

" दाखवा पाहिजे तर. परंतु आशा नाहीं. मनाला रुखरुख नको म्हणून दाखवून आणा, " डॉक्टर म्हणाले.

स्वामी वेणूला घेऊन मुंबईला गेले. डोळ्यांच्या तज्ज्ञ डॉक्टरांकडून परीक्षा घेण्यांत आली. ' ह्याला इलाज नाहीं, ' असेंच सर्वांचें म्हणणें पडलें. स्वामींना वाईट वाटलें. सारा जन्म आंधळेपणांत जाणार !

वेणूला घेऊन स्वामी समुद्रतीरावर गेले. समुद्राची घो घो गर्जना कानांवर येत होती. लाटांचा आवाज कानांवर येत होता. समोर अपार समुद्र उचंबळत होता. वेणूला पाहातां येईना. वेणू पाण्यांत उभी होती. लाटा तिच्या चरणाला स्पर्श करीत होत्या. समुद्र वेणूचे पाय धूत होता. समुद्रकांठचीं हजारों माणसें, वाळूंतील मुलांनीं बांधलेले किल्ले, उडणारे पतंग–वेणूला कांहीं दिसेना. स्वामींना फार वाईट वाटलें. दोघेजण वाळूंत बसलीं. अंधार पडूं लागला.

" वेणू, तुझे बाहेरचे डोळे गेले. आतां आंतील डोळे उघड. बुद्धीचे डोळे. ज्ञानचक्षु म्हणतात त्यांना. हा बाहेरचा समुद्र तुला दिसत नाहीं. परंतु ह्या बाहेरच्या समुद्रापेक्षां हृदयांत एक महान् समुद्र आहे. त्याच्यांत डुंबायला शीक. बाहेरच्या सृष्टीपेक्षां अनंतपटीनें मोठी सृष्टि हृदयांत आहे. तेथेंही फुलें, फुलपांखरें आहेत. वृक्षवेली आहेत, नद्या, पर्वत आहेत. तारे, वारे, चंद्र, सूर्य–सारें आहे, ती पाहा. बाहेरच्या डोळ्यांनीं आपण नेहमीं बाहेरच पाहातों. आंत आपण कधीं डोकावत नाहीं. आंतील गंभीर सृष्टि पाहावयास भितों, गांगरतों, आपलें खरें स्वरूप आपण कधीं पाहात नाहीं. आपण जगाला पाहातों ; परंतु स्वतःला पाहात नाहीं. आपलें स्वतःचें आत्मस्वरूप रडत असतें त्याची हाक आपण ऐकत नाहीं. त्याची उपेक्षा करतों. बघ, आतां त्याला पोटभर बघ. त्याला नटव, त्याला हसव. त्याला स्वच्छ कर. शुद्ध कर. पवित्र कर. त्या मीराबाईनें म्हटलें आहे ना, ' उलट भयी मोरे नयनन की '–माझे डोळे आतां उलटे झाले आहेत. तुझे डोळे गेले नाहींत. ते उलटे झाले आहेत. बाहेरची सृष्टि दवानें आंत बनविली आहे. दुसरें कोणतें समाधान मी तुला देऊं ? आतां हेंच

विवेकाचें समाधान! वेणू, तूं लहान आहेस. मी बोलत आहें हें करणें कठीण आहे. परंतु कठीण आहे म्हणूनच करण्यासारखें आहे. कठीण संपादण्यांत मनुष्याचा मोठेपणा आहे," स्वामी म्हणाले.

स्वामी वेणूला घेऊन पुण्याला आले. नामदेव, रघुनाथ ह्यांना भेटून जावें, असें त्यांच्या मनांत आलें. प्रचारकही पाहावयाचे होते. पावसाळ्याचे दिवस होते. पहाडांतील रमणीय गंभीर शोभा वेणूला पाहातां येत नव्हती. वेणू नाचली असती! घाटांतील शोभा पाहून वेणूनें खालीं उडीही मारली असती! वेणूला बोगदे, शोभा, प्रकाश सारें एकच होतें. बोगद्यांत जरा गुदमरल्यासारखें होई. उबट हवा अंगाला लागे. बोगदा संपला कीं थंडगार स्वच्छ हवा अंगाला येऊन लागे. वेणू विचारी, "असा कां हवेंत फरक होतो? क्षणांत गार वारा तर क्षणांत उबट, असें कां होतें?" स्वामी म्हणाले, "गाडी बोगद्यांतून जात आहे. बोगदा आला कीं हवा उबट येते. बोगदा संपला कीं प्रसन्न, मोकळी हवा येते." वेणूनें विचारलें, "डोंगर फोडून केलेला रस्ता म्हणजेच बोगदा ना? डोंगरांतील नळकांडें? होय ना?" स्वामी म्हणाले, "होय."

टांगा करून स्वामी वेणूसह मुलांच्या बिऱ्हाडीं आले. नामदेव व रघुनाथ रविवार असल्यामुळें घरींच होते. आगाऊ सूचना होती. स्वयंपाक तयार होता. वेणूचा हात धरून स्वामींनीं तिला खोलींत आणलें. बसली. एका जागेवर वेणू बसली.

"वेणू!" रघुनाथानें हाक मारली.

"भाऊ, माझे डोळे गेले. मला तुझें तोंड दिसत नाहीं. कोणाचेंही दिसत नाहीं. वेणू आंधळी झाली तुझी. कायमचे डोळे गेले. भाऊ, मला तूं टाकूं नको. आतां तूं मला. एक तूं मला," वेणू म्हणाली.

"येतील, तुझे डोळे येतील!" रघुनाथ म्हणाला.

"कोण असें म्हणतें भाऊ? आई असेंच म्हणाली," वेणूनें विचारलें.

"माझा नामदेव असेंच म्हणाला. 'असे अकस्मात गेलेले डोळे अकस्मात परत येतात' असें नामदेव म्हणाला. नामदेवाचें म्हणणें खरें होईल. आईची आशा खरी ठरेल!" रघुनाथ म्हणाला.

"ते असें म्हणत असतील तर येतील. त्यांचे डोळे मोठे आहेत. त्यांना दूरचें दिसत असेल. पुढचें दिसत असेल. आतां वेणूला तुम्हीच भाकर करून

वाढा. वेणूला हात धरून चालवा. वेणूला हात धरून नाचवा. वेणू आतां तुमच्या हातांतील!" वेणू म्हणाली.

**" तुझ्या करांतील बनून पावा**
**कृतार्थ हा जन्म मदीय व्हावा,**
**बनेन वेणू तव मी मुखींची**
**असे असोशी प्रभु एक हीची, "**

नामदेवानें श्लोक म्हटला.

" कोठला हा श्लोक ? " रघुनाथनें विचारलें.

" स्वामींच्या स्तोत्रांतला, " नामदेव म्हणाला.

रघुनाथनें वेणूला हात धरून सर्वत्र नेलें. स्नानगृहांत नेलें, शौचकूपांत नेलें. त्याला वाईट वाटत होतें. अगतिक, निराधार वेणू!

सर्व मंडळी जेवावयास बसली. वेणू चांचपडत जेवत होती.

" वेणू! भाजीचा रस मिठांत चालला बघ. सारें खारट होईल, " रघुनाथ म्हणाला.

" आतां मला सारेंच गोड! सारें एकरूपच दिसणार. वाईट नाहीं, चांगलें नाहीं, " वेणू म्हणाली.

**" निशा मला गोड उषाहि गोड**
**सुधा मला गोड विषेंहि गोड, "**

नामदेवानें चरण म्हटले.

" कोठले हे चरण ? " रघुनाथनें विचारलें.

" स्वामींच्या वहींतले, " नामदेव म्हणाला.

वेणूला एकदम ठसका लागला. " भाऊ, पाणी रे पाणी. कोठें आहे भांडें!" वेणू पाहूं लागली. नामदेवानें एकदम तिच्या हातांत भांडें दिलें. ती पाणी प्याली. जेवणें झालीं.

" रघुनाथ, तूं वेणूला हात धरून ने नळावर. मीं सारीं भांडीं उचलतों. " नामदेव म्हणाला.

" सारीं ताटें तुम्ही गोळा करणार ? माझेंही ताट तुम्ही उचलणार ? भाऊ, तूंच उचलणार ना रे सारीं ताटें. मी बसतें तोंवर. मग माझा हात धरून ने, " वेणू म्हणाली.

" नाहींतर नामदेव तुला हात धरून नेईल. तोच जपून नेईल. ने नामदेव. मी हें सारें आवरतों, " रघुनाथ म्हणाला.

" न्या मला. हळूच न्या. मी पडेन आणि तुम्ही पडायचे नाहींतर, " असें म्हणून वेणूनें हात पुढें केला. नामदेवानें तो बळकट पकडला.

" इतका घट्ट नको कांहीं धरायला. तसा हात सुटणार नाहीं. जरा धरा. तेवढ्या आधारानें मी येईन, " वेणू म्हणाली.

नामदेवानें वेणूला हातरुमाल दिला. वेणूनें तोंड पुसलें.

" मी जशी राणीच आहें. सारें मला आयतें मिळतें. आयतें जेवायला, आयतें हात पुसायला. सारें समोर येऊन उभें राहातें. आंधळ्या वेणूला देण्यासाठीं सारे हात पुढें होत आहेत. देवानें माझे डोळे नेले आणि दुसऱ्यांचे हात मला दिले, " वेणू म्हणाली.

" ह्या खिडकींतून सारें छान दिसतें ! पर्वती अगदीं समोर आहे. ध्येयभगवान् समोर आहे, " स्वामी म्हणाले.

" समोर असलेला तर मला दिसत नाहीं. परंतु भासतो आहे. ह्या बाजूला आहे ना ? इकडून हवा येत आहे, " वेणू म्हणाली.

वेणू व स्वामी जरा झोपले होते. उठल्यावर स्वामी म्हणाले, " आपण त्या माणसांस भेटूं. काय तें ठरवूं. म्हणजे रात्रीच्या गाडीनें आम्ही जाऊं. "

" वेणू, तूं घरांत राहा, आम्ही जाऊन येतों, " रघुनाथ म्हणाला.

" घरांत कोणी आलें तर मला कळणारही नाहीं, " वेणू म्हणाली.

" तूं आंतून कडी लावून घे, " रघुनाथ म्हणाला.

ते तिघे गेले. वेणू एकटीच खोलींत होती. त्या खिडकींतून पाहात होती. वाऱ्यावर तिचे केंस नाचत होते. तिला कांहीं दिसत नव्हतें. ती खोलींत चांचपडत हिंडत होती. टेबलाजवळ गेली. टेबलावर पुस्तकें होतीं. तिनें तीं पुस्तकें हृदयाशीं धरलीं. पुस्तकें उघडून ती पाहात होती. कांहीं दिसेना.

वेणूला वाटलें निजावें. बाहेर गार वारा सुटला होता. पाऊस पडूं लागणार होता. हवेंत गारठा आला होता. वेणू पांघरायला पाहूं लागली. सांपडली एक वळकटी ! तिनें उघडली. आंत हाताला मऊशी शाल लागली ! हें भाऊचें नाहीं अंथरुण ! हें त्यांचें. होय त्यांचें. माझा हात हातांत घेणाऱ्यांचें ! निजूं दे येथेंच. वेणू निजली. ती शाल तिनें पांघरली ! सारें आंग तिनें गुरंगटून घेतलें. वेणू

सुखावली होती, मंदावली होती, आळसावली होती! नीज. तुला जाग्रण आहे. नीज, वेणू नीज!

तिला झोप येईना. कांहींतरी चावूं लागलें. अंथरुणांत चावूं लागलें. ढेकूण, पिसवा! वेणू उठली. किती चावतें तरी! तिला ढेकूण दिसत नव्हते. पिसव दिसत नव्हत्या. परंतु चावत होतें खरें. तिनें ती वळकटी नीट गुंडाळून ठेवली. शालीचीं टोकें बाहेर नाहीं ना आलीं, तें नीट पाहिलें. ती उठली. उठलें तरी चावतेंच आहे कांहींतरी! दार उघडूं दे. वेणूनें दार उघडलें. जोराचा वारा आंत घुसला. देवाघरचा वारा. मोकळ्या रानावनांतील, आकाशांतील वारा. वाऱ्याबरोबर पावसाचे थेंब आले. देवाच्या कृपेचे थेंब! जोराचाच पाऊस आला. वेणूनें दार बंद केलें नाहीं! बाहेर पाण्याचे खळखळाट प्रवाह वाहात होते. सारी घाण धुतली जात होती. सारें स्वच्छ होत होतें. वेणू शांत खिन्नतेनें तेथें बसली होती. तिच्या डोळ्यांतून दोन थेंब गालांवर घळघळले. ते थेंब कसले होते? ते थेंब सुखाचे होते का दुःखाचे? आशेचे कीं निराशेचे? पापाचे का पश्चात्तापाचे? अश्रूंची फार चिकित्सा करूं नये. दंवबिंदूला फोडून पाहूं नये. सारें विश्व त्यांत असतें!

"वेणू, दार उघडें काय ठेवलेंस! सारी खोली ओली झाली," रघुनाथ येतांच म्हणाला.

"खोलींतील घाण जाईल. खोली स्वच्छ होईल. येथें फार चावतें. जरा पडलें तर सारखें चावे. उघडें टाकलें दार. होऊं दे स्वच्छ. खोली धुवून निघूं दे." वेणू म्हणाली.

"आम्ही सारेच धुवून निघालों. पावसांत सापडलों. छत्र्या असून निरुपयोगी झाल्या. वाऱ्याची फारच जोराची झड," नामदेव म्हणाला.

"भाऊ, तुमच्या खोलींत काय काय रे आहे?" वेणूनें विचारलें.

"काय असणार वेण्ये? पुस्तकें, वह्या, अंथरुणें, भांडीं, एक टेबल, दोन खुर्च्या, दोन फोटो आहेत," रघुनाथ म्हणाला.

"कोणाचे रे फोटो?" तिनें विचारलें.

"एक रामाची तसबीर आहे आणि दुसऱ्या फोटोंत मी व नामदेव आहोंत," रघुनाथ म्हणाला.

" तुम्ही दोघे एका फोटोंत ?" वेणूनें विचारलें.

" हो. छान आहे फोटो. परंतु तुला कोठें दिसतें ?" रघुनाथ म्हणाला.

" भाऊ, मला देशील तो फोटो ? मी आईला दाखवीन. आईला तुझी कितीतरी आठवण येते. आपला फोटो आपल्याजवळच ठेवण्यांत रे काय मजा ? ज्याच्याजवळ आपण नाहीं, त्याच्याजवळ तो ठेवण्यांत अर्थ आहे. खरें ना ?" वेणूनें मार्मिक प्रश्न केला.

" हो, तूं घेऊन जा," रघुनाथ म्हणाला.

" मग तो नीट बांधून ठेव," वेणू म्हणाली.

रघुनाथानें फोटो बांधून एका पिशवींत भरून ठेवला.

रात्रीं स्वामी निघाले. वेणू निघाली. रघुनाथ व नामदेव स्टेशनवर पोंचवायला गेले. तिकिटें काढून मंडळी प्लॅटफॉर्मवर गेली. वेणू आंत खिडकीजवळ बसली. ती फोटोची पिशवी तिच्या हातांत होती. स्वामी बोलत होते. वेळ संपत आली. घंटा झाली.

" भाऊ, जातें मी. आतां मला पत्र लिहितां येणार नाहीं. पत्र आलेलें वाचतां येणार नाहीं. भिकाच्या पत्रांतच आतां सारें लिहीत जा. निराळें पत्र नको. वेणू जणूं आतां निराळी नाहीं. वेणूचे डोळे गेले व वेणूचें निराळेंपण गेलें," वेणू म्हणाली.

" उगीच रडत जाऊं नकोस. आशेनें पाहा. एक दिवस येतील तुझे डोळे. खरोखर येतील," रघुनाथ म्हणाला.

" मी सूत कांतीन. गाणीं गाईन. डोळे मिटून कांतण्याची मी सवयच केली होती. खूप कांतीन. तुम्हांला त्याचीं धोतरें होतील. माझ्या हातच्या सुताचीं धोतरें," वेणू म्हणाली.

पुन्हा घंटा झाली. शिटी झाली.

" बरें, नामदेव, रघुनाथ ! मी काय तें पत्र पाठवतों. गोपाळरावांचा सल्ला घेतों," स्वामी म्हणाले.

" बरें वेणू," नामदेव म्हणाला.

" तुम्हांला सुताचीं धोतरें देईन बरें का," वेणू म्हणाली.

" मी नेसेन," नामदेव म्हणाला.

निघाली गाडी. भगभग करीत गेली. आंधळी वेणू खिडकीवाटे अनंत सृष्टि बघत होती. वासनाविकारांची, भावनाविचारांची, आशानिराशांची, पापपुण्याची, सदसतांची, सुखदुःखांची, महान् सृष्टि ती बघत होती.

" वेणू, तूं पडतेस कां?" स्वामींनीं विचारलें.

" मी अशीच बसतें. माझे डोळे नेहमीं मिटलेलेच आहेत. तुम्ही पडा. मी तुमच्या पायाशीं अशी बसतें." असें म्हणून वेणूनें ती पिशवी हृदयाशीं घट्ट धरिली! त्या लहानशा पिशवींत तिचीं मोलाचीं माणिकमोतीं होतीं! आंधळ्या वेणूचें सर्व सौभाग्य, सर्व धाम त्या पिशवींत होतें.



११

# आश्रमाचा वाढता व्याप

## भावनांची वाढती गुंफण

देवपूरचा आश्रम चांगला चालूं लागला. गांवांतील तीनचार मुलें विणकाम शिकलीं. विणण्याचें काम तीं मुलें आश्रमांत करीत व आश्रम त्यांना मजुरी देई. गांवांतील बायका आश्रमास दुवा देऊं लागल्या. पहाटे रस्त्यांतून हिंडलें तर चरख्याचें गूं गूं सर्वत्र ऐकूं येत असे. गांवांत आतां रिकामें कोणी नसे. निरुद्योगी कोणी नसे.

देवपूरला झालेली खादी स्वामी अमळनेरला घेऊन जात व ती तेथें विकून टाकीत. होतांहोईतों खादी शिल्लक न राहूं देण्याची ते खबरदारी घेत. छात्रालय हें मुख्य गिऱ्हाईक होतें. शिवाय गांवांतीलही कांहीं लोक आश्रय देत असत.

आश्रमानें गांवाची स्वच्छता ठेवली होती. संडास व मोऱ्या ह्यांची सुधारलेली आश्रमी पद्धति गांवांत सुरू करण्यांत आली. गांवांतील मुलांनाच गांवचा अभिमान वाटूं लागला. आपला गांव स्वच्छ असावा. आपल्या गांवची अब्रू जाऊं नये असें त्यांना वाटे.

आश्रमातर्फे चार प्रचारक अमळनेर तालुक्यांत हिंडूं लागले. पंचवीस पंचवीस गांवें एकेकाकडे देण्यांत आलीं होतीं. आठवड्यांतून सहा दिवशीं सहा गांवें घ्यावीं व सातवा दिवस आश्रमांत घालवावा. तेथें माहिती द्यावी. पुन्हा

निघावें. अशा प्रकारें प्रचारक घुमूं लागले. राष्ट्रीय जागृति हा त्यांचा मुख्य विषय असे. ह्या विषयाभोवतीं ते अनेक विचार गुंफीत असत. देशांतील सर्व चळवळींचे इतिहास, आपली दुःस्थिति, इतरत्र कसे प्रयोग चालले आहेत, आपण काय केलें पाहिजे, संघटनेचें महत्त्व, निर्भयता, ऐक्य, स्वदेशीचें महत्त्व—शेंकडों गोष्टी प्रचारक सांगत. कधीं ते गाणीं म्हणत, कधीं गोष्टी सांगत. कधीं वर्तमानपत्रें वाचून दाखवीत. कधीं देशभक्तांचीं चित्रें नेऊन देत. कधीं ते स्वतः गांव स्वच्छ करीत, कधीं औषधें आणून देत. विचारांचे वारे अमळनेर तालुक्यांत फिरूं लागले. ज्या गांवांत गेल्या शंभर वर्षांत कधीं कोणी विचार देण्यास आलेला नसेल, अशा त्या गांवांतून प्रचारक हिंडूं लागले. महात्मा गांधी, पंडित जवाहरलाल, लोकमान्य टिळक, देशबंधू दास वगैरे नांवें कानांवर पडूं लागलीं. १९२०–२१ सालांतील असहकारितेचा इतिहास, जालियनवाला बागेंतील हृदयास घरें पाडणारे प्रसंग, लष्करी कायद्याच्याखालील मनुष्यास लाजविणारे प्रकार—सर्व गोष्टी शेतकऱ्यांच्या कानांवर पडूं लागल्या. इतर देशांत सरकारी नोकरांस पगार कसे कमी आहेत, इतर देशांत शिक्षणावर कसा कोट्यवधि रुपये खर्च करण्यांत येतो, एका जपान देशांत सातशेंच्या वर उद्योग-धंद्यांच्या शाळा आहेत व हिंदुस्थानांत सातसुद्धां कशा नाहींत, इतर देशांतील सहकारी पेढ्यांचें भांडवल कसें मुबलक असतें, आपल्याकडे कसा खेळखंडोबा आहे—सारा इतिहास खेड्यांतील जनतेला कळूं लागला.

प्रचारक कोणीं जेवायला बोलावलें तर त्याच्याकडे जात, नाहींतर स्वतः हातानें करीत. भाकरीचें व बेसनाचें पीठ, कांदे, तवा, पितळी लोटा त्यांच्या-बरोबर असे. त्या त्या गांवांत खादीधारी कोण आहेत, निर्भय वृत्तीचे कोण आहेत, वर्तमानपत्रें कोणाकडे येतात, कोणतीं येतात, गांवांत भांडणें आहेत कीं काय, गांवांत गुरेंढोरें किती, गांवाचा शेतसारा किती, पूर्वी किती होता, किती वाढला, गांवाला कर्ज किती, सोसायट्यांचें किती, सावकारांचें किती, शाळा आहे कीं नाहीं, मुली शाळेंत जातात कीं नाहीं, लिहावयास किती लोकांस येतें—सर्व माहिती प्रचारक गोळा करीत असत. तालुक्याचा तो उत्कृष्ट अहवाल तयार झाला असता. शंभर वर्षांत खेडीं कशीं झालीं त्याचा तो जळजळीत इतिहास तयार होत होता. दारूचा तर एक स्वतंत्र ग्रंथच तयार झाला असता; गांवोगांव दारूपायीं भिकारी झालेलीं कुटुंबें होतीं. मोठमोठ्या हवेल्या दारूपायीं सावकारांच्या

घरांत कशा गेल्या व सुखवस्तु घरंदाज शेतकरी अन्नाला मोताद कसे झाले, अब्रू कसे गमावून बसले, मुलाबाळांचे, बायामाणसांचे कसे हाल झाले – ह्याच्या कादंबऱ्याहून रोमांचकारी व उत्कट कथा गांवोगांव ऐकायला मिळत !

प्रचारकांना कोठें कोठें पाटलाचा त्रास होई. परंतु प्रचारक खंबीर होते. "येथें व्याख्यान द्यायचें नाहीं, आम्हांला तसा हुकूम आहे," असें कोणी सांगे. कोणी म्हणे, "व्याख्यान द्याल तर मार खावा लागेल."

"आम्ही व्याख्यान तर देणार. सारे कायदे आम्हांला माहीत आहेत. तुमच्यावरच क़ायदेशीर इलाज आम्ही करूं; नाहींतर गप्प बसा व आम्ही काय सांगतों तें ऐका," असें प्रचारक त्यांना बजावीत.

ज्या गांवांतून सत्यशोधकी चळवळ पूर्वीं गेलेली होती, त्या गांवांत राष्ट्रीय विचार लौकर पटत. कोणत्याही निमित्तानें झालेली बुद्धीची हालचाल ही शेवटीं उपयोगी पडतेच पडते. म्हणून विवेकानंद म्हणत, 'पडून राहाण्यापेक्षां चोरीही कर.' सत्यशोधकी चळवळीचें एक प्रकारें काम झालें. महात्मा गांधींची चळवळ सुरू झाली व भेदाभेदांचें पाखंड कमी होऊं लागलें. कनिष्ठपणाचें थोतांड कमी होऊं लागलें. सर्व सेवेचीं कर्में पवित्र आहेत ही भावना उत्पन्न झाली. सुशिक्षितांचें तोंड खेड्यांकडे वळविण्यांत आलें. ऐट जाऊन जीवनांत साधेपणा येऊं लागला. शेतकरी व कामकरी ह्यांच्या जीवनांतील दिव्यता व मोटेपणा वरच्या पांढरपेशांस कळून येऊं लागला. धर्मांतील टिळेमाळांचें स्तोम कमी होऊन सेवेला महत्त्व आलें. बोलघेवड्या धर्माचें महत्त्व जाऊन त्यागाची पारख होऊं लागली. सत्यशोधक समाजाचें कार्य कॉंग्रेसनें एक प्रकारें आपल्या हातांत घेतलें. सत्यशोधक समाज म्हणजे प्रेम, स्नेह, समता पाहाणारा समाज, अन्यायाशीं, खोट्या उच्चनीचपणाच्या भावनांशीं झगडणारा समाज ! सत्य-शोधक समाजाचें हें मुख्य कार्य होतें.

प्रचारकांना हा मोलवान अनुभव आला. सत्यसमाजी गांवें भराभरा राष्ट्रीय वृत्तीचीं होऊं लागलीं. प्रेमानें खादी घेऊं लागलीं. कॉंग्रेसचे सभासद होऊं लागलीं. कॉंग्रेसचे प्रचारक अहंकार न बाळगतां प्रेमानें आपलीं गांवें झाडावयास येत आहेत हें पाहून कोणा सत्यशोधकाचें हृदय फुलणार नाहीं ? कोणाला आपला पंथ कृतार्थ झाला असें वाटणार नाहीं ?

स्वामी प्रत्यक्ष ह्या प्रचारकांशीं संबंध आहे असें दाखवीत नसत. दूर राहून सारीं सूत्रें ते हलवीत होते. देवपूरच्या आश्रमांत ते दर रविवारीं जात. सर्व प्रचारकांची त्या दिवशीं गांठ पडे. सारे अनुभव ते ऐकत. सर्वांचा विचारविनिमय होई. काम फार व्यवस्थितपणें चाललें होतें.

स्वामीजी एका रविवारीं प्रचारकांना म्हणाले, " तुमच्याबरोबर राष्ट्रीय झेंडा नेहमीं ठेवीत जा. संन्याशाचा दंडा, तसा आपला हा झेंडा. वारकऱ्यांची पताका त्यांच्या खांद्यांवर. आपला झेंडा आपल्या खांद्यांवर. राष्ट्राचें हें निशाण सर्वत्र फडफडलें पाहिजे. लहान लहान झेंडे आपण तयार करूं व गांवोगांव मुलांना वाटूं. जो मुलगा झेंड्याचें गाणें व वंदेमातरम् पाठ म्हणेल, त्याला झेंडा बक्षीस असा उपक्रम सुरू करा. मुलांबाळांच्या हातांत हे झेंडे जाऊं दे. मुलांबाळांच्या तोंडीं राष्ट्राचीं गाणीं जाऊं दे. "

ही कल्पना सर्वांनाच आवडली. तसेंच ज्या गांवांत मुक्काम असेल त्या गांवांत पहाटे प्रभातफेरी काढावी. नाना गाणीं म्हणावीं. आतां शेतकऱ्यांचें कामकऱ्यांचें राज्य येणार. आम्ही उद्यांचे मालक. आमच्या देशाचे स्वामी! अशा अर्थांचीं गाणीं म्हणा. स्वाभिमान, निर्भयता, संघटना व सेवा ज्यामुळें उत्पन्न होतील अशीं गाणीं म्हणत जा. हीं गाणीं आपण छापूनच काढूं आणि गांवोगांव वाटूं.

उन्हाळ्याची सुटी जवळ येत होती. नामदेव व रघुनाथ लौकरच परीक्षा संपून येणार होते. स्वामींच्या मनांत एक नवीन कल्पना आली. छात्रालयांतील किंवा शाळेंतील मुलांना सुटीमध्यें खेड्यांतील रस्ते करण्यासाठीं बोलवावयाचें! देवपूर व मारवड जो रस्ता होता, तो पावसाळ्यांत ढोंपरढोंपर चिखलाचा होत असे. पावसाळ्यांत हा रस्ता जवळजवळ बंदच होई. बैल गाऱ्यांत फसत. फार फजिती उडे. हा मैल दीडमैलाचा रस्ता आपण उन्हाळ्याच्या सुटींत तयार करावा असें स्वामींच्या मनांत आलें. ह्या वर्षीं मेळा नको. हाच ह्या वर्षींचा मुख्य कार्यक्रम. स्वामी मनांत योजना करूं लागले. दैनिकांत त्यासंबंधीं ते लिहूं लागले. चीनमधील सारे रस्ते चिनी तरुण विद्यार्थ्यांनीं कसे तयार केले, त्याची माहिती ते देऊं लागले. मुलांनीं सुटींत घरीं न जातां अशा प्रकारें खेड्यांतील जनतेशीं प्रेमाचा व सेवेचा संबंध जोडावा. दिवसा काम करावें, रात्रीं प्रवचनें, कीर्तनें, संवाद, पोवाडे, नकला, सदीप व्याख्यानें ह्यांचा कार्यक्रम ठेवावा. दिवसा

शरीराचा आनंद, रात्रीं मनाचा आनंद ! देवपूरला नदीही आहे. पाण्यांत डुंबावें, पोहावें. मौजच मौज !

स्वामींनीं त्या भावी मनोरथाचें मनोहर चित्र दैनिकांत काढलें. मुलांमधून चर्चा, वाच्यता होऊं लागली. कांहीं शिक्षकही म्हणूं लागले कीं आपणही जाऊं.

नामदेव व रघुनाथ आले. स्वामींना भेटले.

" रघुनाथ, देवपूरला तुम्ही जा व आश्रमांतच राहा. गांवांतील लोक गाड्या वगैरे देतील का त्याची चौकशी करा. आपणांस दगड आणावे लागतील. धाड गांवाहून दगड आणावे लागतील. तेथील टेकडीवरून दगड भरून गाड्या आणाव्या लागतील. किती गाड्या मिळतील ? आजूबाजूच्या प्रदेशांत दगड जवळपास कोठें आहेत ? सारी चौकशी करा. लोकांत खूप उत्साह उत्पन्न करा. जवळजवळ शंभर स्वयंसेवक मिळतील असें दिसतें. आपणांस झोपड्या उभाराव्या लागतील कीं काय ? मशीद मोठी आहेच. मशिदींतच तळ द्यावा. देवाचे मजूर मशिदींतच शोभतील ! थंडगार मशीद आहे. कांहीं झाडाखालीं पाल वगैरे द्यावे. पाहा, गांवांतील लोकांशीं चर्चा करा. माझ्या मनांत किती आनंद उत्पन्न होत आहे सांगूं ? " स्वामी म्हणाले.

" नामदेव शेवटीं शेवटीं घरीं जाणार आहे. तोही आश्रमांतच राहाणार आहे. रस्ता वगैरे झाला म्हणजे तो वडिलांना भेटायला जाईल, " रघुनाथ म्हणाला.

" आधीं काम, मग घरची मंडळी. नामदेव, खूप काम करायचें बरें का ? गांवांतील लोकांना मोहून टाक. गांवांत संगीत ने, चैतन्य ने. प्रकाश ने. प्रभातफेरींत तुम्हीही सामील व्हा. वेणूबरोबर तुम्हीही गा. तुम्हीही झेंडे घ्या. लाजूं नका. झेंडा खांद्यावर घ्यावयास लाजेल त्यानें जगावें कशाला ? ह्या भारतमातेचें जो जो अन्न खातो, येथलें जो पाणी पितो, येथली हवा घेतो, त्या सर्वांचें भारतमातेचा झेंडा उंच राखणें हें पहिलें कर्तव्य आहे. तुम्हा सुशिक्षितांना नाहींतर लाज वाटूं लागते. देशाचीं गीतें म्हणावयाची लाज, देशभक्तांचा जयजयकार करण्याची लाज, झेंडा हातांत घेण्याची लाज ! ही लाज फेकून दिली पाहिजे. गाणें न म्हणण्याची लाज वाटो. झेंडा हातांत न घेणाऱ्या माणसाची किळस येवो. तुकाराम महाराजांनीं म्हटलें आहे, ' मेली लाज धीट केलों देवा. ' लाज मेल्याशिवाय धैर्य नाहीं. धैर्याशिवाय कार्याची प्रगति नाहीं.

समजलेत ना? सारा गांव चैतन्यमय, राममय, करा." स्वामीजी जळजळीत संदेश देत होते व ते दोघे जयविजय तो संदेश हृदयांत सांठवीत होते.

नामदेव व रघुनाथ देवपूरला गेले. ते आधीं आश्रमांत उतरले. नंतर रघुनाथ नामदेवाला बरोबर घेऊन घरीं गेला. वेणू चरक्यावर सूत कांतीत होती. तोंडानें गाणें म्हणत होती. वेणू म्हणजे एखादी देवताच दिसत होती. शांत, पवित्र, गंभीर.

"वेणू, आम्ही आलों ना," रघुनाथनें वेणूची तंद्री मोडली.

"केव्हां रे आलेत? उद्यां ना येणार होतेत," वेणू चरका थांबवून बोलूं लागली.

"स्वामी म्हणाले आजच जा. ह्या सुटींत खूप काम करावयाचें आहे. आपल्या गांवापासून मारवडपर्यंतचा रस्ता तयार करावयाचा आहे," रघुनाथ म्हणाला.

"तुम्ही चौघेपांचजण का एवढा रस्ता तयार कराल? तुम्ही का सुग्रीव मारुती आहांत वाटतें?" वेणूनें विचारलें.

"अमळनेरचीं शंभर मुलें येणार आहेत. सेवा सैनिकांची छावणी देवपूरला पडणार आहे. रात्रीं निजावयास नदीचें वाळवंट. दिवसा पडावयास थंडगार मशीद! शंभर मुलें येणार! वेणू, आपल्या गांवचें भाग्य थोर आहे. भिका व जानकू ह्यांचें हें श्रेय आहे. वेणूची तपश्चर्याही त्याला कारण आहे," रघुनाथ म्हणाला.

"भाऊ, तूं एकटाच आलास? तुझे मित्र घरीं गेले वाटतें? ते नाहीं इकडे येणार?" वेणूनें विचारलें.

"ते कशाला इकडे येतील? ते का असें काम करतील? त्यांच्या घरीं संत्र्यांचा मळा आहे. तो थंडगार मळा सोडून येथें का उन्हांत मरायला येतील? सुखांत वाढलेले ते," रघुनाथ थोडें हसत बोलत होता.

"का रे त्यांची निंदा करतोस? पुण्यास मी आलें होतें, तेव्हां त्यांनीं भांडीं घासलीं. सुखांत वाढलेले भांडीं घासतील वाटतें? सुखांत वाढलेले कंदिलावर हात भाजून घेतील वाटतें? येतील. ते सुद्धां येतील. स्वामींची हाक ऐकतांच ते आल्याशिवाय राहाणार नाहींत. स्वामींना त्यांच्याबद्दल किती प्रेम वाटतें! ते एखादे वेळेस त्यांच्या खूप गोष्टी सांगतात. स्वामींचा कंदील कसा पुसीत,

बागेंत पाणी कसें घालीत—सारें मला माहीत आहे. तेसुद्धा येतीलच. इतर मुलें येतील. भाऊ, मला काय आणलें आहेस ? सांग, तुझ्या आंधळ्या वेणूला काय आणलें आहेस ? " वेणूनें विचारलें.

" तुला एक काठी आणली आहे. काठीच्या आधारानें नीट चालतां येईल. " रघुनाथ म्हणाला.

" भिकानें मला चांगली दिली आहे काठी ! मी त्याच काठीला झेंडा लावतें. प्रभातफेरीच्या वेळेला मुली माझा हात धरतात. ती शहरांतील काठी कशाला ? असेल विलायती ! " वेणू म्हणाली.

" मी का विलायती घेईन ? मग स्वामींचें तोंडच पाहावयास नको. त्यांच्याजवळ इतके दिवस राहून इतकेंही नाहीं वाटतें तुझा भाऊ शिकला ? " रघुनाथ खिन्नपणें म्हणाला.

" भाऊ, थट्टेनें बोललें त्याचा राग आला वाटतें ? अरे, प्रेमानें कोणी कोणी विलायती घेतात हो. स्वामीच म्हणत होते कीं, ' पुष्कळ वर्षांपूर्वी त्यांनीं जपानी लेखणी कोणा नातलगाच्या मुलाला भेट म्हणून दिली ! ' स्वामी स्वतः विदेशी घेत नसत. परंतु मित्राच्या मुलावरील प्रेमासाठीं स्वदेशीला त्यांनीं चाट दिली ! प्रेमामुळें कधीं कधीं कर्तव्य आपण विसरतों असें स्वामींच्या दैनिकांत मीं वाचलें होतें. बघूं दे मला काठी. मला दिसणार आहे थोडीच ? बघूं दे, " वेणूनें हात पुढें केला.

रघुनाथनें नामदेवाचा हात वेणूच्या हातांत दिला.

" हा त्यांचा हात ! हें रे काय ? " वेणू लाजत म्हणाली.

" ही तुझी काठी ! पुण्याला ह्या काठीनेंच तुला नळावर नेलें होतें. आठवतें ? येथें ही काठी तुला सर्वत्र हिंडवील. मजबूत काठी आहे. न घसरणारी, न मोडणारी, स्वामींना आवडणारी—अगदीं स्वदेशी काठी, " रघुनाथ हसत म्हणाला.

" मला वाटलेंच होतें कीं तुम्ही दोघे याल म्हणून. तुम्ही आश्रमांत राहाणार होय ना ? भाऊ, मी चुलीजवळ बसून भाकरीसुद्धा भाजतें. येथें घरीं असतेत तर मीं तुम्हांला वाढली असती माझ्या हातची भाकरी, " वेणू म्हणाली.

" परंतु तुझ्या हातचीं धोतरें कोठें आहेत ? " रघुनाथनें विचारलें.

" खरेंच, मी विसरलेंच. कशीं धुवून नीट घड्या करून भिकानें ठेविलीं आहेत. परंतु तुम्ही आतां कशाला घेतां ? आतां येथें सुटींत काम करणार ना ? तीं फाटतील. तुम्ही शिकायला जाल, तेव्हां तीं घेऊन जा. म्हणजे तुम्हांला बरेच दिवस पुरतील. बरेच दिवस वेणूची आठवण राहील. आंधळ्या गरीब वेणूची," वेणू कांपऱ्या आवाजांत म्हणाली.

" आई कोठें आहे ?" रघुनाथनें विचारलें.

" नदीवर गेली आहे. येईलच आतां, " वेणू म्हणाली.

" आम्ही जातों वेणू, मग दुपारीं भेटूं पुन्हा." असें म्हणून रघुनाथ व नामदेव गेले.

रघुनाथ व नामदेव गांवांत अनेकांना भेटले. रस्ता दुरुस्त करण्याबद्दल बोलले. गांवांतील लोकांना अचंबा वाटला. कांहीं साशंकवादी म्हणाले, ' आधीं येऊं द्या तर खरीं मुलें. मग पाहूं गाड्यांचें. कोणी येणार नाहीं. शाळेंत शिकणारीं श्रीमंतांचीं मुलें का रस्ता खणायला येतील, खडी फोडायला येतील ? '

स्वामी अमळनेरच्या कांहीं व्यापाऱ्यांना भेटले. व्यापाऱ्यांनीं ह्या कामाला सहानुभूति दाखविण्याचें कबूल केलें. शंभर मुलांना महिनाभर जेवावयास जें सामान लागेल तें पुरविण्याचें त्यांनीं कबूल केलें. डाळ रोटी हेंच मुख्य खाणें ठरविण्यांत आलें. बेसनाचें पीठही आणण्यांत आलें. तेलाचे, तुपाचे डबे घेण्यांत आले. गुळाच्या भेल्या घेण्यांत आल्या. लागणारें सारें सामान व्यापाऱ्यांनीं पुरविलें. ' काय कमी पडेल तें घेऊन जा, ' असें ते म्हणाले.

जिनच्या व्यापाऱ्यांकडे जाऊन स्वामींनीं ताडपत्र्या घेतल्या. जिना बंद होत्या. त्यामुळें ताडपत्र्या पडलेल्या होत्या. रात्रीं वाळवंटांत ताडपत्र्या पसरल्या कीं झाली झोपायची बिछाईत ! मोठमोठीं भांडींही जमविण्यांत आलीं. जेवावयास केळीचीं पानें किंवा पत्रावळी असा बेत होता.

शाळेला सुट्टी झाली. शंभर मुलांची तयारी झाली. स्वामींनीं सामान जमविलें होतें. घमेलीं, फावडीं, कुदळी, टिकाव, पाहारी सारें सामान मोजून गाड्यांतून कांहीं मुलांबरोबर पुढें गेलें. ताडपत्र्या, धान्य वगैरे सारें आधींच पुढें गेलें होतें.

ते चार प्रचारक आले होते. चार शिक्षक आले होते. मुलांच्या हातांतून झेंडे होते. बिगूल बरोबर होतें. शिस्तीनें पावलें टाकीत सेवादल जाणार होतें ! ते पाहा पहाटे चारला बिगूल झालें. सारी मंडळी उठली. मैदानांत ठरल्याप्रमाणें

जमली. सर्वांची गिणती झाली. चारचारांच्या रांगा करण्यांत आल्या. दोन प्रचारक पुढें होते, दोन मागें होते. स्वामी मुलांतच डावा उजवा करीत चालत होते !

निघालें. सेवादल निघालें. तो परमपवित्र दिवस होता. हिंदुस्थानांतील तो अपूर्व दिवस होता. खानदेशांतील तें दिव्य दृश्य होतें. तरुण विद्यार्थी जगाचा पोशिंदा जो शेतकरी त्याची अल्प सेवा करावयास आनंदानें जात होते. तो अल्प आरंभ होता. तें शुभ चिन्ह होतें. राष्ट्रपुरुष जिवंत होत आहे ह्याची ती खूण होती.

**' आम्ही देवाचे मजूर । आम्ही देशाचे मजूर '**

हें गाणें म्हणत ते सेवक चालले. वाटेंतील खेड्यांतील लोक पाहावयास येत. झेंडेच झेंडे पाहून मुलें नाचूं लागत. आयाबहिणी कडेवर मुलें घेऊन ही यात्रा पाहावयास येत. ' गांधी बाप्पाचे लोक आहेत. ' असें त्या म्हणत.

वाटेंत मारवडचे स्वयंसेवक मिळाले ! सेवासागर उचंबळूं लागला, मारवडच्या लोकांनीं जयजयकार केला. वंदेमातरम्, वंदेभ्रातरम् गर्जना गगनाला गेली. महात्मा गांधीकी जय, भारतमाताकी जय असे जयजयकार दशदिशांत घुमले.

मारवडचे लोक म्हणाले, “ आम्हीही गाड्या देऊं. ”

स्वामी म्हणाले “ शाबास ! भारतमाताकी जय ”

ते पाहा देवपूरचे लोक सामोरे आले ! भिका, जानकू, रघुनाथ, नामदेव. त्यांच्याबरोबर गांवांतील तरुण मंडळी आहेत ! ती पाहा आंधळी वेणू ! मुलींचा हात धरून झेंडा घेऊन येत आहे. गाणीं म्हणत, लेझिम खेळत, झेंडे मिरवीत देवपूरचे लोक आले.

गंगा यमुनेला मिळाली ! शहर खेड्याला मिळालें. डोकें धडाला मिळालें. हृदय बुद्धीला मिळालें. जीव शिवाला भेटला, महादेवाला भेटला. जयजयकाराची एकच गर्जना झाली ! सारी मंडळी देवपूरला आली. गांवांत अपूर्व उत्साह भरला. घरांतून सारीं बाहेर आलीं. वाळवंटांत सारा जमाव जमला. स्वामींनीं दोन शब्द सांगितले. सारीं मुलें मशिदींत जाऊन बसलीं.

कामाची विभागणी सुरू झाली. मोठ्या मुलांची टोळी गांवांतील इतर स्वयंसेवकांबरोबर दगड गोळा करावयास पहाटे जावयाची असें ठरलें. गोळा

केलेले दगड गाड्यांत भरून आणण्यासाठीं दुसरी टोळी. हे दगड फोडण्यासाठीं व रस्त्यांत पसरण्यासाठीं बाकीचीं सारीं मुलें. एक महत्त्वाचें काम होतें. तें म्हणजे रसोड्याचें. तें काम स्वामींनीं नामदेवावर सोंपवलें. अमळनेरचा माधव वाणी व शंकर हे दोन स्वयंसेवक नामदेवाच्या बरोबर होते. त्या तिघांचें रसोयी व्यवस्था मंडळ होतें. गांवांतील बाया स्वयंपाक करून देण्यास उभ्या राहिल्या. ह्या तिघांनीं त्यांना सारें सामान पुरवावयाचें, सारी जबाबदारी पार पाडावयाची !

गांवांतील श्रीमंत, गरीब सारे कामावर घसरले. पोराबाळांना तर खूप उत्साह आला. चैतन्यानें चैतन्याची वाढ होते. दिव्यानें दिवा पेटतो. मढीं मढ्यांना जिवंत करूं शकत नाहींत. घरोघरच्या गाड्या निघाल्या. अमळनेरहून शंभर आले; परंतु शंभराचे पांचशें झाले. एकानें पुढें होण्याचा अवकाश असतो ! एक राम निघाला कीं अठरा पद्मे वानर त्याच्याबरोबर मरावयास उभे राहातात ! त्यागमय व प्रेममय सेवेंत विलक्षण आकर्षण असतें ह्यांत शंका नाहीं.

सकाळीं प्रार्थना होई. प्रार्थनेनंतर गूळ घातलेली कांजी सर्वांना देण्यांत येई. कांजी घेतल्याबरोबर सारे कामास निघत. अकरा वाजेपर्यंत काम असे. मध्यंतरीं विश्रांति. दोन वाजतां कामास पुन्हा सुरुवात होई ती सायंकाळीं साडेपांच वाजेपर्यंत.

साडेपांच वाजतां सर्व सेवादल गाणीं म्हणत परत येई. मग नदीमध्यें सारे डुंबत. श्रमपरिहार होई. आकाशांत तारे लुकलुकूं लागल कीं पंगत बस. आकाशाच्या खालीं जेवण होई. जेवण झाल्यावर प्रार्थना ! प्रार्थनेनंतर कोणी नकला करीत, कोणी गोष्ट सांगे. प्रत्येकानें आपल्या आयुष्यांतील स्मरणीय गोष्टी सांगाव्या असें एकदा ठरलें. त्या गोष्टी कधीं खूप हसवीत तर कधीं रडवीत. पोवाडे होतेच. प्रचारकांना पोवाडे उत्कृष्ट म्हणतां येत असत. एक दिवस स्वामींनीं कीर्तन केलें. आंधळी वेणू पाठीमागें उभी राहिली होती. अशा प्रकारें आनंदांत दिवस जात होते.

उन्हांतून मुलें काम करणार ! कोणी आजारी पडावयाचा एखादा ! अमळनेरचे एक तरुण उत्साही डॉक्टर सकाळीं येत. सारें ठीक आहे असें पाहून जात. त्या मुलांपैकीं कोणी आजारी पडलें नाहीं. प्रेमळ परमेश्वर त्यांना कां

आजारी पाडील? देवाची सेवा करायला आलेलीं तीं लेकरें! तीं सारीं सुखी होतीं! मस्त होतीं!

वेणू रस्त्याच्या बाजूला उभी राहून गाणीं म्हणे. गोड गाणीं. काम करणाऱ्यांना तिचीं गाणीं स्फूर्ति देत. एखादे वेळेस वेणूला राहावत नसे. ती सुद्धा खडी फोडायला लागे!

"वेणू, तुला दिसत नाहीं. हातावर घाव पडेल," रघुनाथ म्हणाला.

"भाऊ! तुमचे सर्वांचे खडबड आवाज ऐकले, ठकठक आवाज ऐकले कीं आपणही जावें असें मला वाटतें. ते आवाज मला बोलावतात. 'चल, वेणू चल," असें मला कोणी तरी म्हणतें," वेणू म्हणाली.

एके दिवशीं एक विशेष गोष्ट घडली. वेणू रोज दुपारीं राममंदिरांत जात असे. हातांत काठी घेऊन वेणू आतां नेमकी जात असे. दुपारच्या वेळीं सारे श्रमजीवी लोक जेवावयास बसले होते. स्वामीजी, शकर, माधव सारे वाढीत होते. स्वामी आधीं बसत नसत. रघुनाथ, नामदेव, स्वामी, शंकर, माधव, भिका, जानकू, ते चार प्रचारक असे हे एकंदर अकरा रुद्र सर्वांचें आटोपल्यावर बसत असत.

त्या दिवशीं नामदेवाचा हात जरा भाजला होता. चांगलाच फोड आला होता. त्याला भांडें धरतां येत नव्हतें. वाढतां येत नव्हतें.

"नामदेव, राममंदिरांत जाऊन पड जा तूं. माझ्यासाठीं तुम्हांला त्रास." स्वामी म्हणाले.

"त्रास कसला? तुमचा आनंद तो आमचा आनंद. आयुष्यांतील हेच दिवस आम्ही खरोखर जगलों. बाकीचे दिवस फुकट गेले," नामदेव म्हणाला.

"जा. तू जरा विश्रांति घे. बराच भाजला हात," स्वामी म्हणाले.

नामदेव शांतपणें राममंदिरांत आला. तों राममदिरांत त्याला एक मंगल गोष्ट दिसली. वेणू राममंदिरांत आली होती. दुसरें कोणी नव्हतें. रामाच्या पायाजवळ वेणू होती. वेणूनें रामाचे पाय धरले होते. रामाचे पाय हातांनीं घट्ट धरून ती रामरायाच्या मुखचंद्राकडे पाहात होती! किती उत्कंठेनें ती पाहात होती. किती प्रेमानें व भक्तीनें ओथंबून येऊन ती पाहात होती. वर डोळे करून ती देवाजवळ प्रकाश का मागत होती? दृष्टि का मागत होती? भक्ति मागत

होती का मुक्ति मागत होती? का कांहींच मागत नव्हती? तें शब्दहीन पाहाणें होतें? ती केवळ प्रार्थना होती?

तें दृश्य पाहून नामदेवाला काय बरें वाटलें? ज्यांना देवानें डोळे दिले आहेत ते इतक्या प्रेमानें भगवंताची मूर्ति कधीं पाहातात का? आंधळी वेणू पाहात आहे आणि डोळस लोक आंधळे आहेत! नामदेवाला स्वतःच्या खोलींतील रामाची तसबीर आठवली. छात्रालयांत असतांना आपल्या खोलींत येऊन त्या रामाच्या तसबिरीवर स्वामींनीं असेंच एकदां डोकें ठेवलें होतें! असेंच दारांत येऊन आपण पाहात होतों! वेणू आंधळी कीं मी आंधळा? इतक्या भक्तीनें मीं कधीं पाहिलें आहे का देवाकडे? माझ्या खोलींतील तसबिरीकडे? माझ्या फोटोकडे जितक्या प्रेमानें मीं पाहिलें असेल, तितक्या प्रेमानें रामाला पाहिलें नसेल! शोभा म्हणून माझ्या खोलींत रामाची तसबीर आहे. हृदयाला उन्नत व पवित्र करण्यासाठीं म्हणून नाहीं!

नामदेवही हळूच देवाजवळ गेला.

" वेणू, माझेही हात देवाच्या पायांवर ठेव. तुझ्या हातानें माझेही हात देवाच्या पायांवर ठेव. घे हे माझे हात, " नामदेव खिन्न स्वरांत म्हणाला.

" द्या तुमचे हात, " वेणू म्हणाली.

वेणूनें नामदेवाचे हात रामाच्या पायांवर ठेवले.

" आतां आपण दोघांनीं एकदम ठेवूं या, " ती म्हणाली. दोघांनीं हात ठेवले.

" आतां आपण दोघांनीं आपलीं शिरें देवाला वाहूं या, " ती म्हणाली.

दोघांनीं आपलीं मस्तकें देवाला दिलीं. दोघांचीं डोकीं एकमेकांना लागलीं.

" तुमचा हात सुजला आहे? " वेणूनें विचारलें.

" तो भाजला आहे, " नामदेव म्हणाला.

" कां हो आपला हात पुनः पुन्हा भाजतां? असा सुंदर, गोड, गोंडस हात! देवाचे पाय धरण्याची इच्छा करणारे पवित्र हात—कां त्याचे हाल करतां? तुमचा हात भाजला म्हणजे माझाच हात भाजला असें मला वाटतें. खरेंच माझ्या हाताची आज अशीच आग होत होती. म्हणून तर मी रामाचे पाय येऊन धरले. शंकराच्या विषाची आग रामानें शांत केली. त्या रामाचे पाय धरून हात शांत होतील असें मला वाटतें. माझ्या हाताची आग

कां होत होती तें आतां कळलें. तुमचा हात आतां तुमचा नाहीं. तो माझा आहे. माझ्या परवानगीशिवाय त्या हाताचें तुम्हांला कांहीं नाहीं करतां येणार. रामाची साक्ष, " वेणू म्हणाली.

" वेणू, मीं मुद्दाम नाहीं भाजला ! त्याच्यावर कढत वरण सांडलें. मी कांहीं वेडा नाहीं किंवा इतका विरक्त नाहीं. मी साधा जीव आहें, " नामदेव म्हणाला.

" तुम्हांला जेवायचें असेल ना ? जा ना आतां. स्वामी वाट पाहात असतील, " वेणू म्हणाली.

" मी जातों. " असें म्हणून नामदेव गेला.

गांवोगांवचे लोक हें सेवाकर्म पाहावयास येत होते. अमळनेरचीं किती तरी मुलें सायकलवरून येत; थोडा वेळ त्यांनाही स्फूर्ति येई. तेही टिकावाचे दोन घाव घालीत. तेवढेंच हातांना पावित्र्य ! एक दिवस अमळनेरचे चार वकील सायकलवरून आले. त्यांनींही रस्त्यांत दगड पसरले. सर्वांनीं ' महात्मा गांधी की जय ' केला.

" तुम्ही कशाला रावसाहेब आलांत ? " देवपूरचे लोक वकिलांना म्हणाले.

" अरे, आमच्या स्वार्थासाठीं. अमळनेरचे अमुक वकील आले होते हें तुम्हांला स्मरण राहील. तुम्ही आम्हांला विसरणार नाहीं, " एक वकील म्हणाले.

" अहो, आमचीं मुलें आहेत येथें काम करण्यांत, मग आम्हांला का घरीं राहावतें ? म्हटलें जावें अर्धी घटका तरी, " दुसरा म्हणाला.

" ह्या गांधींनीं सर्वांना वेड लावलें आहे. सर्वांना जुंपलें आहे गाड्याला. " तिसरा म्हणाला.

" सारे ओढतील तेव्हांच राष्ट्राचा गाडा पुढें चालेल, " चौथा म्हणाला.

अशा प्रकारें हें सेतुबंधन चाललें होतें. हें मार्गसृजन चाललें होतें. रस्ता तयार झाला. सुंदर रस्ता झाला. मुलांचा आनंद कोण वर्णन करील ? मुलें बाजूला उभीं राहून रस्त्याकडे बघत व लोटांगण घालीत !

उद्यां छावणी उठणार होती. उजाडत्या पहाटे प्रार्थना होऊन तीं थोर मनाचीं मुलें परत जाणार होतीं. उरलेले सुटीचे पंधरा दिवस प्रेमळ आई-बापांच्या संगतींत घालविण्यासाठीं तीं जाणार होतीं. रात्रीचें जेवण झालें. प्रार्थना झाली. सारी मंडळी वर्तुळाकार बसली होती. स्वामी शेवटचे दोन शब्द सांगणार होते. सर्वत्र शांतता, गंभीरता पसरली होती.

" माझ्या साऱ्या प्रेमळ मित्रांनो ! मी तुम्हांला काय सांगूं ! माझें हृदय खरोखर शतभावनांनीं भरून आलें आहे. माझ्या हाकेस ओ देऊन जवळ जवळ एक महिनाभर येथें उन्हातान्हांत अत्यंत आनंदानें तुम्हीं काम केलेंत. कोणाला बारिकसारिक दुखापतीही झाल्या. परंतु ईश्वरकृपेनें कोणी आजारी पडलें नाहीं. ह्या प्रसंगाची आठवण तुम्हांला जन्मभर पुरेल. हा सेवेचा सुवास सर्व जन्मभर येत राहील. सेवेचें एक सत्पुण्य सर्व जीवनाला सुगंधी करूं शकतें. तुम्ही येथें श्रम केलेत. त्याचा अभिमान बाळगूं नका. वर्षेंच्या वर्षें शेतकरी तुमच्यासाठीं उन्हातान्हांत, चिखलांत, कांट्यांत काम करीत असतो. तो दिवस पाहात नाहीं, रात्र पाहात नाहीं; थंडी पाहात नाहीं, पाऊस पाहात नाहीं. तुम्हांला धान्य मिळावें, तुम्हांला भाजी मिळावी, तुम्हांला दूधतूप मिळावें, तुमच्या कपड्यांसाठीं कापूस मिळावा—ह्या सर्व गोष्टींसाठीं कोट्यवधि शेतकरी वर्षांनुवर्षे खपत असतात ! आपण दहा वीस दिवस गंमतीनें, खेळीमेळीनें काम केलें. परंतु त्या शेतकऱ्यांच्या अपरंपार श्रमापुढें हे आपले श्रम कांहींच नाहींत ! ह्या कामाचें महत्त्व एवढेंच कीं आपण आपल्या भावांचें स्मरण केलें ! कृतज्ञतेनें त्यांच्या घरीं क्षणभर आलों.

" मित्रांनो ! हा लहानसा रस्ता एक दिवस स्वातंत्र्याकडे घेऊन जाईल. ज्या वेळेस शहरांतील सुशिक्षित लोक खेड्यांतील जनतेंत शिरून एकरूप होतील, त्या वेळेस स्वातंत्र्याचा मार्ग तयार होईल ! ह्या रस्त्यावर तुम्हीं दगड, धोंडे आणून टाकलेत ! परंतु स्वातंत्र्याच्या मार्गावर स्वतःच्या जीवनाचे दगड, धोंडे ओतावे लागतील. लाखों जीवनें स्वतःला गाडून घेतील, तेव्हां स्वातंत्र्य मिळेल !

" आपण एक महिनाभर परमसुखांत आयुष्य दवडलें. एकरूप झालों, समरस झालों. देवपूरच्या लोकांचें सहकार्य—त्याशिवाय हें काम होतें ना. येथील आयाबहिणींनीं रसोयी केली. मी आभार तरी कोणाचे मानूं ? मारवड येथील जनतेचेंही विस्मरण होतां कामा नये. अमळनेरचे व्यापारी विसरून चालणार नाहीं. सर्वांना मी धन्यवाद देतों. असेंच सहकार्य वाढो, प्रेम वाढो, त्याग वाढो, बंधुभाव वाढो आणि ह्या लाखों खेड्यांना सुखाचे दिवस येवोत. भारत वर्षाचीं हीं मुलें सुधारलीं म्हणजे सर्व भारतवर्ष सुधारला असें म्हणतां येईल. "

मुलें निघून गेलीं. गाणीं गात आलीं होतीं, गाणीं गात परत गेलीं ! त्या रस्त्यानें गेलीं. त्या रस्त्यावरून हळुवार पावलांनीं मुलें चालत होतीं. स्वतः निर्माण केलेलें तें फूल होतें. मार्गी हळूहळू चालत होते, मुखानें भारतमातेचें नांव गात होते. मारवडचे लोक मारवडला गेले. मारवडच्या लोकांनीं वाटेंत आंबे दिले ! मुलांनीं आंबे खाल्ले. चांगले गोड व रसाळ आंबे !

अमळनेरच्या छात्रालयांत मुलें आलीं. गांवोगांव गेलीं.

स्वामी, नामदेव, रघुनाथ, आश्रमांत राहिले होते. नामदेवही लौकरच जाणार होता.

" आम्ही पुढील दोन वर्षांचा अभ्यास बडोद्यास करूं म्हणतों, " नामदेव म्हणाला.

" कां बरें ? एके ठिकाणीं ओळखी झालेल्या असतात, त्या फुकट जातात, " स्वामी म्हणाले.

" झालेल्या ओळखी कशा फुकट जातील ? त्या तर राहातीलच आणि शिवाय दुसऱ्या ठिकाणीं नव्या पडतील, " नामदेव म्हणाला.

" बडोद्यास फी मुळींच पडणार नाहीं. ह्यामुळें आम्हांला त्रास जरा कमी होईल. पुस्तकेंही विकत घ्यावीं लागतील. नामदेव तत्त्वज्ञान घेणार आहे. मी अर्थशास्त्र घेणार आहें, " रघुनाथ म्हणाला.

" बडोद्यास तुमच्या ओळखीचें कोणी आहे ? " स्वामींनीं विचारलें.

" आपल्या यशवंताची बडोद्यास ओळख आहे. त्यामुळें राहावयास खोली मिळणार आहे. आम्ही हातानें स्वयंपाक करूं, " नामदेव म्हणाला.

" नामदेव, रघुनाथ ! तुम्ही केव्हां शिकून येतां इकडे माझें सारें लक्ष आहे. तुम्ही आलेत म्हणजे कामाला आणखी जोर येईल. तुम्ही जनतेंतील आहांत. जनतेचे पुढारी तुम्ही व्हाल. जनतेंतून जनतेचे पुढारी निघाले पाहिजेत. तुम्ही लहानपणीं शेतांत खपले आहांत, नांगर धरलेला आहे. शेतकरी तुम्हांला आपले असे मानतील. आम्ही किती झालों तरी जरा दूरचे पडतों, " स्वामी म्हणाले.

" तुमच्याबद्दल लोकांना फार प्रेम वाटतें. तुम्हांला माहीत नाहीं. आम्ही आमच्या तोंडानें कशाला सांगूं सारें ? " रघुनाथ म्हणाला.

" यशवंताच्या छापखान्याचें काय झालें ? " स्वामींनीं विचारलें.

"अजून कांहीं निश्चित नाहीं. घरचें बंधन तोडणें त्याच्या जिवावर येत आहे. त्याचें लग्न झालें म्हणजे तें आपोआप होईल," रघुनाथ म्हणाला.

"यशवंताचें लग्न ठरलें आहे," नामदेव म्हणाला.

"नामदेव, मग तूं का उद्यां जाणार?" स्वामींनीं विचारलें.

"जाऊं ना?" नामदेवानें विचारलें.

"हो. जा. तुझे प्रेमळ वडील तुझी वाट पाहात बसले असतील. ते माझ्यावर रागवलेही असतील," स्वामी म्हणाले.

"तुम्ही माझ्या घरीं केव्हां याल? रायबा मागें मला म्हणाले, 'स्वामींना घेऊन ये एकदां.' सांगा ना तुम्ही केव्हां याल?" नामदेवानें विचारलें.

"येईन. केव्हां तरी येईन. नामदेव! तुझ्या घरांत मी नेहमींच आहें व माझ्या घरांत तूं नेहमीं आहेस," स्वामी म्हणाले.

"रायबा आतां म्हातारे झाले आहेत," नामदेव म्हणाला.

"नामदेव, स्वामींना घेऊन जा. थोडे दिवस विश्रांति मिळेल. जाच तूं घेऊन. तूं चला म्हटलेंस कीं ते नाहीं म्हणूं शकणार नाहींत," रघुनाथ म्हणाला.

"कांहीं दिवत मी प्रचारकांबरोबर हिंडणार आहें. छात्रालय सुरू झालें म्हणजे मला जातां येणार नाहीं. थोडे दिवस सुट्टीचे आहेत तों हिंडावें. निरनिराळ्या खेड्यांतून ओळखी झाल्या पाहिजेत. म्हणून आतां मी येत नाहीं. विश्रांति कशाला? न्यायमूर्ति रानडे म्हणत, 'जिवंत असेपर्यंत विश्रांति नको. मेल्यावर विश्रांति आहेच," स्वामी म्हणाले.

"बरें; तुम्ही कराल तें योग्यच कराल. आम्ही तुम्हांला काय सांगणार?" रघुनाथ म्हणाला.

"मला आतां जरा एकटाच बसूं दे. कधीं कधीं मला अगदीं एकटें असावेंसें वाटतें. जा तुम्ही बाहेर. आईजवळ, वेणूजवळ बोला. गरीब पोर किती आनंदांत असते! आंधळी असून आनंदी आणि आम्ही डोळस असून रडके! जा, वेणूजवळचा आनंद जरा लुटा," स्वामी म्हणाले.

नामदेव व रघुनाथ गेले. स्वामी एकटेच बसले होते. त्या मशिदींत बसले होते. एकदम त्यांना विरक्ति आली. बोलतां बोलतां वैराग्य आलें. ते फेऱ्या घालूं लागले. निराशेचा झटका आला. महिनाभर उत्साहांत गेला. त्याची

प्रतिक्रिया आली. त्यांचा चेहेरा एकदम खिन्न झाला. ते शेवटीं चटईवर पडले. स्वामींना त्या मशिदींत झोप लागली.

बाहेर अंधार पडला, तरी फकीर मशिदींत पडलेला होता. परंतु एकाएकीं ते जागे झाले. ते फकीरीच्याच विचारांत होते.

**मन लागो मेरा यार फकीरीमें**
**जो सुख पावो रामभजनमें**
**सो सुख नाहिं अमीरीमें ॥ मन० ॥**

हें गाणें ते म्हणूं लागले व डोलूं लागले. ' मी कसला पसारा मांडीत आहें ? बावळटपणा आहे सारा. एक राम मात्र सत्य आहे. बाकी सारें फोल आहे. ह्या सर्व आधिउपाधि सोडून निघून जावें, ' असें त्यांच्या मनांत येऊं लागलें. ' ह्या चिखलांत कशाला ही धडपड ! थोडीशी टुरटुर करायची व त्याचा पुन्हा अहंकार जडायचा ! मूर्खपणा आहे सारा झालें ! मी गुरफटला जात आहें संन्याशी असून संसारांत रमत आहें. आसक्तींत गुंतत आहें. जाऊं का सोडून सारें ? कशाला हा व्याप ! जाऊं दे पक्षी उडून. निळ्या निळ्या आकाशांत उडूं दे. स्वैर हिंडूं दे. '

इतक्यांत स्वामींना पाहावयास नामदेव व रघुनाथ आले.

" चला, जेवायला चला, " नामदेव म्हणाला.

" आम्हीं म्हटलें तुम्ही याल, " रघुनाथ म्हणाला.

स्वामी उठत ना, बोलत ना.

" येतां ना ? आज तुम्हांला काय होतं आहे ? बरें नाहीं वाटत ? " नामदेवानें विचारलें.

" होय, " स्वामी म्हणाले.

" काय कपाळ वगैरे दुखतें ? " नामदेवानें विचारलें.

" नाहीं " ते म्हणाले.

" मग काय होतें ? आम्हांला नाहीं सांगणार ? " रघुनाथ म्हणाला.

" माझें मन दुखतें आहे. माझें मन जसें कोंडलें गेलें आहे. माझ्या आत्म्याला गुदमरल्यासारखें वाटत आहे. वाटतें उडून जावें. नको हे पसारे, नकोत हे व्याप. ह्या उपद्व्यापांनीं काय होणार ? नसता अहंकार मात्र जडावयाचा ! तुला रामतीर्थांची माहिती आहे का ? रामतीर्थ हिमालयांतून

खालीं येत. कांहीं चळवळ किंवा वळवळ करावयास म्हणून खालीं येत. परंतु दोन चार प्रवचनें, व्याख्यानें दिलीं कीं ते गुदमरत! हिमालयांतील स्वच्छ निरुपाधिक पवित्र हवा त्यांच्या आत्म्यास पाहिजे असे. सर्वत्र स्वच्छ अखंड धवल बर्फ पसरलेलें आहे. दुसरें कांहीं नाहीं! एक आत्मतत्त्व, एक देवाचें राज्य सर्वत्र दिसत आहे! खालची संसारी हवा त्यांच्या आत्म्यास सहन होत नसे. ते पुन्हा हिमालयांत जात! ह्या ओढाताणींमुळेंच रामतीर्थ लौकर मेले असावेत! माझीही अशीच ओढाताण होत असते. कांहीं तरी ह्या हातून घडावें असें एकीकडे वाटतें तर एखादे दिवशीं हीं सारीं नसतीं बंधनें फेंकून ॐ तत्सत्ची ललकारी मारीत स्वच्छंद विहरावें, विचरावें असें वाटतें. कोठें तरी उडून जावें असें मला वाटत आहे. मी उगीच चिखलांत बरबटत आहें असें मला वाटत आहे. माझें मन आज भारावलें आहे." स्वामी म्हणाले.

"तुम्ही आतां कोठें जाणार? आमच्या जीवनांत मग अंधार प्रसरेल. तुमच्यामुळें थोडी त्यागवृत्ति, सेवावृत्ति उत्पन्न होत आहे. तुमच्यामुळें उदार विचारांची गोडी लागत आहे. तुम्ही गेलांत तर पंखहीन पांखराप्रमाणें, सुकाणूं नसलेल्या गलबताप्रमाणें, सूत्रहीन पतंगाप्रमाणें आमची स्थिति होईल. आम्हांला सोडून कोठें आहे देव? आजूबाजूच्या ह्या संसारांत का देवाचें दर्शन नाहीं? ज्याला जगांत देव मिळत नाहीं, त्याला अन्यत्र कोठें मिळणार, असें तुम्हीच मागें एकदां म्हणाले होतेत. भगवान बुद्ध म्हणत कीं, 'एकाही माणसाचें दुःख कमी व्हावें म्हणून मी पांचशें वेळां जन्म घेईन!' तुम्ही कां कंटाळतां? तुम्ही कोठें जाऊं नका. आमच्या सर्वांच्या निराशा पाहा आणि जाऊं नका. संसारच कसा रसमय करावा, सारमय करावा, सुंदर करावा हें लोकांना शिकविण्याची जरूर आहे. तुम्हीं तें चांगलें करूं शकाल," नामदेव म्हणाला.

"तुमचा किती जीवनांत उपयोग होत आहे, तें तुम्हांस माहीत नाहीं. अनेकांना ओलावा तुमच्याचमुळें मिळत आहे. नदीला कोठें माहीत असतें कीं किती तृणवेलींना ती ओलावा देते! किती जलचरांना, स्थलचरांना ती आधार देते! नदीला ओलावा देत वाहणें हें माहीत! ओलावा देत आहे ह्याची जाणीवही तिला नसते. वाहाणें, कांट्याकुट्यांतून वाहाणें, पाणी असेपर्यंत रात्रंदिवस वाहाणें हेंच तिला माहीत. तुमच्या जीवनाच्या प्रवाहामुळें आजूबाजूच्या अनेक लोकांच्या जीवनाच्या मळ्यांस ओलावा मिळतो. ते मळे फुलतात, ओसाड मळे हसतात!

आपण किती फुलें फुलविलीं हें सूर्याला माहीत नाहीं, आपण किती जमिनी भिजविल्या हें मेघाला माहीत नाहीं, आपण किती जणांना स्वच्छ हवा दिली हें वाऱ्याला माहीत नाहीं, किती जणांना मला पाहून आनंद झाला हें चंद्राला माहीत नाहीं! सारे कर्म करीत आहेत, शांतपणें कर्में अविरत करीत आहेत. स्वामी! तुम्हांला पाहून आमचीं हृदयें फुलतात. तुम्ही हसलेत म्हणजे आम्हांला अमर रसायन मिळतें. तुम्ही खिन्न झालेत म्हणजे आमची किती उमेद खचते, किती उत्साह जातो, किती धैर्य गळतें ह्याची तुम्हांला कल्पना नाहीं. चला. उटा. आमच्यासाठीं हसा, खेळा, काम करा. आमच्या आनंदासाठीं, आमच्या सुखासाठीं, आमच्या बऱ्यासाठीं," रघुनाथ म्हणाला.

"किती रे तुम्ही चांगलें बोलतां? जसे कवि व तत्त्वज्ञानीच," स्वामी म्हणाले.

"'बोलविता धनी वेगळाची!' तुम्हीच असें बोलायला शिकविलेंत. तुम्हीच हीं काव्यें, हे विचार गेलीं चार वर्षें ओतीत आहांत. तुमचेंच तुम्हांला मिळत आहे. तुम्ही आशा पेरलीत, आशा घ्या," रघुनाथ म्हणाला.

"येतां ना जेवायला? सारीं वाट पाहात असतील. वेणू सुद्धां आज आश्रमांतच जेवायला आली आहे," रघुनाथ म्हणाला.

"आईलाही कां नाहीं बोलाविलें? तुझी आई पुढेंमागें आश्रमाचीच आई होईल. रघुनाथची आई सर्वांची आई होईल," स्वामी म्हणाले.

"आई नको म्हणाली. तिला तितका मोकळेपणा वाटत नाहीं अजून. गांव आहे. कोणी कांहीं म्हणेल, फुकट जेवतात म्हणेल. चला तुम्ही." रघुनाथ म्हणाला.

स्वामी उठले. नामदेव रघुनाथ त्यांचा हात धरून निघाले.

भिका, जानकू वाट पाहात होते. प्रचारक मुलांबरोबरच निघून गेले होते. वेणू तेथें बसली होती.

"वेणू म्हणजे आश्रमाचें संगीत आहे," स्वामी म्हणाले.

"वेणू कांतते किती छान! 'आंधळ्या मुलीचें हें सूत आहे,' असें सांगितलें तर कुणाला खरेंही वाटणार नाहीं," जानकू म्हणाला.

"तुम्ही धोतर न्यायला विसराल हो. सकाळीं ना जाणार?" वेणूनें विचारलें.

" हो, " नामदेव म्हणाला.

" भाऊ, त्यांच्या पिशवींत धोतर घालून ठेव, " वेणू म्हणाली.

भिकानें पानें मांडलीं. सारे एकदम जेवायला बसले.

" नामदेव, तुम्ही बडोद्यास जाणार. आपल्या येथील कांहीं खादी तिकडे पुढेंमागें खपवा. मी पाठवून देईन कोणा येणाराजाणाराबरोबर. " स्वामी म्हणाले.

" आम्ही सुद्धां जातांना नेऊं, किंवा दिवाळीच्या सुट्टींत जर आलों तर त्या वेळेस नेऊं. पुढें नाताळच्या सुट्टींत तेथें खपवूं. " नामदेव म्हणाला.

" आपल्या देवपूरच्या आश्रमाचें नांव सर्वत्र जाऊं दे. " भिका म्हणाला.

बोलत, हसत जेवणें झालीं. प्रार्थनेला सर्व मंडळी बसली. वेणूनें प्रार्थना केली.

**' कान्हा लाज राखो मेरी**
**तूं गोवर्धनधारी ॥ का० ॥**
**हम पतित तुम करुणासागर**
**दुष्ट करत बलजोरी ॥ का० ॥**
**मीराके प्रभु गिरिधर नागर**
**तुम पिता मैं छोरी ॥ का० ॥**

पहाटे वेणू व तिची आई दळीत होतीं. नामदेव व रघुनाथ तेथें गेले.

" ऊठ, आई तूं ऊठ. आज आम्ही दोघे मित्र येथें दळतों. जातां जात नामदेवाला दळून जाऊं दे. आईची सेवा करणाऱ्याला चक्की मिळत असते. "

" भाऊ, तूं नि मी दळूं. त्यांना बसूं दे. ते गाणें म्हणतील. माझ्यापेक्षां त्यांचाच आवाज गोड आहे. माझ्या डोळ्यांपेक्षां त्यांचेच डोळे मोठे आहेत. माझे डोळे गेले. येतील, एक दिवस येतील, " वेणू म्हणाली.

" नाहींतर आपण तिघे दळूं, " रघुनाथ म्हणाला.

" भाऊ, त्यांचा हात त्या दिवशीं भाजला आहे. अजून बरा सुद्धां नसेल झाला. त्यांना नको रे दळायला लावूं, " वेणू म्हणाली.

" तुमचा हात माझ्या हाताला लागून भाजलेला हात बरा होईल. ह्या तिघांचे हात खुंट्याला लागूं दे, " नामदेव म्हणाला.

खरेंच तिघेंजणें दळूं लागलीं. खालीं रघुनाथचा हात, मध्यें वेणूचा हात व वर नामदेवाचा हात!

" जातें जड कां येतें? तिघांचे हात, तरी जड येतें?" वेणू म्हणाली.

" मी हात जरा सोडतों," नामदेव म्हणाला.

नामदेवानें हात सोडला व जातें भरभर फिरूं लागलें. जातें हलकें येऊं लागलें.

" तुम्हांला जातें धरतां येत नाहीं. खुंटा आवळून धरतां. खुंटा सैल धरावा लागतो. घट्ट पकडून नाहीं ठेवायचा. तुम्हांला घट्ट धरून ठेवण्याची सवय झाली आहे. वस्तु हातांत आली कीं घट्ट धरतां," वेणू म्हणाली.

" देवाचे पाय घट्टच धरावे," नामदेव म्हणाला.

" खुंटा म्हणजे देवाचा पाय वाटतें?" वेणूनें विचारलें.

" हो, देव ज्याप्रमाणें विश्व फिरवतो, त्याप्रमाणें हा खुंटा ह्या जात्याला फिरवितो. खुंटा म्हणजे देवाचा पाय," नामदेव म्हणाला.

" पुरे आतां दळणें. चल नामदेव," रघुनाथ म्हणाला.

" भाऊ, धोतरें घेतलींत रे?" वेणूनें विचारलें.

" हो. आणि नामदेवानें त्यांचे पांच रुपये दिले आहेत." रघुनाथ म्हणाला.

" मी नवीन धोतरजोडा घेणारच होतों." नामदेव म्हणाला.

" परंतु फुकट कांहीं घेऊं नये. घरीं तुम्हांला अडचण असते. नुसती मदत तशी देतां येत नाहीं व घेणेंही मिंधेपणा वाटतो. म्हणून हे पांच रुपये असूं देत." नामदेव म्हणाला.

" आणि वेणू! तूं आतां आंधळी. तुझ्या लग्नासाठीं आतां पैसे लागतील. पैशाशिवाय तुला कोण घेणार? पैशांची पिशवी बरोबर घेशील तेव्हां कोणीतरी तुला गळ्यांत बांधून घ्यावयास तयार होईल. आई हल्लीं पै पै जमवीत आहे. मीं म्हटलें, 'आई, इतकी कां रात्रंदिवस श्रमतेस?' ती म्हणाली, 'वेणूच्या लग्नासाठीं.' वेणू! तूंही सूत कांत. पैसे जमव. स्वावलंबनाची कास धर." रघुनाथ सांगत होता.

" भाऊ, काय हें तुम्ही बोलत आहांत? कोणाजवळ बोलत आहांत? तुम्ही दगडाशीं बोलतां का वेणूशीं? वेणूचे डोळे गेले. वेणूचे प्राणही जावेत अशी का इच्छा आहे? प्रेमाच्या वस्तूचे विक्रे काय मांडतां? त्या धोतरांचे रुपये

मोजणार? त्यांची का पांच रुपये किंमत आहे? त्यांची किंमत द्यायला तुम्ही तयार आहांत?" वेणूनें विचारलें.

"बारीक सूत आहे म्हणून फार तर सहा रुपये," रघुनाथ म्हणाला.

"त्या धोतरांत मीं माझें हृदय, माझें सारें जीवन ओतलें आहे. त्या धोतरांची किंमत द्यायची असेल तर हृदय मला द्या. त्या धोतरांत भावना आहेत, प्रेम आहे. मला भावना द्या, प्रेम द्या. दगडधोंडे नका देऊं. त्या पांच रुपयांनीं माझे पंचप्राण गुदमरून जातील. ते पांच दगड माझ्या प्राणाची समाधी बांधतील," वेणू म्हणाली.

"वेडीच आहे वेणू," रघुनाथ म्हणाला.

"थट्टा कोठें करावी हेंही तुम्हांला समजत नाहीं. दगडाचीं आहेत तुमचीं हृदयें," वेणू म्हणाली.

"मग तीं दगडाचीं हृदयें का तुला हवीं आहेत?" रघुनाथनें विचारलें.

"हो. त्या दगडांना ऊब देऊन फुलविण्यासाठीं. खूप ऊन पडलें कीं दगडांच्या सुद्धां लाह्या होतात!" वेणू म्हणाली.

"कवीच झालीस तूं," रघुनाथ म्हणाला.

"चल आतां रघुनाथ," नामदेव म्हणाला.

"आई भाकर भाजते आहे; ती खाऊन जा," वेणू म्हणाली.

"स्वामींनाही बोलावतों," रघुनाथ म्हणाला.

"ते उजाडतां खात नाहींत," नामदेव म्हणाला.

दोघे मित्र भाकरी खावयास बसले.

"वेणू, आमच्याबरोबर तूंही खा," रघुनाथ म्हणाला.

"मला कोठें जायचें आहे! घरांतला कोपरा हें माझें जग. वेणूला दुसरें काय आहे? कोपऱ्यांत बसावें, मुखानें गावें, हातानें कांतावें आणि प्रेमानें तुम्हांला द्यावें. कधीं एखादा अश्रु ढाळावा," वेणू म्हणाली.

"तुला आमच्याबरोबर यायचें आहे? तूं कोठें येणार?" रघुनाथनें विचारलें.

"मला कोण नेणार? कोणी नाहीं. आंधळयाला फक्त भगवान्. दुसरें कोणी नाहीं," वेणू म्हणाली.

" पुरे भाकरी," नामदेव म्हणाला.

" एवढ्यांत पोट भरलें ?" वेणूच्या आईनें विचारलें.

" वेणूचे शब्द ऐकून पोट भरलें," नामदेव म्हणाला.

" वेणूचे शब्द ऐकून हृदय नाहीं ना भरत ?" वेणूनें विचारलें.

" आई, मी अमळनेरहून परत येईन. नामदेवाला आगगाडींत बसवून परत येईन," रघुनाथ म्हणाला.

नामदेव आईच्या पायां पडला. तिनें आशीर्वाद दिला.

" वेणू, जातों हां. धोतरें घेतलीं. किंमत दिली," नामदेव म्हणाला.

" किंमत खरोखर पटेल तेव्हां," वेणू म्हणाली.

" पटेल. एक दिवस पटेल," नामदेव म्हणाला.

स्वामी तयारच होते. भिका, जानकू ह्यांचा निरोप घेऊन नामदेव निघाला. तिघे पायींच निघाले.

अनेक विषयांवर चर्चा करीत तिघे जात होते. आश्रमाचा व्याप कसा वाढवावा ह्याबद्दल चर्चा चालू होती.

" मी स्वतःच आतां हिंडूं लागावें असें मला वाटतें," स्वामी म्हणाले.

" तुम्हांला वर्तमानपत्र असतें तर छान झालें असतें. यशवंत जर येऊन मिळाला तर फार छान होईल. सध्यांच्या काळांत वर्तमानपत्र ही प्रचंड शक्ति आहे," रघुनाथ म्हणाला.

" तुम्ही आल्याशिवाय ह्या फंदांत पडूं नये असें वाटतें. वर्तमानपत्र चालविणें म्हणजे सर्कस आहे ती. तारेवरचें चालणें आहे तें. फार तोल सांभाळावा लागतो. नाहींतर तुरुंगांत पडायचेत. तुरुंगांत पडण्याची भीति नाहीं. परंतु लगेच दुसरा संपादक तयार हवा," स्वामी म्हणाले.

" 'तरुणांचीं कर्तव्यें' हें पुस्तक तुम्हीं लिहिलें आहे, त्याचें काय झालें ?" रघुनाथनें विचारलें.

" काय व्हायचें आहे ? पडून राहिलें आहे," स्वामी म्हणाले.

अमळनेर स्टेशनवर मित्र आले. गाडी उभी होती. नामदेव उभा होता. स्वामी व रघुनाथ उभे होते.

" नामदेव, एकटा असलास म्हणजे रडत बसूं नको. रडणें हें तुमचें काम नाहीं. तुमचें सर्वांचें रडणें मीं पूर्वी रडून टाकलें आहे. तुम्ही हसा व काम करा. आश्रमाचें काम वाढवा, " स्वामी म्हणाले.

" आश्रमाचें काम वाढूं लागतांच आश्रमच नाहींसा व्हावयाचा, " नामदेव म्हणाला.

" सारा खानदेशच मग आश्रम होईल. जेथें जाऊं तेथें आपलेच मित्र, समान ध्येयाचे, समान आचारविचारांचे ! छोटा आश्रम मरेल, काम करतां करतां मरेल व मोठ्या आश्रमाला जन्म देईल. दाणा मरतो व हजारों दाण्यांचें कणीस मिळतें. एक आश्रम सरकारनें जप्त केला, तर शेंकडों आश्रम त्या आश्रमाच्या मरण्यानें जन्माला आलेले आज ना उद्यां दिसतील, " स्वामी म्हणाले.

गाडीला एंजीन लागलें. नामदेवला धक्का बसला. स्वामींनीं एकदम धरलें.

" नामदेव, सावध राहात जा. पडायचास हो असा, " स्वामी म्हणाले.

" तुम्ही धरायला असा म्हणजे पडणार नाहीं, " नामदेव म्हणाला.

" नामा, पत्र पाठव. रायबांना प्रणाम. तुझ्या ताईना प्रणाम, " रघुनाथ म्हणाला.

" तुम्ही आले असतेत तर रायबांना किती आनंद वाटला असता. आपण दोघे गेलों असतों. येतां अजून ? " नामदेवानें स्वामींना विचारलें.

" नको. प्रचारकांबरोबर हिंडणार आहें. ह्या पायांना पंख फुटत आहेत. हिंडण्याची स्फूर्ति येत आहे. वसंत ऋतूंत पल्लव फुटतात, त्याप्रमाणेंच मला प्रेरणेचे पल्लव फुटत आहेत. हिंडूं दे भिरिभिरि सर्वत्र. वाढूं दे चैतन्य ! आश्रमांतील वारे सर्वत्र जावोत, " स्वामी म्हणाले.

" हात बरा झाला का रे तुझा ! " रघुनाथानें विचारलें.

" वेणूनें फुंकर घातला. हात बरा झाला, " हसत नामदेव म्हणाला.

" वेणू फार थोर मनाची मुलगी आहे. ती इतकी चांगली आहे ह्याचें तिला भानही नाहीं. ह्यामुळें तर ती अधिकच गोड वाटते. तिच्या बुद्धीचे व हृदयाचे डोळे फार रमणीय आहेत. कसें एखादे वेळेस बोलते, " स्वामी म्हणाले.

गाडी निघाली व नामदेव गेला.

“ रघुनाथ, तूं आश्रमांत जा. भिका, जानकू ह्यांच्याबरोबर रात्रीं वाचीत जा. त्यांची ज्ञानाची तहान मारूं नको. विचारांची भांडवलशाही नको,” स्वामी म्हणाले.

“ वाचीन. मी त्यांच्याबरोबर खूप बोलतों. मीही मागावर बसतों. त्यांच्याशीं एकरूप होतों, ” रघुनाथ म्हणाला.

“ अशींच हृदयें जोडा. आश्रमाचा विस्तार म्हणजे समान ध्येयाच्या माणसांचा विस्तार. जिवास जीव देणाऱ्या, एकरूप झालेल्या व्यक्तींचा विस्तार, ” स्वामी म्हणाले.

“ मी जातों, ” रघुनाथ म्हणाला.

“ जा, ” स्वामी म्हणाले.

रघुनाथ गेला. एकटाच गेला. नामदेव गेला. एकटाच गेला. स्वामी गेले. एकटेच गेले.

एकटें कोण जाणार ! जिवंत मनुष्य कधीं एकटा नसतो. रघुनाथ अनेकांजवळ मनांत बोलत जात होता. क्षणांत आईजवळ बोले, तर क्षणांत बाबांचीही त्याला आठवण येई. त्याचे बाबा आईला छळीत, परंतु त्याच्यावर त्यांची माया होती. आईच्या कैवारानें रघुनाथनें बाबांचा प्रेमसंबंध जवळजवळ तोडला होता. परंतु आज एकटा जात असतां त्याला त्यांच्या अनेक आठवणी आल्या.

स्वामी ! ते का एकटे जात होते ! आश्रम त्यांच्याबरोबर होता. यशवंत डोळ्यांसमोर होता. प्रचारक मनांत होते. कितीतरी कल्पना डोळ्यांसमोर होत्या.

आणि नामदेव ! तो का एकटा जात होता ! त्याच्याजवळ पिशवी होती. पिशवींत खादीचीं धोतरें होतीं. त्या धोतरांत वेणूचें हृदय होतें. वेणू होती. पुण्याहून वेणूनें नामदेवाला पिशवींत घालून आणलें. कोणी चोरून नेईल म्हणून ती झोपलीसुद्धां नाहीं. पिशवी हृदयाशीं धरून ती घेऊन आली. नामदेवानें आतां तेंच केलें. लबाड नामदेव वेणूला घेऊन जात होता. पिशवींत घालून घेऊन जात होता. कोणाला दिसत नव्हतें, कळत नव्हतें ! लबाड नामदेव !

रघुनाथ वडिलांचा विचार करीत जात होता. स्वामी आश्रमाचा विचार करीत जात होते. नामदेव वेणूचा विचार करीत जात होता. नामदेवाच्या

हृदयमंदिरांत, जीवनवृंदावनांत वेणूची मंजुळ मोहक मुरली मधुरपणें वाजूं लागली. नामदेवाच्या घरीं वेणूनाद होऊं लागला. नामदेवाच्या जीवनांत वेणूसुधेचा वर्षाव होऊं लागला.

नामदेव, जप हो जप ! शेवटीं आश्रमाला वाढवावयाचें आहे, खानदेशला मोठें करावयाचें आहे, भारताचे अश्रु पुसावयाचे आहेत—हें नको विसरूं. वेडावांकडा जा. परंतु सेवेच्या सागराला शेवटीं येऊन मीळ. धडपड करीत करीत शेवटीं ध्येयभगवानाची भेट घे.

